# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

मराठी निबंधाचा जन्म होऊन आता शंभरांवर वर्षे होऊन गेलीं आहेत. या शंभर वर्षांतील निबंधांचें सहजगत्या जरी आलोडन केलें तरी एक दोन ठळक विचार डोळ्यांपुढे उभे राहतील. त्यांपैकी एक विचार हा की, निबंधवाङ्मयाचा जन्म व विकास मुख्यत्वें नियतकालिकांच्यामुळे झालेला आहे. प्रा. गं. बा. सरदार,* आद्य मराठी निबंधकाराचा मान मिसेस् फारार या मिशनरी बाईस तिने १८३५ मध्ये लिहिलेल्या 'कुटुंबप्रवर्तननीति' या निबंधाबद्दल देत असले तरी तें पटत नाही. कारण या काळापूर्वीच १८३२ मध्ये 'दर्पण' नांवाचें साप्ताहिक मुंबईत सुरू झालेलें होतें; आणि या नियतकालिकांत हिंदुधर्म, सती, विद्वान् आणि मूर्ख, स्त्रीशिक्षणाची दिशा इत्यादि विषयांवर लोकशिक्षणाच्या दृष्टीने लेख प्रसिद्ध झाले होते. या 'दर्पण'मधील लेखांनाच आद्य निबंधाचा मान द्यावयास पाहिजे. अशा तऱ्हेचे निबंधवजा लेख नियतकालिकांतून सहेतुक लिहिण्याची पद्धत इंग्रजी वाङ्मयाच्या परिशीलनाने तत्कालीन विद्वानांना माहीत झालेली होती.

'अव्वल इंग्रजी'मध्ये ज्या मूठभर लोकांना पाश्चात्य विद्या शिकण्याची संधि मिळाली त्यांना असें वाटूं लागलें कीं, आपल्याभोंवती पसरलेल्या हजारों अज्ञ लोकांना आपण हळूहळू 'शहाणें करून सोडावें'. या काळांत इंग्रजी विद्या आणि मराठी छापखाना यांचा प्रारंभ महाराष्ट्रांत झाला; आणि त्याचें दृश्य फल म्हणजे निबंधवाङ्मय होय. इंग्रजी विद्येच्या अध्ययनाने निबंधाचें अंतरंग तयार झालें, तर छापखाना व तज्जन्य नियतकालिकें यांच्या द्वारें निबंधाचें बहिरंग तयार झालें. या दोन प्रभावी घटना लक्षांत घेतल्या तर निबंधाचे विषय, भाषा, रचना आणि आकार यांचा उलगडा सहज होईल. 'लोकांना शहाणे करून सोडावें' व 'लोकांना दुराचरणापासून दूर राहण्यास शिकवावें' अशी ज्ञानप्रसारकाची व उपदेशाची भूमिका आरं-

* अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका.

भीच्या निबंधकारांनी घेतली होती. किंबहुना समाजाच्या अर्धजागृत अवस्थेंत जेथे थोडे विद्वान् व बहुसंख्य अज्ञ अशी विषम रचना असते तेथे ज्ञानप्रधान व बोधप्रधान वाङ्मयाचीच निर्मिति सहेतुक होत असते. आणि याच हेतूने बाळशास्त्री जांभेकर यांनी ' दर्पण ' सुरू केलें, व मिसेस् फारार व रे. विल्सन या मिशनरी लोकांनी स्फुट निबंध प्रसिद्ध केले.

' दर्पणा 'ची ही परंपरा भाऊ महाजन यांच्या ' प्रभाकर ' या १८४१ मध्ये सुरू झालेल्या साप्ताहिकाने जोमाने चालविलेली आढळून येईल. ' प्रभाकरां '-तूनच ' लोकहितवादी ' ऊर्फ गोपाळ हरि देशमुख यांनी उपदेशपर निबंध-वजा ' शतपत्रें ' लिहिलीं. ' लोकहितवादीं 'नी पेशवाईचा नाश व इंग्रजीचा आरंभ बघितला होता. ह्या दोन्ही घटनांचे बरेवाईट संस्कार त्यांच्या बाल-मनावर उमटलेले होते. आजूबाजूस पसरलेलें अज्ञान व औदासीन्य पाहून त्यांना वाईट वाटे; उलट एल्फिन्स्टन् व बेंटिंकसारख्या शिक्षणप्रेमी व उदारमतवादी अधिकाऱ्यांचे सुधारणावादी प्रयत्न पाहून त्यांना इंग्रजी राजवटीबद्दल आशा व आदर वाटे. इंग्रजी विद्येच्या प्रसारानेच स्वबांधवांचें अज्ञान व औदासीन्य नष्ट होईल हा विचार त्यांना पटला, आणि निर्भेळ लोककल्याणाच्या इच्छेने त्यांनी निबंध व इतरहि ग्रंथ लिहिले. मराठी गद्याला त्या काळांत भारदस्तपणा प्राप्त झाला नव्हता; तथापि सामाजिक जीवनाचें सूक्ष्म निरीक्षण, निर्भीड दोषदर्शन, जिव्हाळ्याची उपाययोजना, आणि कळ-कळीची कमालीची साधी भाषा या गुणसमुच्चयामुळे चिपळूणकरपूर्वकाळांतील निबंधकारांत ' लोकहितवादी ' यांचाच अग्रभागीं उल्लेख होतो. लोकहित-वादींच्या शतपत्रांत ' इंग्रजी विद्या, डोळे करण्याची चाल, शाक्तमार्ग, हिंदुस्थानच्या पराधीनतेचीं कारणें ' इत्यादि विविध विषयांवर निबंधलेखन झालें आहे. अशा विविध विषयांवर त्रोटक निबंध लिहिण्याची पद्धत ' प्रभाकरा 'प्रमाणेच ज्ञानदर्शन, ज्ञानप्रसारक, सद्धर्मप्रकाश, ज्ञानोदय, दंभ-हारक, शालापत्रक इत्यादि नियतकालिकांतूनहि आढळते. गोविंद नारायण, बाबा पदमजी, बाळ भास्कर शिंत्रे, विष्णुबुवा ब्रह्मचारी, कृष्णशास्त्री चिपळूणकर, रा. भि. गुंजीकर इत्यादि तत्कालीन विद्वानांनी सामाजिक, राजकीय, धार्मिक, शैक्षणिक व शास्त्रीय विषयांवर उपदेशपर व ज्ञानप्रसारक निबंध लिहिले असले तरी त्या निबंधांचें स्वरूप आज शाळकरी निबंधां-

सारखें वाटेल. त्यांत भाषेचें विलोभनीय स्वरूप, मांडणींतील कुशलता आणि विचारांची खोली फारशी आढळत नाही. सोप्या भाषेंत दोन तीन पृष्ठांच्या मर्यादेंत एखाद्या विषयाची धूळभेट या निबंधांतून होत असे. विदग्ध पांडित्याचा पडताळा किंवा कलावंताच्या उत्स्फूर्त व्यक्तिमत्वाचा संस्कार या निबंधांतून फारसा प्रतीत होत नाहीं.

*　　　*　　　*

सन १८३२ पासूनच्या निबंधाचा आपण धावता आढावा घेत असतांना १८७४ पाशीं आपल्याला थबकावें लागतें. १८७४ मध्ये विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'निबंधमाला' सुरू केली, आणि त्याद्वारें मराठींतील निबंधवाङ्मयांत एक नवा मनु निर्माण झाला. चिपळूणकरांचें सर्व जीवनकार्य क्रान्तिकारक होतें. चिपळूणकरांनी मराठी निबंधाचें प्रयोजन व स्वरूप यांत क्रान्तिकारक बदल घडवून आणला. आतापर्यंतच्या निबंधाचा हेतु केवळ उपदेशाचा किंवा ज्ञानप्रसाराचाच होता असें दिसतें. त्या ज्ञानाचा उपयोग 'स्वत्व' पारखून घेऊन तें संगोपावें, व त्याचा विकास विशिष्ट कार्य उभविण्यांत व्हावा, या हेतूने 'मराठीच्या शिवाजी'ने आपली लेखणी उचललेली दिसते. बोधप्रधान निबंधाचा हेतु मागे पडून उद्बोधनप्रधान निबंधवाङ्मयास आरंभ झाला. चिपळूणकरांनी उद्बोधन हें प्रयोजन ठरविलें, आणि त्यामुळे निबंधाच्या स्वरूपांत बदल होणें अपरिहार्य होतें. अज्ञान, भोळेपणा व पारतंत्र्य इत्यादि रोगांनी जर्जर झालेल्या आणि स्वधर्म व स्वभाषा यांच्याविषयी उदासीन बनलेल्या महाराष्ट्राला 'स्वत्व'बुद्धीच्या संजीवनीने त्यांनी चैतन्यमय केलें. या त्यांच्या युगप्रवर्तनाचें श्रेय त्यांच्या विविध संस्थांच्या उभारणीप्रमाणेच प्रभावी निबंधलेखनाला आहे हें विसरून चालणार नाही.

जेव्हा एखादा नवा विचार लेखकाला सांगावयाचा असतो, तेव्हा त्या नव्या विचाराच्या प्रकटीकरणाला शक्य तों नवें माध्यम तो निर्माण करीत असतो. बोधाऐवजी उद्बोधनाचा विचार निबंधांतून प्रकट करण्याच्या वेळीं निबंधाची जुनी घडण सोडून नवी घडण होणें हें क्रमप्राप्त ठरतें. चिपळूणकरांवर संस्कृत वाङ्मयापेक्षा इंग्रजी वाङ्मयाची छाप अधिक पडलेली होती. चिपळूणकरांच्या निबंधाचें तंत्र हें संस्कृत वाङ्मयांतील 'अधिकरणा'सारखें

किंवा प्राचीन मराठी वाङ्मयांतील ' निबन्धु 'सारखें वाटलें,* आणि निबंध हा शब्दहि प्राचीन काळांतील वाटला, तरी त्याच्या निबंधाचें बाह्य स्वरूप हें डॉ. जॉन्सन व मेकॉले यांच्या निबंधांशींच अधिक जुळतें आहे. या पाश्चात्य लेखकांचा कित्ता जरी तंत्रापुरता त्यांनी गिरविला असला तरी निबंधांतील मंत्र मात्र खास त्यांचाच होता. निबंध हा पोरकट न राहतां विचाराने सखोल, भाषेने डौलदार, आणि आकाराने विस्तृत अतएव तो भारदस्त व पंडिती बनला होता.

विषयाच्या दृष्टीने निबंध हा गंभीर व भारदस्त आहे. त्याचें स्वरूप राजकीय असो की धार्मिक असो, शैक्षणिक असो की वाङ्मयीन असो, पण त्यांत कोठेहि क्षुद्रत्व आढळणार नाही. समाजाच्या उपयोगी पडेल असा विषय व त्याची प्रौढ, मुद्देसूद व बंदिस्त मांडणी आपल्याला वारंवार आढळते. ' वक्तृत्व, गर्व, इतिहास, मोरोपंतांची कविता, आमच्या देशाची स्थिति ' इत्यादि चिपळूणकरांचे निबंध बघण्यासारखे आहेत. स्वत्वाचें संगोपन करावयाचें या उद्देशामुळे स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा या तिन्ही क्षेत्रांतील विषय त्यांनी निवडले, आणि रचनेंतहि स्वमतप्रतिपादन व परमतखंडन यांना वाव दिला. यामुळे भाषाशैलीचें वळणहि बदललें, भाषा प्रौढ व ओजस्वी झाली, प्रतिपक्षीयांचीं मतें खोडतांना कधी ओज तर कधी उपहास यांचें दर्शन त्यांच्या शैलींत होऊं लागलें. निबंधमाला ही दर महिन्याला निघत असे, त्यामुळें एखाद्या विषयाचें संपूर्ण विवेचन करण्यासहि पंडिती मनाला अवसर मिळे. चिपळूणकरांचे कांही निबंध मतप्रचारात्मक तर कांही प्रज्ञाप्रधान आहेत. त्यामुळे त्या निबंधांतून लढाऊ वृत्ति व पांडित्य हे गुण वारंवार आढळतात. चिपळूणकरांच्या निबंधांत विषयानिष्ठा अधिक असली, व आधुनिक अर्थाने त्यांत लेखकाच्या खाजगी जीवनाची आत्मनिष्ठा नसली, तरी त्यांच्या संपन्न व्यक्तिमत्वाचे संस्कार त्यांच्या निबंधांत सहज आढळून येतील.

चिपळूणकरांनी अशा तऱ्हेने लिहिणाऱ्या लेखकांची एक थोर परंपरा निर्माण केली आहे. लो. टिळक, आगरकर, शि. म. परांजपे, कोल्हटकर,

[१] डॉ. मा. गो. देशमुखाचा लेख : विष्णुशास्त्री ते विनोबा : ' नवभारत' सप्टेंबर १९४८.

खाडिलकर, केळकर, सावरकर, माटे, माडखोलकर—फार काय पण साने गुरुजीहि—या परंपरेंतील निबंधकार म्हणून सांगतां येतील. लोकमान्य टिळकांनी त्यांची राजकीय भूमिका घेतली व स्वधर्माचा अभिमान बाळगून स्पष्ट भार्षेत 'केसरीं'तून अग्रलेख लिहिले; चिपळूणकरांच्या भार्षेतील डौल आगरकरांनी आत्मसात् करून त्यांत अलंकारिकपणा व उपहास यांची भर घालून 'केसरी' व नंतर मुख्यत्वें 'सुधारक' यांच्यामधील सामाजिक निबंध लिहिले. चिपळूणकरांच्याच 'स्वत्वा'चा अभिमान धारण करून शिवराम-पंतांनी ओजस्वी गद्याला उपहास व उपरोध यांच्या साह्याने धारदार व मर्मभेदक रूप आणलें, व काव्यात्मक भाषाशैलीचें नवें पर्व सुरू केलें. श्रीपाद कृष्णांनी उपहासाला विनोदाच्या नव्या चौकटींत बसवून विनोदी निबंध लिहिले, तर खाडिलकरांनी टिळकांच्या भाषाशैलीशीं बेमालूम सांधा जोडला आणि प्रखर राजकीय निबंध लिहिण्याची परंपरा चालविली. अच्युतराव कोल्हटकरांनी ओज व उपहास यांनी संपन्न झालेल्या पंडिती शैलीला चटक-दार व सोपें रूप देण्याचा प्रयत्न केला. भावनेच्या भरांत लिहिल्या जाणाऱ्या प्रासंगिक वर्तमानपत्री निबंधाला विचाराची जोड देऊन केळकरांनी निबंधाला समतोल, संपन्न आणि सुबोध केलें. पांगारकरांनी धार्मिक बाजूवर निबंध-लेखन करून भार्षेतील रसाळपणा व्यक्त केला. लो. टिळकांचा राष्ट्रवाद आणि आगरकरांचा सुधारणावाद यांचा वारसा घेऊन सावरकर, माटे, माडखोलकर यांनी निबंधाचें क्षेत्र विस्तृत व भारदस्त केलें, रचनेंत साक्षेपी-पणा दाखविला, आणि शैलींत ओजाच्या जोडीस नावीन्य आणलें. साने गुरुजी व विनोबाजी भावे यांनी विषयांची निवड मानवतावादी म्हणजेच विश्वव्यापी केली, आणि भार्षेत कमालीचा सोपेपणा व माधुर्य आणलें. चिपळूणकरांनी जो पंडिती व लढाऊ गुणांचा, भारदस्त स्वरूपाचा, आणि लोककल्याणासाठी केलेला उद्बोधनात्मक आवाहनाचा निबंध सुरू केला तो गेलीं पाऊणशें वर्षें त्याच पद्धतीने लिहिला जात आहे. फरक इतकाच की, हा उद्बोधक निबंध वृत्तपत्रांतून अग्रलेखाच्या रूपाने आल्यामुळे तो आकाराने मर्यादित व विषयाने प्रासंगिक झाला. तथापि, निबंधकाराच्या जिव्हाळ्याने व संपन्न व्यक्तिमत्वाने, तर कधी निबंधकाराच्या रचनेंतील सफाईमुळे व भार्षेतील लालित्याने तो आजहि तेजस्वी व आकर्षक वाटतो.

उद्‌बोधनप्रधान निबंध उपरोक्त लेखक विविध नियतकालिकांतून लिहीत असतांना, विचारवंत व संशोधक विद्वानांचा एक वर्ग प्रज्ञाप्रधान निबंधाची उंची व व्याप्ति वाढविण्यांत दंग झाला होता. फारसा विस्तार न करतांहि असें म्हणतां येईल की, या कालखंडांत गुंजीकर, राजवाडे, चिं. वि. वैद्य, ना. गो. चापेकर, डॉ. केतकर, वा. म. जोशी, पोतदार, जावडेकर, ब्रनहट्टी व न. र. फाटक इत्यादि निबंधकारांनी विविध विषयांवर व्यासंगपूर्ण व चिंतनशील निबंध लिहिले आहेत. ' विविधज्ञान विस्तार ' या मासिकाचे वैचारिक निबंध प्रसिद्ध करण्याचें कार्य कालचें ' लोकशिक्षण ', आजचें ' नवभारत ' इत्यदि मासिकें चालवीत आहेत.

या प्रदीर्घ कालखंडांतील सर्वच लेखन आज ' निबंध ' या एकच एक पण व्यापक नांवाखाली जमा झालें असलें तरी त्याच्या स्वरूपांत भेद आहे. ' दर्पण 'पासून ' निबंधमाले 'पर्यंत जें निबंधवाङ्मय निर्माण झालें तें स्थूल मानाने त्रुटित लेखांसारखें होतें या शाळकरी त्रुटित लेखाला भारदस्त निबंधाचें किंवा प्रबंधाचें स्वरूप चिपळूणकरांनी 'निबंधमालें 'तून दिलें टिळक व आगरकर यांची राजकीय व सामाजिक विचारसरणी विविध प्रसंगांच्या निमित्ताने नियतकालिकांतील चटकदार अग्रलेखांतून प्रकट झाली आणि मतप्रसारकी अग्रलेखी निबंध रूढ झाला. सारांश, बोधपर त्रुटित लेख, पंडिती प्रबंध, व वर्तमानपत्री अग्रलेख हीं स्थूलपणे जुन्या निबंधप्रकाराचीं विविध दर्शनें आहेत.

निबंधाच्या या स्वरूपांत जसा भेद आहे तसाच विषयांतहि आहे. राजकीय, धार्मिक अगर सामाजिक विषयांच्या जोडीस साहित्यविषयक व परीक्षणात्मक निबंधहि चिपळूणकर–हंस यांच्यापासून माडखोलकर–क्षीरसागर यांच्यापर्यंत लिहिले गेले आहेत.

* * *

निबंधवाङ्मयांतील हे विविध प्रकार लिहिले जात असतांना गेल्या पंचवीस वर्षांत आणखी एका निबंधप्रकाराची नवीन भर त्यांत पडली आहे. आणि मौज ही की, जुन्या निबंधाप्रमाणेच या नव्या निबंधालाहि इंग्रजी निबंधवाङ्मय उपकारक झालें आहे. फ्रेंच निबंधकार मॉंटेन् याच्या ' एसे ' ( Essai-Essay ) नांवाच्या आत्मनिष्ठ लघुनिबंधाच्या पद्धतीने इंग्रजींत

चार्लस् लँब्, चेस्टर्टन, ल्युकास, लिंड व गार्डिनर या प्रख्यात लेखकांनी लघुनिबंध लिहिले, व त्या इंग्रजी नव्या निबंधाच्या अभ्यासाने प्रा. ना. सी. फडके यांनी १९२५ मध्ये 'रत्नाकर' मासिकांतून 'गुजगोष्टी' या सार्थ नांवाखाली लघुनिबंधलेखन सुरू केलें. गुजगोष्टींनाच नवा निबंध किंवा ललित निबंध हीं नांवें आहेत. चिपळूणकरी निबंधाकडून वाटचाल केली असतांना आपल्याला या नव्या निबंधापाशीं पुन्हा थबकलें पाहिजे; कारण हा नवा निबंध जुन्या निबंधापेक्षा अंतर्बाह्य भिन्न आहे. केवळ तो आकाराने जुन्या निबंधापेक्षा त्रोटक आहे म्हणून लघुनिबंध ठरतो असें नाही. आकारमानाचें सकृद्दर्शनीं दिसणारें लघुत्व हा वस्तुतः गौण मुद्दा आहे. जुन्या निबंधाचें प्रयोजन उद्बोधनाचें तर नव्या निबंधाचें प्रयोजन रंजनाचें आहे. प्रयोजनांत बदल पडल्यामुळे निबंधाच्या अंतर्गत स्वरूपांत बदल होणें नैसर्गिकच आहे. जुना निबंध हा वस्तुनिष्ठ किंवा विषयप्रधान मानला तर नवा निबंध आत्मनिष्ठ किंवा व्यक्तिप्रधान मानावा लागेल. जुन्या निबंधांत भारदस्त विषय व बंदिस्त रचना यांना महत्त्व होतें, तर नव्या निबंधास कोणताहि विषय–मग तो कितीहि क्षुद्र असेना—चालतो;* आणि त्याची रचना कांटेकोर नसून स्वैर असते,** आणि या स्वैर संचारांत लेखक गप्पांच्या भरांत आत्मनिवेदन करीत असतो–पण पुष्कळदा वाचकांना मित्रत्वाने विश्वासांत घेण्यासाठी आत्मनिवेदनाचा आभासहि निर्माण करण्यांत येतो. भाषेच्या बाबतींतहि नवा निबंध जुन्यापेक्षा भिन्न आहे. लघुनिबंधकार हा घरगुती व खेळकर भाषाशैलीने क्षुल्लक वाटणाऱ्या विषयावर रसाळपणाने गप्पा मारीत असतो. मात्र या गप्पांच्या ऐन भरांत क्षुल्लक वा क्षुद्र वाटणाऱ्या विषयांतील रहस्याची किंवा सौंदर्याची तो हळुवारपणे ओळख करून देतो. मात्र या तत्त्वविवेचनांत किंवा सौंदर्यदर्शनांत कुठेच गांभीर्य निर्माण न होऊं देण्याची सावधगिरी त्याला घ्यावी लागते. मित्राच्या भूमिकेवरून खेळकर भाषेंत विनोदाने हास्यफवारे उडवून किंवा आत्मनिवेदनाने उत्कंठा व आपुलकी चाळवून तत्त्वाचा धागा नाजुकपणाने गुंतविणारा लघुनिबंधकार हा बहुश्रुत

* 'Any peg will do to hang the hat on.'

** An Essay is a loose sally of the mind..an irregular, undigested piece.

पंडितच असावा लागतो. फक्त फरक हा की, जुन्या निबंधांत तो व्यासपीठावर बसून गंभीरपणाने तत्त्वचर्चा करतो, तर नव्या निबंधांत चुलीजवळ बसून तो आपुकीने तत्त्व मारतो. आणि याच मुद्द्यावर त्याला शेकोटीजवळील तत्त्वज्ञ म्हणतात.[१] लघुनिबंधाचें वैशिष्ट्य सांगतांना प्रा. फडके म्हणतात की, 'लघुनिबंध म्हणजे बहुश्रुत मर्मज्ञाचें मधुर आर्जवी भाषण.' पांडित्य असूनहि प्रदर्शनाचा अभाव, रचनेंतील स्वैरपणा, भाषेंतील लालित्य, आणि गप्पीदास मित्राची भूमिका या चार प्रमुख गोष्टींमुळे नवा निबंध जुन्यापेक्षा सर्वस्वी भिन्न ठरतो. त्यांतील विविध प्रवृत्तींच्या कमी-अधिक रंगतीमुळे हा नवा निबंध कधी आत्मनिवेदनपर पत्रासारखा, तर कधी भावरम्य कवितेसारखा हृद्य वाटतो. प्रा. फडके यांची स्वैर रचना व सौंदर्यासक्ति, खांडेकरांची काव्यात्मकता व जीवननिष्ठा, काणेकरांचा खेळकरपणा, दांडेकरांचा आशावाद, आणि ना. मा. संतांची रसिकता, यामुळे हा नवा निबंधप्रकार अल्पावधींतच लोकप्रिय व संपन्न बनला आहे मराठी निबंधवाङ्मयांतील लालित्याने पंडित्याच्या क्षेत्रावरील केलेलें हें आक्रमण जितकें द्रुत तितकेंच रम्य वाटेल.

*　　　*　　　*

मराठी निबंधवाङ्मयांतील स्थूल स्वरूप हें विविध आहे. आरंभीं असें म्हटलें आहे की, हा वाङ्मयप्रकार मूलतः इंग्रजी वाङ्मयाच्या परिशीलनांतून जन्मास आला. तथापि, त्याचें अस्सल देशी स्वरूप आज बघावयास मिळत आहे. हें स्वरूप निर्माण व्हावयास नियतकालिकांचाच उपयोग झाला आहे. चिपळूणकरपूर्वकालीन किंवा त्याच्या उत्तरकालीनचा गंभीर निबंध आणि आजचा लघुनिबंध यांचा जन्म आणि विकास दैनंदिन वृत्तपत्रें, साप्ताहिकें, मासिकें इत्यादि नियतकालिकांच्या द्वारें झालेला आहे. याशिवाय काव्य, कथा, कादंबरी किंवा नाटक या वाङ्मयप्रकारात आढळणारें लालित्य व समाजनिष्ठ धोरण या निबंधवाङ्मयांतहि भरपूर आहे. याच दृष्टीने मराठी निबंधाची जडण-घडण व विकासशीलता यांचा परिचय करून देणाऱ्या

---

[१] 'A philosopher on the hearth.'

कांही थोर निबंधकारांपैकी पांच निबंधकारांचे निबंध येथे निवडले आहेत. हे पांचहि निबंधकार विषय, रचना, भाषाशैली व व्यक्तिमत्त्व या दृष्टींनी संपन्न आहेत, याची ओळख वाचकांना सहजच पटेल, आणि निबंधाच्या संभाव्य उज्ज्वलतेकडे मोठ्या अपेक्षेने ते नजर वळवतील.

--संपादक

## संदर्भ-ग्रंथ

१. मराठी निबंध : तंत्र आणि विकास—प्रा. म. वि. फाटक

२. नवें लेणें – प्रस्तावना—प्रा. ना. सी. फडके

३. उघडे लिफाफे – प्रस्तावना—ना. मा. संत

४. मराठी निबंधकार – प्रस्तावना—प्रा. शं. गो. तुळपुळे

५. विष्णुशास्त्री ते विनोबा – प्रस्तावना—प्रा. मा. गो. देशमुख

## विष्णु कृष्ण चिपळूणकर, बी. ए. ( १८५०–१८८२ )

'He had no business to die so soon' असे उद्‌गार न्या. रानडे यांनी काढण्यांतच चिपळूणकरांच्या कार्याचें कौतुक आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या पांडित्याचा वारसा घेऊन विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी प्रथम 'शालापत्रकां'त निबंध लिहिण्यास आरंभ केला. परंतु सरकारी चाकोरींतून निघणारें हें नियतकालिक शास्त्रीबुवांच्या स्वतंत्र राजकीय प्रज्ञेला व प्रतिभेला अपुरें ठरलें. त्यामुळे त्यांनी १८७४ मध्ये 'निबंधमाला' सुरू केली. शास्त्रीबुवांची निबंधमाला हा क्रान्तिकारक व उत्कट निबंध-वाङ्‌मयाचा आरंभ होय. विष्णुशास्त्रींना अनेक अर्थांनी युगप्रवर्तक म्हणतात; त्यांपैकी निबंधकार या दृष्टीनेहि ते युगप्रवर्तक ठरले आहेत. इंग्रजी राजवटीचा वरचा बुरखा फेकून देऊन डलहौसीपासूनच्या इंग्रजी अधिकाऱ्यांचें साम्राज्यशाही धोरण त्यांनीच उघडें केलें. गेल्या शतकांतील इंग्रजांच्या मोहिनीने भुललेल्या लोकांना—अशिक्षित व सुशिक्षित—जागृत करण्याचें कार्य चिपळूणकरांनीच केलें. डॉ. जॉन्सन्‌च्या गाढ पांडित्याचा, ॲडिसन्‌च्या लोकोद्धाराच्या तळमळीचा, आणि मेकॉलेच्या डौलदार लेखनशैलीचा परिणाम शास्त्रीबुवांवर होऊनहि त्यांचें 'स्वत्व' कधींच सुटलें नव्हतें.

स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांच्या कल्याणाची तळमळ सदैव त्यांच्या अंतःकरणांत होती; आणि त्यामुळेच स्वदेशाविरुद्ध जाणाऱ्या इंग्रज अधिकाऱ्यांबद्दल, स्वधर्माची अवहेलना करणाऱ्या मिशनरी लोकांबद्दल, आणि स्वभाषेविषयीं उदासीन बनलेल्या नवशिक्षितांबद्दल त्यांनी विरोध करतांना तिरस्कार व उपहासहि जागोजागीं प्रकट केला आहे. निबंधवाङ्मय ओजस्वी, विस्तृत, डौलदार करण्याचें कार्य चिपळूणकरांचें आहे. त्यांच्या निबंधांच्या रचनेंत परमतखंडन व स्वमतप्रातिपादन वारंवार दिसून येईल, आणि त्यांतच त्यांच्या भाषेचे गुण दिसून येतील. विषयांच्या दृष्टीनेहि त्यांच्या निबंधांत विविधता व भारदस्तपणा आला आहे. 'निबंधमालेचा उद्देश, भाषादूषण, मराठी भाषेची स्थिति, मराठी कविता, मोरोपंतांची कविता' इत्यादि स्वभाषाविषयक निबंध जसे आढळतात त्याचप्रमाणे 'इतिहास, गर्व, लोकभ्रम, वाचन, डॉ. जॉन्सन्, तारा नाटक' इत्यादि विषयांवरहि त्यांनी पांडित्यपूर्ण विवेचनात्मक निबंध लिहिले आहेत. पण त्याहिपेक्षा राजकीय निबंध लिहितांना त्यांना विशेष स्फुरण प्राप्त होत असे; हें त्यांच्या 'देशोन्नति'-सारख्या लहानशा किंवा 'आमच्या देशाची स्थिति' या प्रदीर्घ निबंधावरून आढळून येईल. या सर्व विविधतेमुळेच कांही लोक त्यांना 'निबंधकारांचा मुकुटमणि' मानतात; तर कांही चिपळूणकरपूर्व निबंधकारांकडे दुर्लक्ष करून चिपळूणकरांनाच आद्य निबंधकार मानतात. कोणत्याहि पद्धतीनें अतिशयोक्ति न करतांहि असें कबूल करावें लागेल की, चिपळूणकरांनी बालखंडांतील निबंधाला 'स्वत्व' देऊन बाळसेदार केली, त्यास ईर्षा प्राप्त करून दिली, व पांगुळगाडा सोडवून त्याला स्वतांच्या पायावर वाटचाल करण्याइतकें समर्थ केलें. चिपळूणकर हे निबंधकार तर होतेच पण त्याहिपेक्षा ते एका थोर परंपरेचे निर्माते होते.

---

# मराठी कवितेचे प्रतिपक्षी : : १

आमच्या मराठी कवितेच्या प्रतिपक्ष्यांचे वर्ग केले असतां ते मुख्यतः तीन होतील. एक जुने शास्त्री, दुसरे नवीन विद्वान्, आणि तिसरे मिशनरी लोक. पहिल्यांचें म्हणणें असें की, प्राकृत भाषा म्हणजे काय अडाणी लोकांची; तेव्हा तींतील कवितेची योग्यता ती कितपत असायची आहे? हीस संस्कृतांतल्या काव्यांची कधी तरी बरोबरी येईल काय? दुसऱ्यांचें म्हणणें असें की, आमच्या भिकार एतद्देशीय भाषांत जीव काय आहे? इंग्रजी भाषेंत जसे मोठमोठ्या कवींनी हजारों ग्रंथ लिहून ठेवले आहेत तसें मराठींत काय आहे? तिसरे आमचे पाद्री बंधु. यांच्या मतें तर आमच्या देशांत नांव घेण्यासारखें कांहीच कधी आजपर्यंत सापडलें नाही; मग कवितेसारख्या अमूल्य वस्तूची तर गोष्टहि काढावयास नको! त्यांतून मराठी कवितेचा प्रसार त्यांच्या ईश्वरप्रणीत धर्माच्या प्रसारासहि बद्धक होणारा आहे; तेव्हा तो तर एतद्देशीय लोकांच्या आत्म्यास अत्यंत इजा करणारा समजून त्यास यथाशक्ति प्रतिबंध करण्याचाच वरील ज्ञानसंपन्न व धर्मशील पुरुषांचा सतत उद्योग सुरू आहे. तर याप्रमाणे पहिल्यांच्या विरोधास कारण गर्व, दुसऱ्यांच्या विरोधास अज्ञान, आणि तिसऱ्यांच्यास दुराग्रह अशीं होत.

आता वरील त्रिवर्गास यथानुक्रम मराठी कवितेच्या तर्फेने उत्तर देणें अवश्य आहे. पहिल्याने प्राकृतास नाक मुरडणारें शास्त्री-मंडळ. या मंडळाचें प्राबल्य हळूहळू मोडत जाऊन सध्या तर तें देशाच्या दुर्दैवामुळे सरासरी शेवटल्याच अवस्थेस येऊन पोचलें आहे. यास्तव यांच्या आक्षेपांस फार सविस्तर उत्तर देणें नलगे. एकंदर प्राकृत भाषांची, व त्यांतून प्राकृत कवितांची, त्यांच्या तोंडून जी कधी कधी निंदा ऐकूं येते तीवर आमचें म्हणणें इतकेंच आहे की, संस्कृत भाषा ही मराठी वगैरे चालू भाषांहून सर्व प्रकारें अत्यंत श्रेष्ठ आहे ही गोष्ट सर्वांच्या मतें केवळ निर्विवाद आहे. यास्तव इतकेंच जर त्यांचें म्हणणें असेल तर वादाचें मूळच अर्थात् खुंटलें

पण संस्कृत भाषा सर्व प्रकारांनी उत्कृष्ट असून सध्याच्या प्राकृत भाषा सर्वथा तिरस्कारास्पद होत असें जर त्यांचें म्हणणें असेल तर तें मात्र बरोबर नाही. सध्याच्या स्थितींत पाहतांहि मराठी व इतर प्राकृत भाषा बऱ्याच सुधारल्या असून त्यांत ग्रंथसंग्रहहि थोडा आहेसें नाही. त्यांतून मराठींत तर विस्तार व योग्यता अशा दोहो मानांनीं पाहतांहि तो मोठाच आहे. सारांश, ज्याप्रमाणे रुपें, तांबें वगैरे धातु सोन्याहून कमी मोलवान तर खरेंच, पण त्यांचें स्वतःचें मोल त्यांस नाहीसें नाही; त्याप्रमाणे मराठी, हिंदुस्थानी वगैरे भाषांतील कवितांस जरी संस्कृत कवितेचीच निखालस बरोबरी झाली नाही, तरी त्यांची अंगभूत योग्यता म्हणजे मुळीच शून्य असें कोणाच्यानेहि म्हणवणार नाही.

दुसरे आक्षेपक अलीकडील विद्वान् लोक. यांच्यांतून बहुतेकांचीं मनें इंग्रेजी विद्येच्या अध्ययनाने अत्यंत दूषित झालेलीं दृष्टीस पडतात. इंग्लिश भाषेचें केवळ ज्ञान झालें असतांहि मनुष्याच्या अंगीं एकदम कांही अपूर्व शहाणपण येतें, किंवा दिव्यदृष्टीचा लाभ होतो, अशी त्यांची कांही विचित्र समजूत झालेली दृष्टीस पडते. या समजुतीस्तव ज्यास इंग्रजी समजूत नाही तो अज्ञान, मूढ, व जें इंग्रेजी नव्हे तें मूर्खपणाचें, दोषमय; असा एकंदरींत या लोकांनी एक महासिद्धान्त ठरवून ठेवला आहेसा दिसतो. हा त्यांच्या मनाचा कल ध्यानांत आणला असतां मराठी कवितेविषयीं त्यांचीं मतें कशीं असावीं हें सहजच ध्यानांत येणारें आहे. या नव्या लोकांस आपल्या देशभाषेचें ज्ञान कितपत असतें, एरवी व्यवहाररीत्या बोलावयाचें असतांहि त्यांच्या चुका कशा चमत्कारिक होतात, बोलण्यास उभे राहिले असतां किंवा चार ओळी लिहिण्याचा कोठें प्रसंग आला असतां धेडगुजरी भाषेचा कसा प्रकार होतो, हें सर्वत्र प्रसिद्ध आहे. मग अशांची आपल्या देशभाषेंतील कवितेवर कितपतशी भक्ति असेल हें कोणीहि सांगेल. या नव्या मंडळींपैकी मराठी कविता ज्यांनी कधीहि लक्षपूर्वक वाचली आहे असे फारच थोडे निघतील. त्यांचा भर काय तो इंग्लिश भाषेवर व इंग्लिश कवितेवर; तेव्हा त्यांस जें कांही आवडणार तें तशा प्रकारचें असलें तरच उपयोगी. पण आमच्या कवितेंत तसें कोठून असावें ? मनुष्या-मनुष्यांत अनेक प्रकारचा फरक जसा नेहमी दृष्टीस पडतोच, तसाच राष्ट्राराष्ट्रांतहि

अवश्य असावयाचाच. याच नियमास अनुसरून इंग्रेजी कवितेचे विषय निराळे, आमचे निराळे; त्यांची रचना निराळी, आमची निराळी; उपमा, रूपक इत्यादि अलंकार त्यांचे वेगळे, आमचे वेगळे. आता या निराळेपणांत अमुकच चांगलें आणि अमुकच वाईट अशी निवडानिवड करण्याचें जर कोणी पत्करील तर तें काम त्यास फार जड जाईल यांत संशय नाही. कारण कविता ही भूमितींतील प्रमेयांप्रमाणे तर्कशास्त्राचा विषय नव्हे, तर केवळ हृदयवृत्तींचा व कल्पनाशक्तीचा आहे. यास्तवच अमुक अमुक उपमा सरस आहे की नाही, अमुक अमुक भाषणांत अमुक अमुक रस बरोबर उतरला की नाही, या गोष्टी सिद्ध करून दाखवितां येणाऱ्या नव्हेत; त्या मनाने केवळ अनुभविल्याच पाहिजेत. असो, तर याप्रमाणे इंग्रेजांच्या रुचिभेदाने एतद्देशीय भाषांतील कविता जरी त्यांस कदाचित् नापसंत ठरली, तरी तेवढ्यावरूनच ती दोषास पात्र होईल असें कदापि होणार नाही. आणि त्याप्रमाणेच इंग्रेजांच्या तऱ्हेचें जेवढें असेल तेवढेंच काय तें ज्यांस गोड वाटूं लागलें त्यांच्या तिरस्कारानेहि आमच्या भाषेंतील कवितेस वस्तुतः हीनत्व येणार आहे असेंहि नाही.

आता मराठी कवितेचे तिसरे प्रतिपक्षी जे मिशनरी लोक त्यांच्या म्हणण्याचा विचार करूं. यांच्या आक्षेपांवर उत्तर देणें हें वास्तविक पाहतां त्यांस फाजील मान देणेंच होय. कारण हे जे आक्षेप काढतात ते म्हणजे मोठ्या प्रांजल बुद्धीने किंवा समंजसपणानेच नेहमी काढलेले असतात असें नाही. त्यांच्या मंडळीचा एक जो मोठा उद्देश—की हिमालयापासून तों थेट कन्याकुमारी भूशिरापर्यंत सर्व देश ख्रिस्त प्रभूच्या भजनीं लागावा—त्यास कोणत्याहि वेड्यावांकड्या रीतीने जिकडून म्हणून साहाय्य होईलसें त्यांस वाटतें तें करण्याविषयी सारी मंडळी जशी काय एका पायावर उभी आहे ! मग आपण जें करतों तें वाजवी आहे की गैर आहे, त्यांत शहाणपण आहे की मूर्खपणा आहे, वगैरे गोष्टींकडे त्यांचें बिलकुल लक्ष असत नाही ! तर याप्रमाणेच मराठी कवितेविषयी जें शत्रुत्व हे प्रकट करतात त्यांत वरच्या वेडगळ आशेशिवाय दुसरा कांही एक हेतु नाही. मराठी कवितेंत प्रायः सगळा विषय हिंदुधर्माचा आहे, व तो धर्म लोकांत सतत जागृत ठेवण्यास ही कविताच पुष्कळ अंशांनी कारण होते, हें पक्कें मनांत समजून वरील कवितेचा

जितका ऱ्हास होईल तितका आपणांस इष्टच होय असें वरील लोक मानतात. पण हें उघड कोणीं बोलून दाखवावें ? तेव्हा अर्थातच पुढील कावे योजावे लागतात. कोणी म्हणतात, मराठी कवितेंत आहे काय? उगीच कांही भाकडकथा आणि वेदान्ताचें चर्वितचर्वण हेंच काय तें तींत येथून तेथून भरलें आहे. दुसरे महापंडित आपलें पांडित्य मिरवितातः—' अहो ! मराठी कविता म्हणजे काय ? संस्कृताचें शुद्ध भाषान्तर आहे. तीस स्वतंत्र योग्यता ती कोणती आहे ?' तिसरे तर वरच्या दोहोंतून जास्ती आव घालून आमची कविता अत्यंत दुराचरणप्रवर्तक म्हणून अंगावर शहारा आणतात; आणि ही जर बुडेल तर देशांतील अनीतीचें मूळच खणून टाकल्यासारखें होईल असें सुचवितात. पण चवथ्यांची ताण तर कांही पुसूंच नये ! आमच्या वाचकांपैकी कित्येकांनी अत्यंत भाविक अशा कित्येक खिस्ती साधूंस हिंदुस्थानांतील वीस कोटि प्रजा जगाच्या खऱ्या तारकास न ओळखून खोट्या देवास भजल्यामुळे अक्षय नरकाचें साधन करतांना पाहून मोठ्या कळवळ्याने रडतांना कदाचित् पाहिलें असेल, अथवा त्याच नाटकाचा अभिनय आमच्या देशांतील ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज, किंवा येथील 'देवास शोधणारी मंडळी' यांच्यापैकी कोणी हुबेहूब केलेलाहि कदाचित् पाहिला असेल ! तर त्या प्रकारावरून वरील भाविक खिस्ती पंडितांस मराठी कवितेंतील खोट्या देवांचीं वर्णनें वाचून केवढी हळहळ वाटत असेल याचें आमच्या वाचकांस सहज अनुमान करतां येईल. आम्हांस कोणत्याशा एका पाद्री बुकांत वाचलेलें आठवतें,—त्या पुस्तकांत तुकारामाचे कांही सर्वप्रसिद्ध अभंग लिहून त्यांची मोठी तारीफ केली होती; पण शेवटीं म्हटलें होतें की, अमृताच्या पेल्यांत जसा एक विषाचा थेंब टाकला असतां सगळें व्यर्थ होतें त्याप्रमाणे त्या अभंगांत ' विठोबा 'चें नांव जें घातलें होतें त्याने त्याचा सगळा रस जाऊन उलटा तो आत्म्यास अपायकारक मात्र झाला ! तर यावरून आमच्या बिचाऱ्या देवावर खिस्ताच्या प्रेषिताची केवढी कडक नजर आहे हें सहज दिसून येईल !

असो, आतां वरील चार आक्षेपांत तथ्य कितीसें आहे याचा विचार करूं. पहिला आक्षेप म्हटला म्हणजे, आमच्या कवितेंतील विषयाच्या संबंधाने. हा विषय कोठे कोठे पौराणिक कथा व कोठे कोठे वेदान्तास अनु-

सरून देहाच्या नश्वरतेच्या संबंधाने अथवा संसाराच्या मिथ्यत्वासंबंधाने वगैरे उपदेश असाच प्रायः असतो. या दोहोंतहि आमच्या खिस्ती बंधूंस येवढें दूषणास्पद काय वाटत असेल तें असो ! आमच्या पुराणांतील गोष्टी अगदी निव्वळ खोट्या असें जरी घटकाभर धरलें, तरी कवितेचा विषय होण्यास त्यांस कोणता बाध आहे हें आम्हांस कळत नाही. आमचे खिस्ती बंधु जेव्हा ‘ इलियड् ’, ‘ ईनियड् ’ वगैरे महाकाव्यें वाचून आनंदाने माना डोलवितात, तेव्हा त्यांतील सर्व वृत्तान्ताच्या खरेपणाबद्दल त्यांची खात्री झालेली असते काय ? आम्हांला खचित वाटत नाही. निदान आमची आम्हांला तरी पूर्ण-खात्री आहे की, वरील दोन महाकाव्यांचें तिसरें अर्वाचीन भावंड जें ‘ प्याराडैज् लॉस्ट ’ तें वाचतांना त्यांतील कथानकाच्या सत्यासत्यत्वाविषयी आम्ही केवळ उदासीन असतों. फार तर काय, पण आमच्या बंधूंची परवानगी असल्यास असेंहि पण त्यांस आम्हांस निर्धास्त-पणें सांगतां येईल की, त्यांच्या ‘ पवित्र शास्त्रा ’वर आमची मोठीशी श्रद्धा आहे असें जरी नाही, तरी मिल्टन्च्या वरील अप्रतिम काव्याचा स्वाद आमचा कधींहि कमी झाला नाही. दुसरा विषय वेदान्ताचा. यावरील कविता रंगेल व अल्पमति लोकांस जर त्रासदायक वाटल्या तर त्यांत फारसें नवल नाही, पण धर्मपरायण व विरक्त वृत्तीच्या खऱ्या खिस्ती लोकांस त्या कां नापसंत वाटाव्या कोण जाणे ? सर्व देशांतील तत्त्वज्ञ लोकांनी जे वैराग्यपर विचार जागोजाग प्रदर्शित केलेले आढळतात ते आमच्या महाराष्ट्र कवींनीहि प्रगट केले असतां त्यांत काय बिघडलें ? तर याप्रमाणे पहिला आक्षेप उडाला. आतां दुसरा असा की, मराठी भाषेंतील कविता शुद्ध भाषान्तररूप आहे. यावर आमचें उत्तर थोडें आहे. तें इतकेंच की, वरील उक्ति शुद्ध अज्ञानाची आहे. मराठीपैकी ‘ शुद्ध भाषान्तर ’ करणारा एकहि कवि सांपडणार नाही असें आम्ही येथे लिहून ठेवतों. तें वरील आक्षेपकांपैकी एकाने तरी खोडून टाकावें ! *

तिसरा आक्षेप आमच्या कवितेचा नीतिदृष्टया भ्रष्टपणा. हा आक्षेप लागू पडण्यास आमच्या भाषेंतील लावण्या व प्रतिष्ठित काव्यांतलेहि कोठले

* हा मुद्दा धरून बरेंच सविस्तर प्रतिपादन केलेलें पाहणें असल्यास निबंधमाला,’ अंक १२ च्या प्रारंभीं पाहावें.

कोठले कांही भाग हीं बरींच कारणभूत होतील खरीं; पण वरील एकदेशावरून साऱ्या कवितेला नांव ठेवणें हें मिशनरी लोकांच्या मात्र सत्यनिष्ठेला व समंजसतेला साजण्यासारखें आहे. आमच्या लोकांपैकी जे कोणी आमच्या कविताग्रंथांवर धाड घालण्याच्या बेतांत आहेत त्यांनी आपल्याजवळच्या सोनामुखीच्या पुड्यांचा प्रयोग जर स्वभाषेंतील ग्रंथांवरच अगोदर पुरतेपणी केला, तर तो त्यांच्या देशबांधवांस, एकंदर जगास, व आमच्या देशांतील तरुण विद्वानांसहि जेवढा हितावह होणार आहे तेवढा बिचाऱ्या मराठी कवितेवर करून कांहीच व्हावयाचा नाही. आम्हांस खचित वाटतें की, वरील पुड्यांचें कारण आमच्या कवितेंत जर एकपट पडेल तर इंग्रेजी ग्रंथांत तें कांही नाही तरी निदान हजारपट तरी पडेल ! आमच्या कविमालेंत जरासे फकड म्हणण्यासारखे कवि फार तर रामजोशी, सगनभाऊ वगैरे अगदी अलीकडचे कांही सांपडतील; व मागील कवींत मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत वगैरे कांही थोड्यांच्या ग्रंथांतून उगीच कोठें थोडेंसें अमर्याद शृंगारवर्णन सांपडेल; बाकी तुकाराममहाराज, ज्ञानेश्वरबोवा यांच्या काव्यांत तर गोष्टहि बोलायला नको. पण हे आमचे मुखदुर्बल कवि कोणीकडे—आणि विलायतेंतलीं जार्डीं प्रकरणें कोणीकडे ! आमच्या ज्ञानदेवाशीं सरासरी समकालीन असणारे जे आद्यकवि चॉसर यांच्यापासून जो इंग्लिश कवितेंत चावटपणाला आरंभ झाला तो रामजोशाच्या वेळी असणाऱ्या बायरन् कवीपर्यंत ! त्यांतून शेक्स्पियरच्या वेळी व विशेषतः दुसऱ्या चार्लसाच्या राज्यांत तर क्रियाद्वारा व लेखनद्वारा जो विचकटपणा माजला होता तो कांही पुसूं नये ! सैतानाची व त्याच्या मंडळीची त्या वेळीं इंग्लंडांत जशी चंगळ चालली होती तशी जगाच्या इतिहासांत इतर फारच थोड्या वेळीं चालली असेल ! पण हें फक्त कवितेविषयींच झालें. कादंबऱ्यांतून जो अनंगरंग ओतलेला आढळतो त्यास तर कांही सीमाच नाही. आमचे पाद्री बंधु आमच्या मराठींतील कित्येक कादंबऱ्यांतील कांहीं चावटगिरीचे प्रकार पाहून मोठा हाहाकार करतात, पण फील्डिंग, स्मॉलेट, रेनॉल्ड्स्, बोकेशियो, एवढीं नांवेंच नुसतीं येथे लिहिणें पुरे आहे ! असो. या विषयावर सविस्तर लिहूं गेलें असतां एक भला मोठा ग्रंथच होईल; व त्यांतील बहुतेक मजकूर आमच्या प्रतिपक्ष्यांस मोठासा आवडेल असें

आम्हांस वाटत नाही. यास्तव प्रस्तुत, विषयाच्या तर्फेने येथे शेवटीं इतकेंच लिहितों की, आमची मराठी कविता इंग्रेजी कवितेशीं ताडून पाहिली असतां पुष्कळच शुद्ध ठरेल; आणि इतर सगळ्या भाषांतील कविता जर पाहिल्या तर त्यांत हिच्याइतकी अदूषित क्कचितच सांपडेल असेंहि आम्हांस खास वाटतें.

आता राहतांपैकी एक शेवटला आक्षेप मात्र राहिला. तो हा की, आमच्या कवितेंत खऱ्या धर्मास अनुसरून मजकूर नसल्यामुळे तो वाचणारांच्या आत्म्यास अत्यंत घोर परिणामास नेणारा आहे, या आक्षेपास येथें सविस्तर उत्तर देणें केवळ अशक्य आहे. कारण तें उत्तर म्हणजे हिंदु व ख्रिस्ती धर्म यांतून खरा कोणता या वादावर सर्वथा अवलंबून राहणारें आहे. पण या वादाचा निश्चयात्मक निर्णय अद्याप कोणीहि केला नाही, व तो केव्हाहि होईलसें वाटत नाही. यास्तव तो होईपर्यंत आमच्या कवितेचें पातकावहत्व सिद्ध झालेसें मानतां येत नाही; म्हणजे तें मुळीच मानतां येत नाही असेंच झालें !

असो, याप्रमाणे मराठी कवितेवर निरनिराळे आक्षेपक जीं जीं दूषणें देऊं पाहतात त्यांच्याविषयीं वर बरेंच विवेचन झालें.

---

# पारतंत्र्याचे दुष्परिणाम : : २

**'फाराचि बरी निरयगति, परवशता शतगुणें करी जाच!'**

इंग्रजी राज्यापासून आमची पहिली मोठी हानि कोणती झाली म्हणाल तर स्वातंत्र्यनाश. स्वातंत्र्याची स्थिति पारतंत्र्यापेक्षा किती सुखावह असते हें कोणालाहि सांगावयाला नकोच. यदृच्छेने अंतराळांत फिरणाऱ्या व वनगहनांत यथेच्छ आहारविहार करणाऱ्या पक्ष्यांत आणि मोठ्या सोन्याच्या किंवा रत्नखचित पिंजऱ्यांत कोंडलेल्या पोपटांत किती अंतर! ज्याचा ईश्वरदत्त अधिकार हा, की त्याने आपल्या सुंदर पंखांच्या बळावर हवा तिकडे अनिरुद्ध संचार करावा, नानाविध फलांचा रसास्वाद घ्यावा, स्वजनांत राहून संसारसुख अनुभवावें, त्याने टीचभर जागेंत राहून सदोदित 'लटपटपंची' करीत राहावें ही केवढी दैन्यावस्था! हीच गोष्ट राष्ट्रासहि लागू आहे. वस्तुतः पाहतां ज्या त्या राष्ट्राने आपापली व्यवस्था ठेवावी, व इतरांशीं जो संबंध ठेवावयाचा तो फक्त व्यापाराच्या वगैरेसंबंधाने ठेवावा, हा सचोटीचा मार्ग. प्रत्येक गृहस्थाने जसें आपलें घरदार, कुटुंब व जिनगी हीं सुरक्षित ठेवून आपल्या शेजाऱ्यास उपद्रव लावूं नये, ही नीति होय; त्याप्रमाणेच एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राशीं जो व्यवहार ठेवावयाचा तोहि माणुसकीस अनुसरूनच ठेवणें उचित होय. गोमाजीने उठून तिमाजीच्या घरावर दरवडा घालावा, त्याची चीजवस्तु लुटून त्याचा जीव घ्यावा, बायको उपटावी, मुलांमाणसांस बंदेगुलाम करून आपल्या घरीं न्यावें, हा प्रकार जितक्या दुष्टपणाचा व पाजीपणाचा आहे, तितकाच दुसऱ्यांच्या मुलुखावर स्वारी करणें, हजारों माणसांचे लढाईत प्राण घेणें, सारा देश उध्वस्त करून त्यास कंगाल करून सोडणें, हाहि होय. पण असें असतां आजपर्यंत जगाचा क्रम पाहिला तर काय आढळेल बरें? दुसरें काय? लठ्ठालठ्ठी, मारामारी, रक्तपात, लुटालूट, जाळून पोळून फस्त—हाच काय तो! त्यांतून ज्या वेळेस सद्धर्माचा उदय झाला नव्हता व खऱ्या देवाची ओळख कोणास नसून खोटे देवच साऱ्या

देशांतून माजले होते, शिवाय सुधारणेचा ध्वज अलीकडे जसा चोंहोंकडे फडकूं लागला आहे तशीहि जेव्हा स्थिति नव्हती, तेव्हा वरील दांडगाईचे व अन्यायाचे प्रकार जिकडे तिकडे दृष्टीस पडत असत यांत कांही नवल नाही. पण हल्ली चालू असणारें एकोणिसावें शतक हें तर सुधारणेच्यासंबंधाने पहिल्या प्रतीचा बाणा मिरवीत असतां, व या शतकांत सद्धर्माचे पवित्र प्रेषित आकाशांतली दिवटी घेऊन सारें भूमंडळ आक्रमीत असतां व येशूच्या दयामय धर्माचा जिकडे तिकडे गजर करीत असतां, कंठस्नानाचा व झोटिंगपाच्छाईचा प्रचार पहिल्यापेक्षा आता काडीभरहि कमी आहे असें नाही. हें शतक सुधारणेंत जसें सर्वांत पुढे आहे त्याप्रमाणेच रक्तपातांतहि त्याची सरशीच आहे. मागे भूमातेला तिचीं पवित्र लेकरें रक्तचंदनाचा नुसता सडा टाकून शोभवीत असत; आता तर तीं जों जों शहाणीं होत चाललीं तों तों तिला वारंवार रुधिरस्नानाची महापर्वणी लाधते! असो, तर मनुष्याचें अंतर्गत हें अद्याप पहिल्यासारखेंच मलिन आहे, व त्याचा परस्वापहरणाविषयीची जी लालसा तिचें फळ तूर्त आम्ही भोगीत आहों!

आता या एका स्वातंत्र्यनाशाच्या पायीं आमचीं कितीक नुकसानें झालीं आहेत पाहा. एक तर आमचें जगांतून अस्तित्वच नाहीसें झाल्यासारखें झालें आहे. केवळ प्राणधारण करून आम्ही आहों इतकेंच काय तें! गेल्या शतकांत हिंदु लोकांचीं राज्यें, हिंदु लोकांची संपत्ति, हिंदु लोकांची विद्या, वगैरे शब्दांचा जसा अर्थ होता तसा आता कांही राहिला आहे काय? सांप्रत आमचे लहान-मोठे सर्व राजे म्हटले म्हणजे सरासरी बुदबळांतलेच होत; हालतां नये, बोलतां नये, बडे साहेबाच्या सदोदित मुठींत, जवळ फौजफाटा म्हटला तर केवढा,-बुदबळांतलाच सरासरी प्रकार! तोहि आज कितीक दिवस सरकारच्या डोळ्यांत खुपतोच आहे! आमची संपत्ति म्हटली तर एखाद्या वेश्येपाशीं जशी असते तशा प्रकारची. कोणी वस्ताद आला आणि तोंडांत मारून घेऊं लागला तर तिचा बचाव करण्यापुरतीहि आमच्यांत ताकद नाही. रोमन लोकांनी ब्रिटन देश अचानक सोडून दिला त्याप्रमाणे जर उद्यां आम्हांवर पाळी आली तर आमच्या मुंबापुरींतल्या एकेका ढेलाची काय त्रेधा उडून जाईल बरें! चार चार घोड्यांच्या गाडींतून जीं प्रस्थें घराच्या बाहेर पडावयाचीं त्यांची हरि रामोशाशीं गांठ

पडल्यावर त्यांजवर केवढा प्रसंग गुदरेल हें सांगावयाला नकोच! दोन वर्षांपूर्वी एका यःकश्चित् दरवडेखोराने साऱ्या दक्षिणेंत केवढी धामधूम करून दिली या एका गोष्टीवरूनच आमच्यांत दिवसेंदिवस किती मर्दुमकी येत चालली आहे हें कोणाच्याहि सहज लक्षांत येणारें आहे. हाच प्रकार आमच्या विद्येचा व धर्माचाहि. आमची अलीकडील विद्वत्ता म्हणून जी आम्ही एवढ्या डौलाने मिरवतों, ती वस्तुतः पाहतां पाश्चात्य विद्येचा एक रजःकण आहे; तींत आमचें स्वतःचें बहुधा कांहीच नाही, व आहे तीहि प्रायः शब्दज्ञानात्मकच आहे. उद्या जर आमचें सरकार आम्हांस सोडून गेलें तर तिला दीड दमडीला कोण विचारील की नाही कोण जाणे! इंग्रज लोक जर आपल्या देशांतून अंतर्धान पावले तर आमच्या बड्या विद्वानांस कोणी रेल्वे एंजिन करणारा मिळेल, किंवा तारायंत्र जुळवून देणारा मिळेल याचा वानवाच वाटतो! त्याप्रमाणेच शेकडो प्रकारचे कारागीर जे आमच्या देशांत आज शेकडो वर्षें नांदत आले, ते अलीकडे जे एकामागून एक जे नाहीसे होत गेले व चालले आहेत, ते तरी पुनः उत्पन्न व्हावयाचे म्हणजे केवढी दुरापास्त गोष्ट आहे! सारांश, जसा एखादा आयतोजी असतो व त्याला पाटावर बसवून ठेवून त्याचें सर्व कामकाज दुसऱ्यांनी करावें, त्यासारखी आमची स्थिति दिवसेंदिवस होऊं पाहत आहे; असें होतां होतां लवकरच काडीचाहि वकूब नाही असे आम्ही नादान होऊन जातों की काय कोण जाणे! हल्ली आमची धर्माच्या संबंधाने कोणत्या प्रकारची स्थिति होऊन गेली आहे ती तर सांगावयाला नकोच. जुन्या धर्माची आम्हांस अतिशय लाज वाटून खिस्ती लोकांचें पोकळ अनुकरण करणें हाच ईश्वराराधनाचा व लोकनीति सुधारण्याचा काय तो मार्ग आहे असें आम्हांस वाटूं लागलें आहे.

तेव्हा एकंदरींत पाहतां आम्ही तूर्त जगांतून उठल्यासारखे झालों आहों. ज्यास आम्ही प्रथमतः थारा दिला, व जे आमच्या पुढे पुढे कित्येक दिवस करीत होते, तेच आता आमचे धनी होऊन बसले आहेत; व साऱ्या देशांतील जमीन सरकारची, जंगलांतील प्रत्येक झाड व झाडाचें पान सरकारचें, सरकारास हवे तसे कर बसविण्यास पूर्ण अधिकार आहे, व त्या पैशाचा हवा तसा विनियोग करण्यास 'केसर-ई-हिंद'चे कुलमुखत्यार

व्हाइसरॉयसाहेब यांस मुभा आहे. देशांतील लोक म्हणजे सारे बैल, त्यांस आम्ही जसें वागवूं तसें त्यांनी वागलें पाहिजे, त्यांस वस्तुतः म्हणजे कांही हक्क नाहीत, आम्ही मेहेरबानी करून काय हक्क देऊं तेवढे घेऊन त्यांनी मुकाट्याने राहावें व आमची निरंतर स्तुति गात बसावें; असें जो न करील तो राजद्रोही समजला जाईल. अशा प्रकारची एकंदर आमची हालहवाल आहे. हा सर्व प्रकार कशापासून ? तर स्वातंत्र्य गमावल्यापासून.

आता आमच्यापैकी कित्येक सुखावलेल्या मंडळींचा वरील उल्लेखावर असा आक्षेप येणार आहे की, "स्वातंत्र्य हें वस्तुतः अत्यंत इष्ट आहे खरें; पण तें आम्हांस काय उपयोगी? 'बाळमित्रां'त 'मुलें जीं स्वतंत्र व्हावयास इच्छीत होतीं' हा धडा आहे. त्यांत जशी त्या वेड्या मुलांची हौस त्यांच्या विपत्तीस कारण झाली, किंवा इस्पितळांत कोंडलेले वेडे एकदम सोडून दिले, अगर गोठ्यांतलीं गुरें मोकळीं सोडून दिलीं, तर जसा अनर्थ होईल, त्याचप्रमाणे आम्हांसारख्या मूर्ख लोकांस स्वातंत्र्य प्राप्त झालें असतां मोठा कहर गुदरणार नाही काय?" ही वेडी समजूत आजपर्यंत आमच्यांतील अर्वाचीन विद्वज्जनांनी हृदयाशीं धारण केली होती, व अद्यापहि ती सुटली आहे असें नाही. आमच्या राजकर्त्यांचा तरी बोलून दाखवावयाचा बाणा हाच की, हे हिंदुस्थानांतले सारे लोक निवळ वेडे आहेत, व यांच्यांत सामर्थ्य बिलकूल नाही. यास्तव यांचा पतकर आकाशांतील प्रभूने आमच्याकडे सोपवून दिला आहे; तर यांचा यथायोग्य प्रतिपाळ करून यांस शहाणे केलें की आम्ही चाललों, आमचें येथे काय आहे? हाच कोटिक्रम लढवून लॉर्ड डलहौसीसाहेबांनी पंजाब तोंडांत टाक, नागपूर गिळून टाक, सातारा, झांशी वगैरेंची चटणी–कोशिंबीर कर, अयोध्येच्या नबाबास गादीवरून खाली ओढ, हा आठ वर्षें सारखा सपाटा चालवला; आणि आपलीं घोर कर्मे बिचाऱ्या कॅनिंगसाहेबास पुढे निस्तारावयाला लावलीं! * तेव्हा आम्ही आपला स्वतःचा कारभार करण्यास अगदी

* **लॉर्ड डलहौसी**साहेबांनी आमच्या कल्याणार्थ आम्हांस नागवण्याचा जेव्हा एकसारखा तडाखा चालवला, तेव्हा हिंदुस्थानचे हितचिंतक म्हणविणारे आणि स्वातंत्र्याचे व सदाचरणाचे अभिमानी **मेकॉले**साहेब यांनी येणेप्रमाणे

(पुढें चालू)

नालायक आहों, व स्वातंत्र्य हें आम्हांस हितकारक न होतां उलटें अत्यंत अनिष्टप्रद होणारें आहे, हा एक मोठा मुद्दा आमच्या पाश्चात्य बंधुजनांनी

---

आपला अत्यंत संतोष प्रदर्शित केला—

" I am happy to say, that, since this passage was written, the territories both of the Rajah of Nagpore and of the king of Oudh have been added to the British dominions ( 1857 )."

—**History of England ( note ).**

लखनौ व नागपूर येथील दौलत आपल्या देशबंधूंस यथेच्छ लुटावयास सांपडली हें ऐकून आमच्या साहेबांस जे आनंदाश्रु आले ते लवकरच दुःखाश्रु झाले—

" Horrible news from India : massacres of Europeans at Delhi, and mutiny. I have no apprehensions for our Indian Empire : but this is a frightful event. Home; but had no heart for work. I cannot settle to work while the Delhi affair is undecided."

—**Life and Letters of Lord Macaulay.**

वरील दोन उताऱ्यांवरून आमचे साहेब निःपक्षपाती इतिहासकार होण्यास किती नालायक होते हें कोणासहि सहज कळून येणार आहे. इंग्रजांच्या घरांत पैसा जात असला म्हणजे, मग तो दरवडे घालून का जाईना, त्याबद्दल साहेबास आनंदच; पण त्या दरवड्यापासून पुढे जर कांही बरीवाईट गोष्ट घडून आली तर मात्र त्यांनी तेवढें हिरमुसलेलें तोंड करावयाचें ! वाः ! **मेकॉले**बुवा ! धन्य तुम्ही, तुमची नीति, तुमची स्वदेशप्रीति, आणि तुमचा ख्रिस्ती धर्म ! !

अरेरे ! गेल्या शतकांत **हेस्टिंग्स**च्या नांवाने दांत ओठ खाणारा बिचारा **बर्क**, आणि या शतकांत **डलहौसी, लिटन, बीकन्स्फील्ड्** यांचे पोवाडे गाणारा बिचारा **रॉबर्ट नाइट्** हे किती खुळे लोक बरें ! त्यांनी वरील इतिहासकारांप्रमाणे आपला संतोष बेस्यांनी कोठेच प्रदर्शित केला नाही. या निमकहरामीपणाबद्दल आकाशांतील बापाने त्यांस परलोकीं काय भयकर शासन नेमून ठेवलें असेल तें असो ! !

काढला आहे, व त्याचा अनुवाद आमचे अर्वाच्य पंडित आपल्या नेहमींच्या पद्धतीस अनुसरून आजपर्यंत करीत आले आहेत व अद्यापहि करीत आहेत.' * आता वस्तुतः पाहतां त्यांत किती अर्थ आहे याविषयी जो पूर्वापार इतिहासाकडे नजर देऊन विचार करील त्याच्यासुद्धा ध्यानांत ही गोष्ट सहज येणार आहे की, या जगांत इंग्रज लोक जर मुळींच नसते तर त्यांच्यावांचून म्हणजे आम्ही रसातळास जाऊन पोंचलों असतों असें कांही नाही; त्यांनी आमच्याकरितां येवढी तसदी घेऊन खोट्या सह्या करा, दिवसाढवळ्या दरवडे घाला, असा क्रम आरंभून या देशाचें आधिपत्य जें स्वीकारलें तें जर ते न करते, व आपल्या श्वेतद्वीपाच्या आंतल्या आंतच जर ते राहते, तर आम्ही आज कोणत्या स्थितींत असतों हें सांगावयाला नकोच. हें खरें आहे की आज जेथें आगगाड्या आहेत तेथें आमच्या जुन्या बैलगाड्याच राहत्या, व तारायंत्राच्या जागीं सांडणीस्वार किंवा जासूद हीच पुरातनची पद्धति अद्याप कायम राहती; त्याप्रमाणेच सात समुद्र जाऊन अटलांटिक्, पॅसिफिक, भूमध्यसमुद्र हेहि त्याच्या जागीं येऊन न बसते; पण हल्ली जो जिकडे तिकडे सुधारणेचा कळस दृष्टीस पडत आहे, की साहेबी बूट खाऊनहि लोक चाकरी करावयाला तयार असतां कोणास पोटभर अन्न नाही, जिकडे तिकडे रोगराई, अशक्तता, दैन्य इत्यादिकांचा प्रचार, जेथे शेंकडों हजारों वीर हां हां

* वरील विषयाचा खल नुकता झालेलाच आहे. यास्तव वरील प्रकरणीं आणखी न लिहितां अलीकडे सापडलेलें एक ताजें सर्टिफिकिट येथे दाखल करतों म्हणजे झालें:—

"India has produced in modern times as great administrators as ever existed in England: Porneah of Mysoor, and Nana Farnavese, the Mahratta minister, might claim to be on a level with the most celebrated of our English statsmen, as will be plain to any one who reads their history from the pens of the Duke of Wellington, Elphinstone and others, who, statesmen themselves, were able to discern the qualities which make a statesman."

—**The way to regain India.**

म्हणतां गोळा व्हावयाचे तेथे आता कोणास स्वप्नींहि तरवारीचें किंवा बंदुकीचें दर्शन नाही, ही दुबळेपणाची व शोचनीय स्थिति तरी आम्हांस नसती! इंग्रजांनी आपलें घोडें बेताबाताने पुढे सरकवण्यास सुरुवात केली त्या वेळीं आम्ही मुसलमानांस जिकडे तिकडे जोर करून आपल्या बाहुबळाने व बुद्धिबळाने वश करून टाकिलें होतें; चुलत्याने गिलच्यांस अटकेची पैलथडी दाखविली तों पुतण्याने दक्षिणेंत नबाबसाहेबांची व सुलतानसाहेबांची खोड मोडावी येथपर्यंत आमची मजल येऊन ठेपली होती. मग वेलस्लीसाहेबांनी परोपकारबुद्धीने मध्ये पडून शिंद्याचा मोड कर, होळकरांच्या पाठीस लाग, पेशव्यास आणून गादीवर बसव, वगैरे जे ढवळाढवळीचे प्रकार केले, व सरतेशेवटीं साऱ्यास गुंडाळून आम्ही 'केसर-इ-हिंद', हिंदुपद पादशहा हा जो ध्वजारोप केला त्याची काय जरूर होती बरें? ज्यास केवळ लोककल्याणार्थ उद्योग करावयाचा आहे त्यास येवढा खटाटोप करण्याची जरूर आहे काय? आम्हांला तर मुळींच दिसत नाही. शिवाजीमहाराजांनी आपलें सारें राज्य गुरुपदीं वाहिलें तेव्हा गुरुमहाराजांच्या जिभेला पाणी सुटून त्यांनी जर पुढील पेशवाईतला प्रकार त्याच वेळेस युक्तीयुक्तीने अंमलांत आणला असता,—म्हणजे आपली भिक्षेची कुबडी हळूच एकीकडे ठेवून देऊन समशेर हातांत घेतली असती, आणि साऱ्या फौजेवर हुकमत ठेवून 'शापादपि शरादपि'* असें सव्यसाचित्व पत्करलें असतें, आणि आपल्या शिष्यास रायगडावर किंवा साताराच्या किल्ल्यावर टाकून राज्यसुखाचे सोहळे भोगण्यास आरंभ केला असता, आणि सिंहासनावर बसून निरंतर जप काय?—

मना वासना दुष्ट कामा नये रे। मना सर्वथा पापबुद्धी नको रे॥
मना सर्वथा नीति सोडूं नको हो। मना अंतरीं सार वीचार राहो॥

असें जर झालें असतें, तर आजपर्यंत समर्थमहाराजांचा केवढा नांवलौकिक मागें राहता बरें!! आमच्या पाश्चात्य आर्यबंधूंस जर खरोखरच आमची येवढी कींव आली होती, की आम्ही आपआपसांत मारामारी करून

* वरील शब्द प्रसिद्ध भारती ब्राह्मणवीर **द्रोणाचार्य** यांच्यासंबंधाचे आहेत. यांचीं आयुधें दोन—शाप आणि शर!

विनाकारण आपलें नुकसान करून घेत आहों, किंवा काबूल-कंदाहारांतल्या दुष्ट लोकांच्या झुंडीच्या झुंडी इकडे येऊन ते या समृद्ध देशाचा धुडगूस उडवितात हेंहि जर त्यांच्याने पाहवत नव्हतें, त्या वरील राजगुरूंनी आपल्या 'शिवबा'स ऐहिक व पारलौकिक असा दोहों प्रकारचा उपदेश करण्याचा अधिकार घेतला होता तसा त्यांनी घ्यावयाचा होता; अगर वॉशिंग्टन याने आपल्या देशबांधवांस इंग्लिशांच्या त्रासापासून सोडवून स्वतंत्र केलें आणि तें महाकार्य आटपल्यावर पुनः शिंगें मोडून तो जसा वासरांत शिरला, आणि एका सुतळीच्या तोड्यालाहि न शिवतां अगदी अलिप्तपणे राहून त्याने शेवटपर्यंत कालक्रमणा केली,—तसा तरी प्रकार घडावयाचा होता! पण प्रस्तुत प्रसंगीं पाहतां वरच्यापैकी एकहि प्रकार घडला नाही. येथला प्रकार निराळाच. 'इसापनीतीं'तल्या स्वाराने जसें घोड्यास सांगितलें की, "बा रे, तूं म्हणतोस खरें, पण आता नाही माझ्याने तुला सोडवत. तूं इतका उपयोगी आहेस हें मला पूर्वी माहीत नव्हतें; तर तुझ्या पाठीवरचें खोगीर कधी निघेल ही आशा सोडून दे." मग हा प्रकार सारा धडधडीत डोळ्यापुढे दिसत असतां आम्ही हिंदुस्थानच्या कल्याणाकरितां येथे आलों आणि तें कल्याण झालें म्हणजे आम्ही येथून जाणार, हा 'मतलबसिंधु' ज्या बिचाऱ्या भोळ्याभाविकांस आजपर्यंत खरा वाटला व अद्यापहि वाटत आहे त्यांची धन्य म्हटली पाहिजे, दुसरें काय!

तेव्हा आमच्या देशावर इंग्रजांचें जें राज्य झालें आहे त्याविषयी आमचें मत तर असें आहे की, आमचें कल्याण होण्यास त्यावांचून म्हणजे दुसरा मार्गच नव्हता असें कांही नाही. आम्ही आज तीन चार हजार वर्षें जे या देशांत नांदलों, येवढालीं राज्यें चालविलीं, कायदेकानू केले, शास्त्रें निर्माण केलीं, कला उदयास आणल्या, ऐहिक व आध्यात्म विचार केले, ते सर्व या आंग्लभौम मंडळीच्याच जिवावर काय? आमच्या पोरस* राजाने जगद्विजयी शिकंदराशीं पंजाबांत टक्कर दिली तेव्हा क्लाइव्ह व वेल्स्ली-

* अलीकडे वृथाभिमानी व अल्पज्ञ इंग्रज ग्रंथकारांनी आमच्या देशाच्या संबंधाने ज्या कल्पना चोहोंकडे पसरून दिल्या आहेत व ज्या आमच्या स्वतःच्या

 (पुढे चालू)

साहेब कोणीकडे होते बरें ? आमच्या जगद्गुरूंनी बौद्धांस वादांत जर्जर करून त्यांस चिनांत व लंकेस पळवून लाविलें, त्या वेळेस रेव्हरेंड् मंडळी कोणीकडे लपून बसली होती ? महेश्वराने डमरु-नाद करून निर्मिलेली येवढी अवाढव्य गीर्वाणवाणी, पण तिलाहि गुंडाळून टाकण्यासारखीं चवदा सूत्रें प्रकट करून पाणिनीस अर्पण केलीं तेव्हा मेकॉलेसाहेबाच्या प्रपितामहांचे प्रपितामह कोणत्या स्थितींत असतील बरें ? या तर प्राचीन काळच्या गोष्टी झाल्या. त्या वेळेस आमच्या राज्यकर्त्यांचे पूर्वज जनावरांचीं कातडीं पांघरून व अंगाला रंग लावून आमच्या अर्वाचीन नाटकांतल्या विदूषकाप्रमाणे नुकते कोठे या जगाच्या रंगभूमीवर नाचूं बागडूं लागले होते हें सर्वप्रसिद्धच आहे. तेव्हा त्या वेळची गोष्ट राहूं द्या; पण अगदी अलीकडच्या काळाविषयीं जरी विचार केला तरी काय आढळेल बरें ? बापाने टाकून दिलेल्या पंधरा सोळा वर्षांच्या पोराने मावळांतल्या दऱ्याखोऱ्यांतून हिंडून वनचरांस आपले संवगडे केले, आणि यवनाक्रान्त झालेल्या भूमीचा भार हरण करण्याचा प्रचंड संकल्प योजून तानाजी मालुसरे, बाजी फसलकर, येसाजी कंक, असल्या घोंगड्या वीरांस अफझुलखां, झुल्फिकारखां, रुस्तुमखां असल्या बादशाही मंडळींशीं झुंझावयाला लावून त्यांची खा खा मोडली, आणि हिंदूंची चिरनष्ट राजसत्ता पुनः उदयास आणून मराठीशाहीची टोलेजंग इमारत उभारून दिली,—हा सर्व विभु रचतांना शिवाजीमहाराजांनी इंग्रेजी शिपाईगिरी किंवा इंग्रेजी मुत्संद्देगिरी चार हजार कोसांवरून उसनी मागून आणली होती काय ? त्याप्रमाणेच कारकुनी पेशाने वागणाऱ्या बाळाजीपंताने शाहूच्या राजमंडळांत

---

मूर्खत्वास्तव व शोधाभावास्तव आम्हीहि खऱ्या धरून चालत आलों आहों, त्यांस प्राचीन व अर्वाचीन इतिहासावरून एकंदरींत पाहतां फारच थोडा आधार मिळतो. शिकंदराचें सैन्य येवढा दिग्विजय करून पंजाबवर चालून आलें असतां तेथे त्यास कित्येक निकराच्या लढाया कराव्या लागल्या. विशेषतः पोरस राजाची हकीकत तर ग्रीसच्या इतिहासांत फारच मौजेची आढळते. ती बरीच लांब असल्यामुळे येथे देववत नाही. ही प्राच्य व पाश्चात्य आर्यांची लढाई शतद्रु नदीच्या कांठीं झाली. 'शतद्रु 'चा अपभ्रंश 'सतरंजी ' असा अलीकडे झाला आहे. हीस ग्रीस लोक 'हैडास्पीज ' म्हणत व इंग्रज लोक 'सतलज ' म्हणतात.

शिरतांच दिल्ली–अटकेपर्यंत नजर पोंचवून अवघ्या बादशाहीस आपल्या जाळ्यांत गुदरविलें आणि येवढी शिकार आपल्या देशबांधवांच्या आटोक्यांत आणून दिली, हें करतांना तरी वरील पेशव्याने आपली बुद्धि एखाद्या आंग्लभौम विद्यालयांत पाजळून घेतली होती काय? पण इतकेंहि दूर जावयाला नको. नुसत्या वीस पंचवीस वर्षांमागच्या गोष्टींकडेच अंमळ लक्ष पुरवलें असतां आम्ही कुचकामाचे आहों, आम्हीं राजकारण व युद्धकला या दोहोंविषयी अगदी अडाणी आहों आम्हांस इंग्रज लोक शिकवतील तेव्हाच आम्ही शहाणे होणार, वगैरे मूर्ख कल्पनांचा तेव्हाच ऱ्हास होणार आहे. सत्तावन सालच्या भयंकर बंडाविषयी जो शान्तपणे विचार करील (असा विचार करण्याची वेळ आता आली आहे असें म्हणण्यास हरकत नाही) त्यास त्यावरून एकंदर राष्ट्राविषयीं कोणकोणत्या कल्पना होण्यासारख्या आहेत बरें? आम्हांस कुवत नाही, धैर्य नाही, ज्ञान नाही, या कल्पना वरील सालच्या इतिहासावरून होतील काय? आता या बंडांत आमच्या लोकांच्या हातून पुष्कळ अत्यंत क्रूरपणाचीं कृत्यें घडलीं, व इंग्रेजी कवायतीपुढे त्यांचें कांही न चालून येवढा बंडावा झाला असतांहि तो लवकर मोडण्यांत आला, शिवाय अनेक इंग्लिश सरदारांचें अतुल धैर्य वरील प्रसंगीं प्रकट झालें, हें सर्व खरें; पण ब्रह्मावर्ताचा एक यःकश्चित् शागीर्द काय आणि तो 'लंडन टाइम्स' चे बातमीदार रसेलसाहेब यांच्या हातचें सर्टिफिकेट काय मिळवतो,* त्याचप्रमाणे झांशी संस्थान तें काय आणि त्याची माजी मालकीण एक रांडावलेली बाई काय, आणि तिने सर ह्यू रोज् यांच्याबरोबर सामना काय दिला!'** —तेव्हा हा सगळाच चमत्कार नव्हे काय? तो ध्यानांत आणून ज्यास आमच्या वास्तविक स्वरूपाची प्रतीति घडणार नाही त्या महापुरुषाचें डोकें कांही विचित्रच असलें पाहिजे!!

---

* अंक १२, पृष्ठ ३७, टीप [ हा शागीर्द म्हणजे तात्या टोपे, सेनापति. याच्या हालचालीची तुलना रसेलने 'Forked lightening' शीं म्हणजे विद्युल्लेखेशीं केली आहे.—**सम्पादक** ]

** वरील स्त्रीरत्न जर युरोपच्या एखाद्या देशांत निपजलें असतें तर त्याचें किती चीज झालें असतें हें सांगतां पुरवत नाही. तिजवर किती नाटकें व किती

( पुढे चालू )

तेव्हा आमच्या लिहिण्यांतील एकंदर आशय हा आहे की, आमचे राज्यकर्ते आमच्यासंबंधाने जो मोठ्या डौलाचा आव नेहमी घालीत असतात, की, तुम्ही नेणतीं लेकरें आहां, व आम्ही आता यापुढे तुम्हांला काय सज्ञान करूं ते करूं; बाकी आम्ही येथे येण्याच्या पूर्वीची तुमची स्थिति म्हणजे केवळ अज्ञानाची व रानटीपणाची होती,—हा सर्व निवळ भ्रम आहे. ज्या त्या राष्ट्राला आपापली घमंडी वाटतच असते, आणि त्यांतून एका राष्ट्राने दुसऱ्यास जिंकलें म्हणजे तर तें विजयी राष्ट्र काय म्हणेल ती पूर्वदिशा असा प्रकार होत असतो. तेव्हा याच कारणावरून वरील मत आजपर्यंत माजलें आहे. वस्तुतः पाहतां इंग्रेजांनी म्हणजे आमचा पतकर घ्यावयाला पाहिजे होता असें कांही नाही. ते जर इकडे आले नसते तर त्यामुळे आमचें कांही अहित न होतां उलटें हितच होण्याचा अतिशय संभव होता. स्पेनच्या लोकानी क्रमाक्रमाने जसें मुसलमानांस आपल्या देशांतून पार आफ्रिकेंत

---

कादंबऱ्या झाल्या असत्या, व किती इतिहासकारांनी व चरित्रकारांनी तिचा वृत्तान्त मिळवून जगास जाहीर केला असता! एका इंग्रेजी इतिहासकाराने तीस फ्रान्स देशांतील प्रसिद्ध सेनानायिका **जोन ऑफ आर्क** हिची उपमा दिली आहे. हें पुस्तक परवांच्या आगींत जळल्यामुळे त्यांतील उतारा देववत नाही. ग्रंथकाराचें व पुस्तकाचें नांव आम्हांस आठवतें तेवढें मात्र येथे दाखल करतों:— 'British India from 1757 to 1857, a book of confessions— By Torrens. M. P.'

माजी 'दंभहारका'च्या अंकांत प्रस्तुत विषयावर एक उतारा आला होता तो येथे दाखल करण्यासारखा आहे:—

Among the native rulers who have heroically resisted foreign invaders, none have shown stronger qualities than Lakshmi Baee, the Ranee, or queen, of Jhansi, whose wonderful generalship held the British army in check and who headed her troops in person, dressed as a cavalry officer and was killed on the field. Sir Hugh Rose declared that the best man on the enemy's side was the Ranee of Jhansi!

घालवून दिलें आणि अर्धचंद्राच्या जागीं मात्स्यान आपला क्रूस आणून त्यांनी चोहोंकडे स्थापित केला, त्याप्रमाणेच चालू शतकांत सारें भरतखंड निर्यवन होऊन पुनः आर्यराष्ट्राचें सार्वभौमत्व होण्याचा योग आला होता. पण आमच्या पाश्चात्य आर्यबंधूंनी छिद्रान्वेषण आरंभून भाऊबंदकी साधल्यामुळे त्याजवर विरजण पडलें !

असो, तर आम्ही स्वातंत्र्याच्या स्थितीला योग्य नाही, व तसें असल्यामुळे आमचें प्रस्तुतचें पारतंत्र्य अत्यंत हितावह होय, हीं दोन्ही मतें निवळ खोटीं आहेत असें आम्हांस वाटतें; हीं अलिकडे आमच्या हृदयाशीं खिळून गेलीं आहेत हेंच प्रस्तुत काळीं आमची स्थिति सुधारण्यास मोठें प्रतिबंधक आहे यांत संशय नाही. आधी तीरावरच ज्याने हातपाय गाळले तो काय पोहणार? रडतराव घोड्यावर कितीसे खंबीर स्वार होणार हें कोणीहि सांगेल !

पण हा सारा वाद प्रस्तुत विषयाच्या संबंधाने पाहतां गौण आहे. त्याचा खरोखरी पाहतां मागील व पुढील काळाशी जितका संबंध आहे तितका वर्तमानकाळाशीं नाही. यास्तव सध्यां ज्या स्थितिविषयीचें विवेचन आरंभलें आहे तेंच पुढे चालवूं.

वर इंग्रजी राज्यापासून आमचें कोणकोणतें अहित झालें आहे तें सामान्यतः सांगण्यांत आलेंच आहे. एक पारतंत्र्य म्हटलें म्हणजे तें दरएक ठिकाणीं नडत असतें. या गोष्टीचा प्रत्यय सध्यां या देशांतील लोकांस पदोपदीं आहे. पाहा की, आम्हीं व्यापारांत लक्ष घालूं म्हटलें तर आमचें कांही चालणार आहे काय? इकडे मोठे भगीरथ प्रयत्न करून जरी देशी माल उत्पन्न केला, तरी कायदे कौन्सिलांतून एखादा वटहुकूम सुटला की पुरे, आमचे सारे कारखाने चीत ! मँचेस्टरवाले सरकारचे देशबंधु पडल्यामुळे त्यांनी तिकडे हाकाटी करून थोडीशी उचल केली की इकडे आमचे हातपाय मोडले ! इकडे उरस्फोड करून तपांचीं तपें विद्याध्ययनांत घालवावीं आणि शेवटीं नोकरी मागितली म्हणजे आमचे चँसेलरसाहेब आम्हांस प्रेमपूर्वक उपदेश करणार की, "लाडक्यांनो, तुम्हांस आम्हीं येवढ्या औदार्याने विद्यादान जें केलें तें सरकारपुढे हात पसरण्याकरतां का रे ! अरे, तुम्हीं आपला देश सुधरावा, लोकांस सज्ञान करावें, त्यांचे हक्क त्यांस समजावून

द्यावे, आपल्या राजकर्त्यांचें निरंतर स्तुतिस्तोत्र करून आकाशांतील बापाच्या पायापाशीं त्यांच्या कल्याणार्थ डोळे मिटून प्रार्थना करावी, विलायतेस जावें, अमेरिका पालथी घालावी, जॉन्सन्सारखे ग्रंथ लिहावे, बर्क्सारखें वक्तृत्व करावें, लूथरप्रमाणे धर्मसुधारणा करावी, मंगोपार्कप्रमाणे देशाटनें करावीं—हें सर्व करावयाचें सोडून देऊन खुळ्यासारख्या चाकरीच्या रे काय नादीं लागतां ! उदरपोषण हें काय रे विद्योपासनेचें पर्यवसान ! सरकारने तुम्हांस विद्या दिली ती दिली आणि तुम्हांस नोकऱ्या देण्याचाहि पतकर त्यांनीच घेतला पाहिजे काय ? छे छे; एकूण तुम्ही या युनिव्हर्सिटी जननीस व्यर्थ शिणविल्याचें श्रेय घेऊं पाहत आहां, दुसरें कांही नाही ! !" याप्रमाणे आमच्या झगेवाल्या मंडळीच्या कानीं विद्यादेवीच्या निष्काम उपासनेचा तत्त्वोपदेश दरवर्षीं पडतो खरा; पण इकडे व्यवहारांत जों पाहावें तों त्याची प्रतीति फारशी येत नाही. जे आमचे प्रभु येथील विद्वानांस वरील ब्रह्मज्ञान शिकवतात तेच दर वर्षास वीस लाखांचा फन्ना उडवून 'कूपर्स हिल्ल्'वासी मंडळीस इकडे पाचारण करतात व आपल्या सनदी नोकरांस आगबोटीवर पाय ठेवल्यापासून तीनशें रुपयांचा तनखा चालू करतात. याखेरीज आमच्या दक्षिण विद्यालयांतील प्रसिद्ध विद्यारण्यासारखे व मागे आलेल्या एका छिन्नांगुष्ट विद्यागुरूसारखे एकेक जाडे विद्वान् विद्याखात्यावर गुदरून दिले जातात ते निराळेच ! एतावता तात्पर्य काय, की सर्वोपरी नागवलेले जे आम्ही त्या आमच्या वांट्याला वरील कोरडें ब्रह्मज्ञान; आणि ज्यांस उदरनिर्वाहाच्या शेंकडों इतर सोई आहेत ते जसे काय सरकारचे जावई; नाही तेथून त्यांची भर झाली पाहिजे !

पण पारतंत्र्यापासून होणारी सर्वांतली मोठी हानि अद्याप सांगावयाचीच राहिली आहे. ती ही की, त्यापासून मानसिक उन्नति अगदी नष्ट होऊन जाते. परवशता ही कालेंकरून ज्याच्या अंगवळणी पडते तो हळूहळू मानधनता, लज्जा, धैर्य वगैरे सद्गुणांस पारखा होत जाऊन वरच्याच्या उलट जे दुर्गुण ते त्यास सहजीं जडूं लागतात, व उत्तरोत्तर मूळ स्थितीपासून तो भ्रष्ट होत जातो. ही परमावधि हल्ली आमच्या देशांत बहुधा सर्वत्र दृष्टीस पडूं लागली आहे. जन्मास येऊन करावें काय, तर परदास्य करावें, यजमानाची खुशामत करावी, लांड्यालबाड्या कराव्या, लोकांच्या मुंड्या मुरगाळाव्या,

वरिष्ठांची थुंकी झेलून हाताखालच्यांस गांजावें, व शेवटीं पैशाच्चीं गाठोडीं उराशीं बाळगून धरून एखादे दिवशीं मरून जावें,—हें एकंदर तत्त्वज्ञान अलीकडे माजलें आलें. ' इसापनीतीं 'तील कुत्रा लांडग्यास जसा आपला सुखसोहळा निवेदन करीत आहे तशी सांप्रत बहुतेक मंडळीची स्थिति आहे. पूर्वीच्या लोकांत अकिंचन स्थितींत राहणारे, निःस्पृह, स्पष्टवक्ते अशा प्रकारचे पुरुष जसे पुष्कळ आढळत असत, तसा प्रकार आता अगदी विरळा. आता हुशार व शहाणा मनुष्य कोण, तर जो साहेबांचे बूट उचलील, वरिष्ठाने कितीहि पुष्पवृष्टि केली तरी ती जो प्रेमाने झेलील, अंगमस्तीपर्यंत वेळेनुसार येऊन ठेपली तरी ख्रिस्तप्रभूच्या उपदेशाप्रमाणे तो दुसरा गाल खुशाल पुढे करील, आपल्या यत्किंचित् स्वार्थाकरिता किंवा नुसती बहादुरी मिळविण्याकरिता जो देशाशीं मात्रागमनीपणा करतांना बिलकूल शरम बाळगणार नाही तो ! आमच्या देशांत अलीकडे विद्येचा फैलावा थोडा झाला आहे असें नाही; पण या विद्येच्या योगाने जें वास्तविक ज्ञान निष्पन्न व्हावें व जी मनाची थोरवी वाढावी, त्यांतलें अजून कांहीच दृष्टीस पडूं लागलें नाही असें म्हणावयास हरकत नाही. त्यांतून इंग्रजी विद्या ही तर वस्तुतः पाहतां वाघिणीसारखी आहे; तिच्या दुधावर जो पोसला तो लेंचापेंचा कधींच निपजूं नये.* उत्साह, धैर्य, अश्लाघ्य कर्माचा तिरस्कार, स्वावलंबन इत्यादि उदात्त गुण वरील भाषेतील ग्रंथाच्या अध्ययनापासून उत्पन्न होणारे आहेत. पण आजपर्यंतच्या तऱ्हेवाईक शिक्षणपद्धतीने म्हणा, अगर तितका संस्कार आमचे ठायीं अद्याप बिंबला नसल्यामुळे म्हणा, वरील गुणांचा उदय अद्याप तर कांहीच झालेला दृष्टीस पडत नाही. जिकडे पाहावें तिकडे ' हां जी ', ' जी हां ', ' खुदावंत ', ' खाविंद ' हाच श्ववृत्तीचा प्रकार नजरेस येतो. यःकश्चित् मराठी कारकुनापासून तों म्युनिसिपल कमिशनर, कौन्सिलर, दिवाणसाहेब यांच्यापर्यंत एक मासला;—खाविंदचरणारविंदीं मिलिंदायमान होणारी सारी मिंधी मंडळी ! बाकी सभेंत

---

* इंग्रेजी भाषा शिकल्यापासून केवढा फायदा आहे व या भाषेच्या अध्ययनाने फ्रेंच लोकांची स्थिति एकदम किती सुधारली, हें ज्यास माहीत करून घेणें असेल त्याने **बकल्**चा इतिहास भाग २, खंड ५, हें वाचावें.

उभें राहून नुसतें मुखपांडित्य करायला सांगा, त्यांत ज्याची त्याची तयारी यंव करावें, त्यंव करावें;—चुटक्यांच्या मांडवाला किती उशीर? पण अंग मोडून मेहनत करण्याची पाळी येऊं द्या; किंवा पदरचा एखादा पैसा खर्च करण्याची मात्र वेळ यावी, म्हणजे 'इसापनीतीं'तील सांबराची अवस्था! कुत्र्यांचा शब्द कानीं पडतांच वरील सांबराची जशी गाळण व्हावयाची, त्याप्रमाणे वरील अवसानघातकी वीरांचा आव! एकंदर एका संस्कृत कवीने वेदान्ताच्या संबंधाने जें विनोदाने म्हटलें आहे तेंच आमच्या फाकड्या मंडळींस लागू पडतें—

**वागुच्चारोत्सवं मात्रं तत्क्रियां कर्तुमक्षमाः।**
**कलौ वेदान्तिनो भान्ति फाल्गुने बालका इव ॥**

---

देशोन्नति ऊर्फ सुधारणा म्हणजे काय, या गोष्टीचा पोक्तपणे विचार करण्याचा काळ संपत आला आहे असें म्हणण्यास हरकत नाही. कारण आजपर्यंत आमचा जो काळ गेला तो सामान्यतः बाल्यावस्थेंत गेला असें म्हटलें असतां चालेल. पाहा की, आज साऱ्या जगांत ज्या नव्या सुधारणेचा प्रकाश फाकला आहे, व दिवसेंदिवस अधिक फाकत चालला आहे, ती गेल्या पांचपन्नास वर्षांत या लोकांस अगदीच अपूर्व असल्यामुळे, ते बिचारे अगदीच भांबावून गेल्यासारखे झाले होते. आमच्या पाश्चात्य बंधूंच्या अश्रुतपूर्व कलाकौशल्याच्या व विद्येच्या प्रभावाने आम्हांस आमचे नामधारी जे अमेरिकन इंडियन लोक त्यांच्यासारखेंच चकित करून सोडलें होतें. वरील पातालवासी लोक जसे स्पेनच्या लोकांचीं अवजारें बंदुका वगैरे सामग्री पाहून त्यांस स्वर्गाहून आलेलीं माणसें समजूं लागले, त्याप्रमाणेच आमची भांबावलेली मंडळीहि, आपल्या राज्यकर्त्यांच्या अजब कृतीने आश्चर्यस्तब्ध होऊन 'इंग्रजाने कुडींत जीव घालण्याचा मात्र ठेवला आहे, बाकी सर्व कांही केलें आहे.' असें म्हणूं लागली होती; कुणब्या–माळयांच्या व बायकापोरांच्या तोंडींसुद्धा 'टोपीवाल्याने केला कावा, आगीनगाडी घेते धावा' अशीं आश्चर्यप्रेरित गीतें गोंवून बसलीं होतीं. तेव्हा आजपर्यंत इंग्रज लोकांविषयी व त्यांच्या सुधारणेविषयी आमच्या मनांत एकेक विलक्षण कल्पना उद्भवून, हे कोणी अमानुष स्थितींतले प्राणी आहेत, व त्यांच्यापुढे आम्ही कोण 'कीटश्वकोटायते' असे क्षुद्र प्राणी आहों, अशा समजुती दृढ होऊन बसल्या होत्या.

पण अलीकडे आमचें आमच्या राज्यकर्त्यांशीं जें अधिकाधिक दळणवळण पडूं लागलें आहे, व विशेषतः इंग्रेजी भाषेच्या ज्ञानामुळे त्यांच्या स्तिथीचें यथार्थ स्वरूप आम्हांस समजण्यास जो मार्ग झाला आहे, त्याच्या योगाने मागला बाऊ आता दिवसेंदिवस कमी कमी होत चालला आहे; व इंग्रेज लोक आम्हांसारखींच माणसें आहेत, व त्यांस देवाने कांही दोन

कान आमच्याहून अधिक दिलेले नाहीत, असें आता आम्हांस कळून येत चाललें आहे. आमच्यांत जसे बरेवाईट, शहाणे–मूर्ख वगैरे लोक आहेत, व आमच्यांतले आचारविचार जसे कांही निंद्य व कांही स्तुत्य असे आहेत, तसाच प्रकार इंग्रेज लोकांतहि आहे, असें आता सर्वांस कळूं लागलें आहे. यामुळेच इंग्रजांचें सर्वथा अनुकरण करणें म्हणजे शहाणपणाची व सुखाची परमावधि झाली, अशी जी समज आरंभीं दृष्टीस पडत होती, व अद्यापहि क्वचित् दृष्टीस पडते, तीहि अलीकडे पुष्कळ पालटली आहे. शिवाय अलीकडे महाराष्ट्र भाषेचें व संस्कृतीचेंहि ज्ञान लोकांत फैलावत चालल्यामुळे व पूर्वीच्या गोष्टीचा थोडाफार विचार होऊं लागल्यामुळे, वरील इंग्रजी तत्त्वज्ञानास बराच धक्का पोंचला असून आम्ही केवळ रानटी नाही, असें दिवसेंदिवस आमच्या प्रत्ययास येत चाललें आहे. असो; एकंदरींत प्रस्तुत काळाचा हा महिमा आहे, की पूर्वीची सुधारणा व नवी सुधारणा या दोहोंचें यथार्थ स्वरूप काय आहे, हें समजून घेण्याकडे आज सर्वांचें लक्ष जाऊं लागलें आहे.

यास्तव आता सुधारणा म्हणजे काय, व देशोन्नतीचें स्वरूप कसें असतें, याविषयी शान्तपणे विचार करणें फार अगत्याचें आहे. वरील दोन शब्दांचा अर्थ राष्ट्राची उत्तम स्थिति हा होय, हें उघड आहे. आता, काय असलें म्हणजे राष्ट्र उत्तम स्थितींत आहे असें म्हणावयाचें, हें आपण प्रथम ठरवूं या.

वरील उत्तम स्थितीचें पहिलें लक्षण देशाभिमान होय असें आम्ही समजतों. घन पदार्थांत जसें दार्ढ्य आढळतें, म्हणजे त्यांतील परमाणु अगदी परस्परसंलग्न असतात, त्याप्रमाणेच राष्ट्रांतील लोकसमुदाय हा वरील अभिमानाच्या योगाने जितका जितका एकत्र जखडला गेला असेल, तितकी त्याची उन्नतावस्था समजली पाहिजे. ज्या देशांत आपण जन्मास आलों व जेथला सहवास आपणांस पहिल्यापासून जडला, तेथल्या गोष्टींवर आपलें प्रेम जडणें व त्याविषयी अभिमान वाटणें हें अगदी साहजिक आहे. यास्तव अत्यंत अज्ञानावस्थेंतल्या राष्ट्रांतहि देशाभिमानी वृत्ति पराकाष्ठेची प्रबळ आढळते. आपल्या घरांत शिरून जर कोणी आपणांस लुटूं लागला तर तें जसें घरच्या मालकास पाहवणार नाही, त्याप्रमाणेच आपल्या मुलुखावर गनीम चालून आला

असतां त्याशीं सामना करायला उभें राहणें व त्याला माघारीं पिटून लावणें, या गोष्टीहि राष्ट्राच्या आद्यावस्थेंत अगदी सहज असतात. परवां अफगाणीस्थानांत किंवा झुलू लोकांच्या मुलुखांत कोणी डिमॉस्थेनिस अगर सिसरो पुढे येऊन त्यास सभाग्रस्थानीं पांडित्य करावें लागलें नाही. प्रत्येक अफगाणाच्या व झुलूच्या अंगीं हा उपदेश जन्मतःच खिळलेला, की आपल्या देशांत जो जबरदस्तीने घुसायला पाहील त्याच्या अंगावर चालून जाऊन त्याला जागच्याजागीं चीत करावा, किंवा तें नच होईल तर निदान त्याला पिटून बाहेर घालवावा. साऱ्या जगाच्या इतिहासांत हीच गोष्ट नजरेस येते. ग्रीक लोक तर अर्धेमुर्धे रानटीच होते, तरी प्राचीन पारसीक लोकांशीं त्यांनी असे घनघोर संग्राम केले, की अजूनहि सारें जग त्याचा वृत्तान्त वाचून तोंडांत बोट घालून राहतें ! केवढी पारस देशाच्या राजाची चक्रवर्ती सत्ता, आणि ग्रीस देशांतलीं बारीकसारीक संस्थानें म्हणजे काय कथा !—सिंहमूषक न्यायाने सहज चिरडून जाण्याजोगा ! पण वीस लाख फौज व बाराशें जहाजांचा तांडा, या सर्वांचा अथेन्स व स्पार्टा या चिमुकल्या संस्थानांनी पार धुव्वा उडवून दिला ! याप्रमाणेच रोमन लोकांची अव्वलची हकीकत. एवढा कार्थेजचा सरदार हानिबाल, की ज्याने आपल्या सैन्यासह पहाडांवरून शत्रूच्या मुलुखावर चढाई केली, व दोनचार लढायांतच रोमची फौज अशी चीत करून टाकिली की, शहराच्या तटबंदीपुरतीहि शिबंदी जाग्यावर राहिली नाही. पण धन्य ते रोमन लोक !—की एकजण तरी तसल्या भयंकर स्थितींत शत्रूच्या गोटांत तहाचें बोलणें लावावयास जावयाचा होता ! तहाचें बोलणें तर दूरच, पण सेनेट सभेने ताबडतोब असा ठराव केला की, जो कोणी सभेंत तहाची गोष्ट बोलेल त्यास ठार करून टाकलें जाईल. वरील राष्ट्राच्या आरंभीच्या या हकीकती; पण तेथेच पुढे काय चमत्कार दृष्टीस पडूं लागले पाहा ! ज्या ग्रीक लोकांच्या खातरेस वीस लाख लष्कर नव्हतें, तेच पुढे असे पोंचट व निगरगट्ट होऊन बसले की डिमॉसथेनिससारख्या अद्वितीय वक्त्याने त्यांच्या कानींकपाळीं ओरडण्याची आपणाकडून पुरेवाट केली तरी कांही उपयोग झाला नाही. त्याचप्रमाणे वर सांगितलेले दगडाच्या छातीचे जे रोमन लोक, त्यांच्याहि सार्वभौम राज्यांत अशी बेबंदशाही माजली, की सैन्यांतील लोकांनी आज एकाला बादशहा बनवावा व उद्या

त्याच जागीं दुसरें बाहुलें उभें करावें ! तर राष्ट्राच्या व्यवस्थेंत कालेंकरून असे विलक्षण फेरफार झालेले आढळतात.

मागील खेपेस ग्रीस व रोम येथील लोकांचा आवेश पुढे कसा ढिला पडत गेला हें दाखविलेंच आहे; हाच प्रकार सर्व राष्ट्रांतूनहि कसा आढळतो हें दाखवावयाचें. आमच्या देशांत मुसलमानांच्या व मराठ्यांच्या इतिहासाकडे लक्ष पुरविलें असतां वरील गोष्टीची फार चांगली प्रचीति येते. बाबरच्या वेळचे मूळ झाडापासून तुटलेले जे मोंगल हिंदुस्थानांत येऊन थडकले, त्यांची स्थिति कोणीकडे? आणि औरंगजेबाच्या सरंजामी लष्करांतले तिस्मारखान, की ज्यांस धनाजीचें किंवा संताजीचें नांव ऐकिलें की कापरें भरे, ते कोणीकडे? त्याप्रमाणेच शिवाजीमहाराजांचे सिंहगड ओळकंबणारे व दिवसाढवळ्या सहा दिवस खुशाल सुरत शहर लुटणारे पठ्ठे कोणीकडे? आणि रावबाजीच्या पळपुट्या लष्करांतील—'ज्यासि मिळेना भाकर अर्धी। त्यासि बसाया घोडी जर्दी।'—अशा वसुलाचे जे एकेक महावीर होते, ते कोणीकडे? आता एवढें विलक्षण स्थित्यंतर प्रत्येक राष्ट्रांत कां आढळतें, याचा जर विचार केला तर यास कारण संपत्ति व ऐषआराम हें कोण्याच्याहि लक्षांत येईल. सामान्यतः जगांत हा अनुभव सर्वांस माहीत आहे, की उन्हाळ्यांत खपणाऱ्या कुणब्याची शरीरप्रकृति कशी धडधाकट असते. आपल्या भाषेंत म्हण आहे, की 'रानचा वारा आणि घरचा चारा' याची बरोबरी कशाने होणार नाही. याच न्यायाने जें राष्ट्र आरंभीं भुकेकंगाल असतें व ज्यास ऐषआरामाची चट लागलेली नसते, तें शूर, बाणेदार, अल्पसंतुष्ट, नेकीदार अशा प्रकारचें असतें. त्यास शिवाजी-सारखा किंवा बाबरासारखा कोणी म्होरप्या मिळाला की पुरे ! तें लागलीच वावटळीसारखें किंवा वणव्यासारखें पसरत जातें! पण कांही काळाने तीच स्थिति अगदी बदलून जाते. ज्यास खावयाची भ्रान्त असते त्यास यथास्थित खुराक मिळूं लागला, किंवा ज्याच्या हातास सोन्यारुप्याचाहि विटाळ झालेला नसतो त्यांच्या अंगावर रत्नें चमकूं लागलीं, म्हणजे मग पहिलें बारें गेलें ! पहिले बाजीरावसाहेब आपल्या परशुराम क्षेत्रांतल्या अळवाच्या भाजीची व ताकभाताची ओळख विसरले नव्हते. तेव्हां वेळ पडल्यास हुरडा व लोटाभर पाणी एवढेंच त्यांस बस होत असे. अशा सरंजामानिशीं

त्यांनी दाभाड्याची खोड जिरविली, सुभेदारसाहेबास जेरीस आणलें, आणि दिल्लीपतीस आपल्या मुठींत वागवून, नादीरशहासारख्यास आल्या वाटेने परत जावयास लाविलें! पण तीच पुढे रावबाजीची मिजास काय वाढली व तिचा परिणाम काय झाला पाहा! आपल्या पूर्वजांनी थोर कमाई कशी केली, व आपल्या आजा-पणजांची मूळ काय स्थिति होती, ती त्या बेटयाच्या कधी स्वप्नींहि वागली नाही. राज्य म्हणजे त्याची कल्पना काय, तर ब्राह्मण-भोजन, स्त्रियांचा आखाडा, हवें त्यास लुटण्याची व ठार मारण्याची मुभा! मग असले राजश्री लवकरच सारा बखेडा करून भागीरथीच्या तीरीं लवकरच स्नानसंध्या व पितृतर्पण करावयास जाऊन बसले यांत नवल ते कोणतें? तर राष्ट्रास उतरती कळा लागण्यास व देशाभिमान क्रमाक्रमाने विगलित होण्यास वर सांगितलेली अपार संपत्ति व तिचा उपभोग हींच कारण होत. कोणत्याहि राष्ट्रांत आरंभीं जे शौर्यादि सद्गुण असतात, त्यांच्या जोरावर त्यास संपत्तीचा लोभ सुटून, तिची उत्तरोत्तर समृद्धि होत चालली व ऐषआराम वाढला की हळूहळू पहिली तरतरी कमी होत जाते; आणि तोच क्रम पुढे चालतां चालतां अशी अवस्था येऊन पोंचते की, आपला एकटयाचा तळीराम चांगला गार होतो आहे ना? मग बुडेना आपला देश, होईना परकी लोकांचा अंमल; जाईना आपली व आपल्या देशाची अब्रू, करा फितूर, कांही फिकीर नाही!— अशा प्रकारचे लाल देशांत निर्माण होतात व हालकोलाहाल देश सफाई बुडतात! असले नराधम आमच्या देशांत कित्येक होऊन गेले असल्यामुळे त्यांच्या कृतीनेच आम्ही असल्या लाजिरवाण्या स्थितीस येऊन पोंचलों आहों, हें कोणास सांगावयास नकोच! रोमन लोकांत दंगेखोरांस टार्पिया नांवाच्या टेकडी-वरून कडेलोट करीत असत; तसलीच शिक्षा असल्या मातृगामी नरपशूंस पाहिजे! पण लोक एकदां हतवीर्य, अभिमानशून्य, व पोंचट होऊन गेले म्हणजे मग कांही नाही. हीच स्थिति हल्ली आमच्या घरीं ढळढळीत प्रत्ययास येत चालली आहे. ज्या शहरांत रामशास्त्र्यांसारखे राजकार्यधुरंधरांस देहान्त प्रायश्चित्ताचा रोकडा जबाब तोंडावर सांगणारे, व चापाजी टिळेकरा-सारखे स्वामिभक्त्यर्थ प्राण खर्चणारे होऊन गेले, तेथे आजची हालहवाल काय म्हणाल?—तर लेडी फर्ग्युसनच्या मरणाबद्दल फुकाचे दोन अश्रू

टाकावयाचे तर तेसुद्धा On Her Majesty's Service Only अशा राजमुद्रेचा परवाना जेव्हा हातांत पडेल तेव्हा टाकावयाचे; नाही तर डायरेक्टरसाहेबांकडून थप्पड आली तर करता काय? ते म्हणतील की, साऱ्या मुलखांतली बदमाष जी सार्वजनिक सभा, तिच्यासारखे तुम्ही जर असले चार करायला लागलां तर आमच्या कामास पडावयाचें नाही! नुसत्या रडण्याच्या कामांत इतकी बहादुरी! मग असले रडतराव देशहिताच्या व मर्दुमकीच्या कामांत तर कितीसा दम धरतील हें दिसतेंच आहे! इंग्रेजी विद्येचा महिमा साऱ्या भूमंडळावर काय गाजतो आहे पहा! तिचें सेवन म्हणजे वाघिणीचें दूध पिणें म्हणतात. पण या दुधावर पोसपोसून येथे पाहावें तों निवळ भेषपात्र मंडळी निपजते आहे! कौपरसाहेब आपल्या जन्मभूमीची थोरवी गातात, की तिचा वारा लागतांच गुलामांचे बंध मोकळे होतात; आणि इकडे वरील वारा लागला असतां असले वीरभद्र निर्माण होतात की, कोणी यःकश्चित् का असेना, ते त्याला वांकलेच! आमच्यांत कित्येक आडनांवी रावबहादुर तर इतके राजभक्त बनलेले आहेत, की सांजसकाळ रखाद्या गौरकायापुढे लांगूलचालन केल्याखेरीज त्या ग्रामसिंहास तुकडा गोडच लागावयाचा नाही. त्यांतून लोकहिताचें कार्य कोणी उभारलें आणि वालत्या गाड्याला खीळ घालावयाची संधि आली, की असली पर्वणी तर ही खाशी मंडळी कधीच फुकट जाऊं द्यावयाची नाही. विश्रामबागेचा जीर्णोद्धार करून तेथे लायब्ररीचा समावेश करावा असा कोणी संकल्प प्रकट केला की पुरे—उठले एकेक रावसाहेब झक् मारायला. जकातीच्या बाबतींत कोणी उठावणी केली, की ती हाणून पाडायला दुसरे गोंडस सभासद सज्ज होऊन बसलेलेच! पण यांत नवल कसलें? पंडितांनी म्हणून ठेवलेंच आहे—

**तें श्वान एक तुकड्यास्तव चार नाना**
**दावी धन्यास जठरार्थ कसें पहाना?**

मग या श्वानांच्या गळ्यांतील पट्ट्यांवरून रा. सा., रा. ब. किंवा के. सी. आय्. अशीं अक्षरें झळकत असलीं तरी श्वत्वाचा परिहार कसा होणार? 'केसरी' राजास अशा किताबतीची मुळीच पर्वा नाही. म्हटलें आहे—

**‘नाभिषेको न संस्कारः सिंहस्य क्रियते मृगैः ।**
**विक्रमार्जितराज्यस्य स्वयमेव मृगेंद्रता ॥’**

“सारे मृग मिळून सिंहास राज्याभिषेक करतात, किंवा इतर कांही संस्कार करतात, असें नाही; तर त्याचें मृगेंद्रत्व त्याच्या नैसर्गिक पराक्रमावरूनच सिद्ध होतें.”

गेल्या शंभर वर्षांत आमच्या देशाची काय दशा उडाली तिच्याविषयी जो कोणी विचार करील त्याच्या लक्षांत ही गोष्ट सहज येईल की, इतक्या अवधींत आम्ही होतां होतां अगदींच निःसत्त्व होऊन गेलों आहों. व्यक्तिभूत मनुष्यांत किंवा राष्ट्रांत एक जातीचा पीळ असावा लागतो; क्रमाक्रमाने आमच्यांतून तूर्त तो अगदी नाहीसारखा झाला आहे. इतर कोणत्याहि देशांतल्या मनुष्याच्या थोबाडींत दिली असता तो परत थोबाडींत दिल्यावांचून राहणार नाही; आमच्या येथे मात्र येशू ख्रिस्तप्रणीत जें सूत्र, की कोणी एका गालावर मारलें असता दुसरा पुढे करावा, तें पूर्ण लागू पडतें. ही नीचावस्था दीर्घकालिक स्वस्थतेने व आमच्या सरकारच्या काव्याने आम्हांस प्राप्त झाली आहे यांत संशय नाही; पण या अभिमानशून्यतेस आणखी बरींच कारणें झालीं आहेत त्यांचाहि येथे उल्लेख करणें अवश्य आहे.

प्रथमतः ही मोठी गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे की इकडील देशांतून देशाभिमान ही मनोवृत्तीच म्हणण्यासारखी लोकांस माहीत नाही. रोम, ग्रीस, इंग्लंड, अमेरिका वगैरे ठिकाणीं स्वदेशप्रीति म्हणून एक अत्यंत प्रबळ मनोवृत्ति जशी आजला आढळत आहे, तशी आशिया खंडांतील कोणत्याहि देशांत आढळत नाही. सन १८५७ सालीं एकदम साठ पलटणी उठून त्या स्वातंत्र्याचा झेंडा उभारतात, पण या झेंड्यांत व इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका येथील बंडांत अतिशयित अंतर आहे. वरील तिन्ही देशांतील दंगे करांच्या बाबतीवरून झाले, आणि इकडे इ. स. १८०७ व १८५७ सालीं बंडें झालीं त्यांस कारण देशाभिमान बिलकुल नसून केवळ धर्माभिमान होय! ‘काडतुस’ या एका शब्दाने सारा बंगाल इलाखा एका क्षणांत पेटवून दिला, पण इतकी काळी फौज जी एकाएकीं बिथरली, तिच्यापैकी एकाहि शिपायाच्या अंगीं हॅम्डन किंवा वॉशिंग्टन यांच्या अंगांतला आवेश संचारला असेल असें

बिलकुल म्हणवत नाहीं. फार कशाला! सध्यां आमची व करवीरस्थ आडनांवी 'बरव्या' राजश्रींची झुंज लागली आहे; परिणाम कांहीहि होवो, त्याजविषयी आम्ही बिलकुल फिकीर करीत नाही; कां की खरा शूर आहे तो लग्नकुंडली वर्तवून कांही लढाईस जात नसतो, व 'पराभवोप्युत्सव एव मानिनाम्' हीच त्याची जयापजयाविषयी उदासीनता असते; शत्रु दिसला की घुसून जावें एवढीच खबर तो ठेवीत असतो; हें ध्यानांत ठेवूनच आमचीहि स्वतःची तयारी आहे! पण स्वातंत्र्यसूर्याचा केव्हाच अस्त होऊन पराधीनतान्धकारांत फार दिवस चांचपडत पडलेल्या व तदनुरूप ज्याच्या सर्व मनोवृत्ति बनून राहिलेल्या अशा जनसमूहाच्या एकेक कोट्या ऐकाव्या म्हणजे धन्य वाटतें! त्यांचा कोटिक्रम येणेंप्रमाणे!—' कोल्हापूरचा महाराज! आपल्याला काय त्यांच्याशीं करावयाचें आहे? हीं राजकीय प्रकरणें, यांत आपल्यासारख्या गरीब पत्रकर्त्यांनी कशाला पडावें? लष्करच्या भाकरी भाजल्यावांचून आपलें काय अडलें आहे? शाळा चालवा, वर्तमानपत्रें चालवा, आणि सतरा हिसके पुणें–मुंबई, मुंबई–पुणें असे घाला, हजारों रुपये खर्च करा, लोकांपुढे भिक्षां देहि मागा, व शेवटी ब्यांकच्या खटल्याप्रमाणे सारेंच ओंफस् झालें किंवा एखाद्याच्या अंगावर बलामत आली म्हणजे पंचाईतच की नाही? स्वस्थ स्वाविंदचरणारविंदीं ' हरि हरि ' म्हणत बसावयाचें सोडून, या छोटेखानी मंडळीने काय हा नसता उपद्व्याप आरंभिला आहे बरें? ' इ. इ. इ. वरच्यासारखें पोक्त तत्त्वज्ञान आमच्या वाचकापैकी शेंकडों किंवा हजारों जणांनी ऐकिलें असेल!—तर हीच स्थिति आजपर्यंत आमच्या देशांत चालत आली आहे. लोकांस अभिमानास चढावयाची बाजू कोणती?—तर यज्ञोपवीत, गोब्राह्मण इत्यादि. स्वातंत्र्य, जन्मभूमि, या शब्दांत वरच्यासारखा प्रभाव प्राच्य देशांत थोडाच आढळतो!

आमच्या देशांत जन्मभूमीचा अभिमान शिथिल होण्यास, या राष्ट्राचें विस्तीर्णत्व व जातिभेद हीं दोन मोठीं कारणें झालीं आहेत. सिंधुनदाकडचा मुलुख व त्रावणकोर, तसेंच कोकण आणि बंगाल हे प्रान्त परस्परांच्या संबंधाने म्हटलें म्हणजे, आम्ही व आमचे पातालवासी अमेरिकन यांच्यासारखेच होत. आतां दोघांची अगदीच फाटाफूट आहे म्हटलें असतां चालेल. कां की, विद्या, देशाचार, रीतिरिवाज यांच्या संबंधाने पाहतां, असले परस्पर विप्रकृष्ट

प्रान्त म्हटले म्हणजे भिन्न भिन्न देशच होत. मग अशांच्यामध्ये ऐकमत्व कितीसें उत्पन्न होणार? ही एक गोष्ट झाली; दुसरा प्रकार जातिभेदाचा. याने तर राष्ट्राची फूट अतिशय पाडली आहे. अठरा पगड जातींस अठरा टोपकरांनी गुंडाळून टाकलें, व साऱ्यांच्या हातीं सारखीच करवंटी दिली; पण लोकांचे डोळे अजून उघडत नाहीत. शेणवी म्हणतात, आम्ही षट्कर्मी; ब्राह्मण म्हणतात, तुम्ही त्रिकर्मी; आणि वस्तुतः पाहतां या भांडणारांमध्ये असे शेंकडों सापडतील की ज्यांस एकाहि कर्माची ओळख नाही येऊन जाऊन कलहकर्मांत मात्र टोंघे पटाईत! पण षट्कर्माच्या व त्रिकर्माच्या वादास कंटाळून बिचारे ब्राह्मण तर परद्वीपस्थ झाले, आणि टेम्स व रेणा यांच्या तीरांच्या आश्रयाने जाऊन राहिले, या गोष्टीची दोघांहि पक्षकारांस शुद्ध नाही!

असो, तर वरील निरनिराळ्या कारणांनी हा देश पूर्वोक्त मनोवृत्तीस अगदी पारखा होऊन गेला आहे. आता यास तोड काय, याचा थोडा विचार येथे करूं.

पहिली तोड ही की, ज्या पाश्चात्य लोकांनी हा देश इतका काळपावेतों पादाक्रान्त करून टाकला आहे, त्याच्यापासूनच ही गुरुकिल्ली आपण घेतली पाहिजे. त्यांचे इतिहास वाचून, त्यांचा सहवास करून, व त्यांच्या उलाढालींकडे सतत लक्ष पुरवून, आम्ही किती गचाळ लोक झालों आहों याची प्रचीति आपल्या ठिकाणीं बाणली पाहिजे. ती बाणली असतां, 'लोहपरीस'-न्यायाने आमचे नादान लोकहि कालेंकरून बाणेदार होतील असा संभव आहे. त्याचप्रमाणे अलीकडे सारें भरतखंड एक राष्ट्र बनलें आहे. यास्तव कालयोगेंकरून या अठरा धातूंचीहि चांगली मूस बनून, सर्वांस साधारण जो देश त्याविषयी अभिमानवृत्ति सर्वांच्या हृदयांत स्फुरूं लागणें हेंहि असंभवनीय आहे असें नाही. याशिवाय, सांप्रत हास्यप्रद होऊन राहिलेला जो जातिभेद, त्याच्यासंबंधाचा वेडगळपणाचा पीळहि कमी कमी होत जाऊन, या देशांतलि सगळया जाति देशबंधुत्वाच्या थोरल्या नात्यांत अंतर्भूत होऊन, बारीकसारीक क्षुद्र भेदांची मातब्बरी लोक तादृश धरणार नाहीत, व एकोप्यापासून सर्वांचें किती हित आहे हें दिवसेंदिवस अधिकाधिक समजूं लागतील, अशीहि दृढतर आशा आहे.

---

## गोपाळ गणेश आगरकर, एम्. ए. (१८५६–१८९५)

'आगरकर म्हणजे सुधारक आणि सुधारक म्हणजेच आगरकर' असें समीकरण लाभण्याचें भाग्य फारच थोड्या वर्तमानपत्रकारांना लाभत असेल. लोककल्याणासाठी आयुष्य वाहून घेण्याचा जो संकल्प त्यांनी केला तो त्यांनी शाळा-कॉलेज व वृत्तपत्रें यांच्या द्वारें आमरण कसोशीने पाळला. फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल, 'केसरी' व 'सुधारका'चे आद्य संपादक, यापेक्षाहि 'कर्ते समाजसुधारक व द्रष्टे निबंधकार' म्हणूनच ते लोकविख्यात आहेत. आगरकर म्हणजे 'देव न मानणारे देवमाणूस'. त्यांनी देवाचें व दैवाचें प्राबल्य कमी करून मानव्य व प्रयत्न यांचा पुरस्कार केला. आगरकरांनी राष्ट्रवादाच्या जोडीस बुद्धिप्रामाण्याने विश्ववाद आणला, 'विवेकयुगाचें प्रवर्तन' केलें, परमार्थ व रूढि यांनी निष्क्रिय बनलेल्या समाजाला ऐहिक जडवाद समजावून दिला. व्यक्तिस्वातंत्र्य व समाजबंधन यांच्या सापेक्ष मर्यादा स्पष्ट करून 'स्त्री-शिक्षण, स्त्री-विवाह व स्त्री-स्वातंत्र्य' यांचें महत्त्व पटवून दिलें, समाजाच्या प्रगतीला थोपवून धरणारे जीर्ण रूढीचे तट तर्ककर्कश व तर्कशुद्ध विचारसरणीने उडवून दिले; धार्मिक व आर्थिक विषमतेने जर्जर झालेल्या समाजपुरुषाला नवा धर्म व साम्यवाद यांचें दर्शन घडवून उत्साही केलें; आणि समता, स्वातंत्र्य, न्याय, व नीति या चतुःसूत्रीने नवा माणूस तयार करून दिला.

‘ इष्ट असेल तें बोलणार व साध्य असेल तें साधणार ’ ही निर्भीड घोषणा करणाऱ्या या ध्येयनिष्ठ झुंजाराच्या लेखणींत ओजोगुण आढळला तर नवल नाही. पण या ओजाच्या जोडीस आलंकारिकपणा व लालित्य यांचीहि जोड आहे. यांची भाषा प्रौढ व पंडिती वळणाची आहे; आणि तिच्यांत नवे विचार पेलून धरण्याचें सामर्थ्य व कसबहि आहे. सनातनी लोकांवर ती कधी अभिनिवेशाने गर्जत जाईल तर कधी मर्मभेदक उपहासाने शस्त्र चालवील; कधी युक्तिवाद तर कधी भावनोत्कटता अशा तऱ्हेने ती प्रतिपक्षीयांना वश करून घेण्याचा प्रयत्न करील. आगरकरांच्या शैलीचें स्वरूप हें असें आहे.

राजकीय स्वातंत्र्याला प्राधान्य दिल्यामुळे सामाजिक प्रश्नांबाबत लोकांना न दुखविण्याची व्यावहारिक भूमिका आगरकरांना पटली नाही. सामाजिक सुधारणेंतच व्यक्तिस्वातंत्र्य व राष्ट्रस्वातंत्र्य यांचीं बीजें आहेत असें त्यांना वाटलें. आणि याच मतभेदांतून ‘ सुधारका ’चा जन्म झाला तात्त्विक मतभेद होऊनहि समाजकल्याणाचा संकल्प सोडवणाऱ्या या दोन द्रष्ट्यांच्या मनांत एकमेकांबद्दल वाटणारा आदर त्यांच्या थोर व्यक्तिमत्वाची ओळख करून देईल. रक्ताने लिहिणाऱ्या या निबंधकाराचें हृद्गत जरी दुर्दैवानें त्या काळांत आकलन झालें नाही तरी

**‘ कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ’**

असा विश्वास प्रकट करणाऱ्या आगरकरांना समजून घेण्याचा काळ मात्र आज सुदैवाने आला आहे.

# तरुण सुशिक्षितांस विज्ञापना : : ४

"तरुण सुशिक्षित देशबांधवहो, हा 'सुधारक' अत्यंत प्रेमपूर्वक जी विज्ञापना तुम्हांस पुढे करीत आहे तीकडे लक्ष द्याल, आणि तिची सार्थकता करण्याविषयी प्रयत्न कराल अशी आशा आहे.

असें म्हणतात की, ज्या देशांतील लोकांनी राष्ट्रीय स्वातंत्र्य स्थापिलें आहे; ज्या देशांतील लोकांनी राजाचा जुलूम नाहीसा करून प्रजासत्ताक राज्यपद्धति स्थापिल्या आहेत; ज्या देशांतील लोक सामाजिक व धार्मिक गोष्टींची सुधारणा करण्यासाठी सरकारवर अवलंबून न राहतां ती आपली आपण करूं लागले आहेत; आणि ज्या देशांतील लोकांस सर्व प्रकारच्या प्रकान्तीस लागणाऱ्या साधनांची अनुकूलता साध्य झाली आहे त्या देशांतील युनिव्हर्सिटयांतले शिक्षक आणि शिष्य पूर्वसंप्रदायप्रिय असतात. कोणतीहि जुनी पद्धत टाकणें, नवीन अंगीकार करणें वगैरे गोष्टी त्यांस आवडेनाशा होतात. सारांश, जें चालत आलें आहे तेंच बरें आहे, त्याची सुधारणा करण्याचा प्रयत्न केल्याने नवीन लचांडें उद्भवण्याचा संभव आहे, आणि त्याचा परिहार कसा करावा हें ठाऊक नसल्यामुळे त्यापासून हित न होतां उलट नुकसान होण्याची भीति आहे. सबब जें चालू आहे त्याचेंच संरक्षण करावें, आणि त्यापासून होईल तितकें सुख उपभोगावें असें त्यांस वाटत असतें. आणि कांही अंशीं असें होणें फार स्वाभाविक आहे. ज्याप्रमाणे जलोदधीचा अत्यंत क्षोभ करणारा प्रचंड प्रभंजन कांही वेळ मोठ्या जोराने वाहिल्यावर, आणि समुद्रावर व जमिनीवर त्याने अनेक उत्पात करून सोडल्यावर, जणूं काय विगलितवीर्य होत्साता शान्त होतो, आणि वातावरणांत पराकाष्ठेची निश्चलता उत्पन्न होऊन सर्व सचेतन व अचेतन वस्तु जागच्या जागीं निश्चेष्ट झाल्यासारख्या भासूं लागतात, त्याप्रमाणे ज्या देशांत मोठमोठ्या राज्यक्रान्त्या झाल्या आहेत, ज्यांतील लोकांनी राज्यस्वातंत्र्यासाठी व विचारस्वातंत्र्यासाठी अनेक

तुंबळ युद्धें केलीं आहेत, जो देश अनेक वर्षांनी शान्तिसुखाचा अनुभव घेऊं लागला आहे, व ज्यांतील लोकांस विशेष गुरुत्वाचा कोणताहि अन्याय दूर करणें राहिलें नाही,—अशा देशांतील लोकांस थोडीशी स्तिमितता यावी,—विशेषतः राज्यक्रान्ति म्हणजे काय, ती घडून आणण्यास केवढे प्रयास पडतात, ती होऊं लागली म्हणजे प्रजेस किती हाल सोसावे लागतात वगैरे गोष्टी ज्यांस नीटपणे समजतात, अशा त्या देशांतील सुशिक्षित लोकांस तरी ती यावी हें अगदी स्वाभाविक आहे. तेव्हा इंग्लंडसारख्या देशांतील युनिव्हर्सिटयांच्या प्रोफेसरांनी व कॉलेजांतील विद्यार्थ्यांनी ग्लाड-स्टनसारख्या मंत्रिगणशिरोमणीस विरुद्ध होऊन हार्टिंग्टनसारख्या संकुचित दर्शनाच्या व मर्यादित औदार्याच्या लोकाग्रणीचें प्रोत्साहन करावें, आणि तदनुषंगाने वागण्याविषयी तत्परता दाखवावी, यांत कांही आश्चर्य नाही. पण ज्या देशांतील लोकांस राजकीय, सामाजिक व धार्मिक असमता, अज्ञान, आणि अन्याय यांपासून पराकाष्ठेचा त्रास होत आहे, किंवा पर-वशता प्राप्त झाली आहे; ज्या देशांतील सामान्य लोकांस गूढ अज्ञानाने व्यापिलें आहे; ज्या देशांतील लोकांस विपत्तींपासून होणाऱ्या यातना सोसाव्या लागत आहेत, पण त्यांच्या परिहारार्थ काय करावें हें समजत नाही; सारांश, ज्या देशांत राजकीय समता नाही, विद्या नाही, वित्त नाही, शारीरिक व मानसिक सामर्थ्य म्हणण्यासारखें नाही, अशा देशांतील युनिव्हर्सिटयांत आणि कॉलेजांत इतर ठिकाणापेक्षा थोडीशी अधिक चळ-वळ नसेल तर त्या देशाची अखेर गति काय होईल हें सांगतां येणें फार कठिण आहे. विचार करणें, सुखदुःखाचा अनुभव घेणें, व क्रिया करणें या तीन गोष्टींपैकी पहिलींत, दुसरींत किंवा तिसरींत प्रत्येक मनुष्य चूर होऊन गेलेला असतो. मोठमोठ्या ग्रंथांचीं पारायणें करावीं, रात्रीच्या रात्री चिंतनांत घालवाव्या, विचार व्यवस्थित झाला की तो पुस्तकद्वाराने किंवा दुसऱ्या कोणत्या तरी साधनाने लोकांपुढे आणावा, अशा रीतीने कित्येक लोक आपलीं आयुष्यें कंठीत असतात. अशांस बाह्य सुखांचा फार उपभोग सांपडत नाही, व बाह्य क्रिया करतां येत नाही. वाचनापासून होणारा जो आनंद तेंच यांचें स्थायिक व आवडतें सुख, आणि विचार करण्यास व लिहिण्यास लागणारी जी शारीरिक हालचाल तीच ह्यांची बाह्य क्रिया.

दुसरा वर्ग सुखाभिलाषी लोकांचा. यांत मानसिक सुखापेक्षा शरीरसुखाची चाड विशेष असते. वारुळांत जशी एक खुशालचेंडू राणी मुंगी असते म्हणून सांगतात, तीसारखे हे सुखपरायण लोक होत. सुखोपभोगासाठी सर्व प्राणिमात्र धडपडत असतो, व ज्यास जो प्राप्त होईल त्यापासून त्याने आनंद करून घ्यावा हें योग्य आहे; पण ज्या सुखोपभोगामुळे निरंतर तो घेतां येण्याची शक्यता नाहीशी होते; बुद्धीस मांद्य येतें; गात्रें निःशक्त होतात; उत्साह नाहीसा होतो; आणि कुटुंबास व राष्ट्रास कोणत्याहि प्रकारचा फायदा न होतां उलट नुकसान किंवा त्रास सोसावा लागतो, अशा सुखोपभोगांत निमग्न असण्यांत काय फायदा आहे बरें? पण असे लोक कोणत्याहि देशांत थोडेथोडके नसतात. ज्या ठिकाणीं अविद्या आणि वित्त यांचा संयोग दृष्टीस पडतो, त्या ठिकाणीं व्यसनासक्ति दृष्टीस पडत नाही असें सहसा होत नाही. सुदैवाने ज्यांना सुखोपभोग करून घेता येत असेल त्यांनी सुखांची निवड करतांना तीं आपणांस व इतरांस शेवटपर्यंत हितावह होतील किंवा नाही येवढे पाहात जावें म्हणजे झालें. या सुखपरायण वर्गाशिवाय लोकांचा आणखी एक तिसरा वर्ग असतो. या वर्गांतील लोकांची क्रियाप्रवृत्ति फार जबरदस्त असते; व एका दृष्टीने यांस समाजाचे आधारस्तंभ म्हणतां येईल. यांनी काबाडकष्ट करून आवश्यकतेचे आणि चैनीचे पदार्थ उत्पन्न करावे, आणि त्यांचा उपभोग वरील दोन वर्गांतील किंवा मधल्या वर्गांतील लोकांनी घ्यावा, असें आजपर्यंत बऱ्याच अंशीं होत आलें आहे; व पुढेहि अल्पकाळांत या स्थितींत विशेष फेरबदल करतां येईल असें वाटत नाही. तथापि, निरपेक्षबुद्धीने व आस्थापूर्वक परिश्रम केले असतां, ही असमता थोड्या वर्षांत बरीच दूर करतां येण्यासारखी आहे. ज्या देशांत ही असमता वाढत जाऊं लागली असेल, त्या देशाच्या ऱ्हासास आरंभ झाला आहे असें समजावें. जेव्हा या असमतेची परमावधी होते तेव्हा घनघोर राज्यक्रान्ति होऊन समाजाचे समाज लयास जातात, धुळीस मिळतात, किंवा त्यांत अपूर्व स्थित्यंतरें होतात. निरंतर कष्ट साहण्यास खालचा प्राणीसुद्धा तयार असत नाही, तर मनुष्य कसा असेल? कष्ट साहणें म्हणजे जीविततत्त्व क्षीण करून घेणें होय, आणि तसें करून घेण्यास बहुतेक मनुष्यें तयार होतील तर हळूहळू मनुष्यजात नाहीशी होईल! परंतु मनुष्यें

अस्तित्वांत आलीं आहेत, व दिवसेंदिवस त्यांची संख्या वाढत आहे, यावरून त्यांच्या नाशास अनुकूल अशा कारणांपेक्षा त्यांच्या अस्तित्वास व वृद्धीस अनुकूल अशीं कारणें या पृथ्वींतील परमाणुसंघांत निगूढ आहेत असें सिद्ध होतें. तेव्हा काय दिसून येतें, की विचार करणारे, उपभोग घेणारे, व काम करणारे असे जे सांप्रत काळीं प्रत्येक देशांत तीन ठळक वर्ग दृष्टीस पडतात ते कायमचे नव्हेत. हळूहळू प्रत्येक व्यक्तीस विचार, उपभोग आणि काम हीं सम प्रमाणाने करावीं लागून सार्‍यांच्या सुखानुभवाची इयत्ता सारखी होत जाणार आहे; व जों जों ती तशी होत जाईल तों तों खरी उन्नति होऊं लागली असें म्हणतां येऊं लागेल. येवढें खरें आहे की, कांही झालें तरी सर्वांची बुद्धि सारखी तीव्र होईल, व पाहिजे त्या कामांत पाहिजे त्याला पडतां येऊन तें उत्तम रीतीने वठवितां येईल असें पूर्णपणे होण्याचा संभव फार थोडा आहे. तथापि प्रस्तुत कालीं निरनिराळ्या वर्गांतील लोकांत व स्त्री-पुरुषांत जें विलक्षण अंतर दृष्टीस पडत आहे तें पुष्कळच संकुचित करतां येणार आहे; आणि ज्या देशांत तें तसें करण्याचा प्रयत्न झपाट्याने चालत राहील तेच अखेरीस तरतील. बाकीचे, सर्वत्र जो जीवनार्थ कलह मोठ्या निकराने चालला आहे त्यांत भांडतां भांडतां नाहीसे होतील. यासाठी ज्यांना हें अस्तित्वतत्त्व स्पष्टपणे कळून आलें असेल, व ज्यांच्या मनांत कर्तव्यबुद्धि व परोपकारबुद्धि पूर्णपणे जागृत झाली असेल, त्यांनी आपापल्या देशाचा जीवनार्थ-कलहांत टिकाव लागण्यासाठी रात्रंदिवस निरपेक्षबुद्धीने झटलें पाहिजे. अशा प्रकारचे विचार समजले असून जे स्तब्ध राहतील त्यांच्या माथ्यावर देशास विपद्दशा आणिल्याची, आणि त्याचा नाश अपरिहार्य केल्याची भयंकर जबाबदारी येणार आहे. म्हणून सुशिक्षित देशबांधवहो, जर तुम्हांस इतर देशांकडून व पुढील संततीकडून बरें म्हणून घ्यावयाचें असेल, व तुमची आज जी स्थिति आहे तीहून तुमच्या मुलांची व नातवंडांची स्थिति अधिक वाईट होऊं नये अशी तुम्हांस वास्तविक इच्छा असेल, तर ज्या दुर्मतांनी, दुराग्रहांनी, व दुराचारांनी महारोगाप्रमाणे या देशाच्या बुद्धीचा व शरीरसामर्थ्याचा हजारों वर्षे फडशा चालविला आहे त्यांचें यथाशक्ति निर्मूलन करण्याचा प्रयत्न करणें अत्यंत उचित होय. या कामीं तुमच्याकडून हलगर्जीपणा झाल्यास या देशाला लौकरच जे दिवस येणार

आहेत त्यांचा नुसता विचार डोळ्यांपुढे आला तरी भय वाटल्यावांचून राहात नाही! इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, युनायटेड स्टेट्स वगैरे देशांतल्या सर्व वर्गांतील लोकांमधले व स्त्रीपुरुषांमधले संबंध कसे आहेत, हें नित्य नजरेपुढे येत असूनहि जर तुम्ही आपले डोळे मिटाल, व बालविवाहासारख्या अनेक व्याधी तुम्हांस अत्यंत पीडीत असून, त्यांच्या प्रतिकारार्थ कांहीच न कराल, तर तुमच्या संततीस तुमच्या मूर्खपणाबद्दल, आळसाबद्दल व आपलपोटेपणाबद्दल फारच त्रास सोसावा लागेल. तसें होऊं न देणें हें तुमचें कर्तव्य आहे, व तें अल्पायासाने कसें करतां येईल हें सांगावें, येवढाच या लेखाचा उद्देश आहे.

इंग्रजी शिक्षण मिळालेले बहुतेक सुशिक्षित लोक सामाजिक प्रश्नाविषयी विचार करूं लागले आहेत, व उत्तरोत्तर त्यांच्या विचारांचा परिणाम त्यांच्या आचरणावर होऊं लागेल यांत संशय नाही. पण अशा रीतीने जें वर्तनान्तर होतें तें स्थाइक होण्याचा संभव असत नाही; इतकेंच नाही तर कोणतीहि गोष्ट चांगली आहे, ती करणें जरूर आहे असें वाटून ती करूं लागणें यांत जें मनास शिक्षण मिळतें, तें अप्रत्यक्ष रीतीने घडून येणाऱ्या वर्तनान्तरांपासून कधीच प्राप्त होत नाही. आसमंतांतील वस्तुस्थितीच्या आधीन होऊन ती नेईल तिकडे जाणें यांत कोणताहि पुरुषार्थ नाही. ज्या ठिकाणीं स्त्रीचा वाराहि येण्याचा संभव नाही, अशा ठिकाणीं ब्रह्मचर्य आचरल्याबद्दल फुशारकी मारण्यांत काय हांशील आहे? आपणांवर अमुक प्रकारचें संकट येणार आहे असें कळून त्याच्या परिहारार्थ जाणूनबुजून उपाय योजणें यांतच मनुष्याचें मनुष्यपण आहे. लोकसंख्या वाढत जाऊन अन्नाची पंचाईत पडूं लागली म्हणजे विवाहकाल सहजच लांबत जाईल. आपण होऊन तो लांबविण्याची गरज नाही. व्यापारधंदा, सरकारी नोकऱ्या, आगगाडीचा प्रवास इत्यादि कारणांनी जातिबंध आपल्या आपण शिथिल होऊं लागले आहेत, तेव्हा ते वाईट आहेत असें म्हणून एकमेकांस दुखविण्याची गरज नाही; सामान्य शिक्षणाचा व विशेषतः शास्त्रज्ञानाचा जसजसा प्रचार होत जाईल तसतशा धर्मासंबंधी वेडेपणाच्या समजुती लयास जातील; सबब त्यांवर टीका करण्याची गरज नाही. कोणतीहि सुधारणा करण्याविषयी लोकांच्या मनांत दृढ इच्छा उद्भवल्याशिवाय, केवळ कायद्याच्या जुलमाने सुधारणा होऊं शकत नाही; व ती इच्छा उद्भवली असतां कायदा करण्याची आवश्यकता

राहात नाही, कारण मग ती लोकांचे लोकच करतात; पराधीनांस बलहीनता येते, व बलहीनांच्या कपाळीं पराधीनता ब्रह्मदेवाने लिहिली आहे; सबब हिंदुस्थानच्या लोकांनी राष्ट्रोन्नति करण्याचा प्रयत्न करणें शुद्ध वेडेपण होय,—अशा रीतीने सामाजिक व राजकीय प्रश्नांविषयी विचार करणाऱ्या लोकांस विचारी म्हणावें किंवा नाही याचा संशय आहे. हे असल्या विचारांनी मनुष्यांत आणि इतर प्राण्यांत कांही अंतर नाही असें दाखवूं पाहतात! मागल्या पिढ्यांस आलेल्या संकटाची माहिती आणि त्यांच्या परिहारार्थ त्यांनी योजलेल्या उपायाचें ज्ञान, यांच्या साह्याने म्हणजे पूर्व पिढ्यांच्या अनुभवाने भावी विपत्ति टाळण्याचा प्रयत्न मनुष्य करणार नाही, व वस्तुस्थितीचा गुलाम होऊन ती वागवील तसें वागेल तर प्राणिवर्गात त्यास प्राप्त झालेलें श्रेष्ठत्व त्याचेकडे कसें राहील? आणि सध्या जीं सुखें उपभोगण्यास सांपडत आहेत तेवढ्यांचा तरी त्यास कायमचा उपभोग कसा लाभेल हें सांगतां येत नाही. तात्पर्य, अगदी शुष्क गोष्ट असली तरी तिच्यासाठी बुद्धिपूर्वक प्रयत्न केला पाहिजे. जे लोक असें करीत नाहीत ते हळूहळू दैववादी बनून निरुद्योगी व निरुत्साह होत्साते क्षीण होत जातात, व शेवटी समूळ नष्ट होतात. तस्मात् सुशिक्षित बांधवहो, तुम्हांस अशी प्रार्थना आहे की, वर जें म्हटलें आहे तें तुम्हांस मान्य असेल तर तुम्ही कालावर व वस्तुस्थितीवर अवलंबणें पुरें करून ज्या सुधारणा तुम्हांस अत्यंत आवश्यक अशा वाटत आहेत त्या करण्याविषयी बुद्धिपूर्वक प्रयत्न करण्यास लागलें पाहिजे. या आवश्यक सुधारणांपैकी कांही अशा आहेत की त्या वृद्ध लोकांच्या हातून होण्याचा संभव नाही. इतकेंच नाही, तर त्यांपैकी पुष्कळांस त्यांची संमतीहि मिळण्याची आशा नाही. उदाहरणार्थ, पुनर्विवाह व ऋतूत्तर कन्याप्रदान. तसेंच कित्येक तरुण सुशिक्षितांस या दोन गोष्टी व अशाच प्रकारच्या इतर गोष्टी कितीहि चांगल्या वाटूं लागल्या असल्या, व त्यांची आवश्यकता भासूं लागली असली, तरी त्या करण्यास प्रवृत्त होण्यास त्यांची छाती होणार नाही. केवळ सगळेच असे असतील असें आमचें म्हणणें नाही. एखाद्याचें धैर्य, निश्चय, व कार्यनिष्ठा असामान्य असल्यास तो लोकमताची किंवा अगदी जवळच्या आप्तांचीहि पर्वा न करतां आपल्या मनास जी गोष्ट प्रशस्त वाटली ती करण्यास प्रवृत्त होईल. पण असे लोक फार विरळ असतात. अशांची संख्या वाढेल तितकी

वाढणें इष्ट आहे, आणि तिच्या कमी-अधिक वाढीवर समाजाची सुधारणा शीघ्र होणें किंवा न होणें हें अवलंबून आहे. तथापि, सध्याचें जग सामान्य विचारांच्या, सामान्य धैर्याच्या, व सामान्य समजुतीच्या लोकांचें झालेलें आहे. वृद्ध–तरुणांच्या आचारविचारांत कालमानाने व शिक्षणभेदाने थोडाबहुत फरक होतो, पण त्यामुळे त्यांत जमीनअस्मानाचें अंतर पडतें असें नाही, व असें होणें इष्टहि नाही; कारण असें होऊं लागेल तर कोणत्याहि घरीं कोणासहि सुखाचा लवलेश मिळेनासा होऊन साऱ्या समाजांत अहोरात्र चलबिचल माजून राहील, कोणाचा धाक कोणावर चालणार नाही, व सगळयाच प्रकारच्या सुधारणांस प्रचंड व्यत्यय येईल. सुधारणा करण्याची इच्छा जशी तरुणांस असते तशी वृद्धांस असत नाही. समाजाच्या असलेल्या स्थितीचें संरक्षण करण्याविषयी वृद्ध लोक अत्यंत उत्कट असतात. त्यांचें पाऊल पुढे पडावें अशी तरुणास आकांक्षा असते. वृद्ध हे समाजनौकेचें भरताड होत; तरुण शिडें होत. पहिल्याशिवाय समाजांत स्थिरता राहणार नाही; दुसऱ्यांशिवाय त्याला गति येणार नाही! तेव्हा ज्यांच्या मनांत समाजाचें कल्याण व्हावें असें असेल ते या दोहोंचें फारकत व्हावें असें कधीहि चिंतणार नाहीत. दोहोंचाहि उपयोग आहे; व दोघांनाहि आपापला कार्यभाग उरकण्याची मोकळीक पाहिजे. प्रत्येक गोष्टींत बाबाने बेटयाला आपलें वळण गिरविण्यास लावणें हें जसें वाईट, तसें आपली प्रत्येक गोष्ट बाबा ऐकून घेत नाहीत म्हणून बेटयाला त्याचा विषाद येणें हेंहि वाईट. दोघांच्या संमतीने जेवढें चालेल तेवढें हवेंच आहे. पण ज्या गोष्टींत दोघांचें ऐक्य होण्याचा संभव नसेल त्या ज्याच्या त्यास आपल्या मनाप्रमाणे करावयास सांपडल्या तरच घरांत व बाहेर शान्तता आणि समाधान राहण्याचा संभव आहे. आज ज्यांचें अर्धेंअधिक वय होऊन गेलें आहे; वागण्याची पूर्वपद्धत ज्यांच्या अंगीं खिळून जाऊन स्वभावतुल्य झाली आहे; अनेक वर्षांच्या विश्वासामुळे ज्यांच्या धर्मविषयक व नीति-विषयक कल्पना वज्रलेप झाल्या आहेत; जुनाट झालेल्या झाडाप्रमाणे ज्यांचीं मनें किंवा शरीरें बाळगण्याची आशा उरली नाही; अशांनी आम्ही ज्या गोष्टी पुढे सांगणार आहों त्यांत पडावें अशी आमची इच्छा नाही, व तुम्ही त्यांत पडा असें आम्ही त्यांस म्हणणारहि नाही. जे आज अपत्यवंत

आहेत, ते आपल्या अपत्यांची व्यवस्था कशीहि लावोत; त्याबद्दल आम्ही कुरकूर करणार नाही. पण ज्यांच्यावर अद्यापि संसाराचा भार पडलेला नाही; ज्यांच्याकडे पितृत्वाचा अधिकार अद्यापि आलेला नाही; नवीन ज्ञान संपादण्याचें व विचार कायम करण्याचें ज्यांचें वय अद्यापि गेलें नाही; ज्यांच्या ईर्षेला पराभव ठाऊक नाही; ज्यांची हिंमत कशानेहि खचलेली नाही; जगाच्या दुःखमय अनुभवामुळे ज्यांच्या अंतःकरणांत अनौदार्य, संशय, परदुःखपराङ्मुखता आणि परहितौदासीन्य यांचा प्रादुर्भाव झाला नाही—अशा विद्यालयीन व इतरस्थ तरुण सुशिक्षितांनी आम्ही जी कल्पना सुचवीत आहों तिचा विचार करून ती अमलांत आणण्याविषयी मंडळी स्थापावी, अशी आमची त्यांस प्रार्थना आहे.

या घटकेस हिंदुस्थानांत नव्या व जुन्या कल्पनांचा ज्या प्रकारचा झगडा सुरू आहे, तशा प्रकारचा झगडा येथे पूर्वी कधीहि झाला नसेल. आजपर्यंत हिंदुस्थानावर ज्यांनी स्वाऱ्या केल्या, किंवा येथे आपलीं राज्यें स्थापिलीं त्यांच्या आणि आम्हां एतद्देशीय हिंदूंच्या राजकीय आणि सामाजिक विचारांत विशेष अंतर नसल्यामुळे हिंदूंनी आपल्या जिंकणारांपासून अवश्य शिकलें पाहिजे असें विशेष कांही नव्हतें. किंबहुना हिंदु लोकांपाशींच आपल्या परकीय राज्यकर्त्यांस शिकविण्यासारख्या काही गोष्टी होत्या. त्यामुळे आजपर्यंत ज्यांनी हिंदुस्थानास जिंकून त्यांत आपली सत्ता स्थापिली त्यांनी हिंदूंचा शारीरिक किंवा बाह्य पराभव केला इतकेंच म्हटलें पाहिजे. पण इंग्रजांनी आम्हांवर जें राज्य स्थापिलें आहे त्याची अगदी निराळी गोष्ट आहे. या राज्यामुळे आमच्या स्थितींत पराकाष्ठेचा बदल होत आहे. प्रथम प्रथम या स्थित्यंतराचें स्वरूप आमच्या लक्षांत बरोबर आलें नाही, पण अलीकडे पांचपंचवीस वर्षांत पाश्चिमात्य शिक्षणाचा प्रसार झाल्यापासून जेवढे म्हणून त्याच्या पाशांत सापडले आहेत त्यांची स्थिति विलक्षण होऊन गेली आहे; व उत्तरोत्तर या शिक्षणाचा परिणाम बहुतेकांवर होणार हें स्पष्ट दिसत आहे. पुष्कळांचें असें म्हणणें आहे की, पाश्चिमात्य शिक्षण फार थोड्यांस प्राप्त झालें असल्यामुळे, त्याने हिंदु लोकांच्या स्थितींत विशेष फेरफार झाला आहे असें म्हणतां येणार नाही. पण आमच्या मतें असें समजणारांची चूक आहे. केवळ शाळांच्या द्वारे

पाश्चिमात्य विचारांचा प्रसार होऊन त्यामुळे आमचें जें स्थित्यंतर होत आहे तेवढयाचाच विचार केला तर तें विशेष विस्तृत नाही हें कबूल करावें लागेल. पण शाळांशिवाय ज्या दुसऱ्या अनेक द्वारांनी हिंदुसमाजांतील प्रत्येक वर्गांतल्या लोकांवर परिणाम घडत आहेत त्यांचा नीट विचार केला तर असें दिसून येईल की, ज्याच्या आचारांत व विचारांत पाश्चिमात्य कल्पनांनी थोडाबहुत तरी फेरफार झाला नाही असा एकहि वर्ग नाही. शाळाखात्याशिवाय इतर खात्यांचा संबंध प्रत्येक दिवशीं प्रत्येक वर्गांतील वयांत आलेल्या मनुष्यांशीं येऊन पोंचत आहे, व तदनुषंगाने त्यास आपल्या वागणुकींत प्रतिदिवशीं कमीअधिक फेरफार करावा लागत आहे. मोजणीखातें, जमीन-जमाबंदीखातें, न्यायखातें, पब्लिक् वर्क्सखातें, वैद्यकखातें, लष्करीखातें, सॅनिटरीखातें, अबकारीखातें इत्यादिकांनी आमच्याइकडील शेतकऱ्यांवर, कारागिरांवर, व्यापाऱ्यांवर, सावकारांवर, वाण्याउदम्यांवर, व सामान्य मजुरांवर केवढे परिणाम घडत आहेत ! त्या खात्यांशीं लोकांचा जो व्यवहार होतो तो सरकारने घालून दिलेल्या नियमांप्रमाणेच व्हावा लागतो. त्यामुळे त्या नियमाचें वळण त्यांस नकळत लागत चाललें आहे; व तें नकळत लागत आहे म्हणून मुळीच लागत नाही असें म्हणणें बरोबर नाही. याशिवाय तारायंत्र, आगगाडी, पोस्टखातें, सेव्हिंग्ज बँक्स, पोस्टल बँक्स, वगैरे ज्या गोष्टी सरकारने किंवा खासगी मंडळ्यांनी व्यापाराच्या सोयीसाठी व इतर सोयीसाठी स्थापिल्या आहेत, त्यांचा लोकांच्या धर्मविचारांवर, नीतिविचारांवर व नित्याचरणावर केवढा परिणाम होत आहे याचा जो लक्षपूर्वक विचार करील त्याला, आणखी शेंपन्नास वर्षें असाच क्रम चालला तर हिंदुस्थानच्या पहिल्या स्थितीचा मागमूस नाहीसा होण्याइतकें त्यांचें स्थित्यंतर होणार आहे असें कबूल करावें लागेल. तात्पर्य काय की, जिकडे पाहावें तिकडे पाश्चिमात्य कल्पनांनी व आचारांनी आम्हांस वेढल्यासारखें झालें आहे, व त्यांच्या पेंचांतून आम्हांस निसटून जातां येईल असें वाटतं नाही ! पण निसटून जाण्याचा तरी प्रयत्न करण्याची काय गरज आहे ? ज्या युरोपीय कल्पनांचा प्रघात इकडे पडत आहे, त्यांपैकी जेवढ्या अहितकारक असतील तेवढ्या वर्ज्य करून बाकीच्यांचा अंगीकार करण्यास काय हरकत आहे ? दुसऱ्या विषयाविषयी लिहीत असतां

असें दाखविलें आहे की युरोपांत आज जी सुधारणा दृष्टीस पडत आहे ती मागील अनेक सुधारणांचें सार आहे, व ज्या राष्ट्रास जीवनकलहांत टिकावयाचें असेल त्याला त्या सुधारणेचा स्वीकार केल्याशिवाय गत्यंतर नाही. हें खरें असेल तर ती सुधारणा आपल्या घरीं चालून आली असून आपण तिचा निषेध करणें म्हणजे आपल्या हाताने जाणूनबुजून आपलें नुकसान करून घेण्यासारखें होय. निदान आमची तरी अशी समजूत आहे की, इंग्रजांच्या राज्यामुळे ज्या गोष्टी येथे प्रस्थापित झाल्या आहेत व होऊं पाहात आहेत, त्यांपैकी बहुतेक स्वीकारणीय व अनुकरणीय आहेत. सबब त्यांचा येथे जो आपोआप प्रसार होत आहे त्याच्याविरुद्ध जाणें हें तर इष्ट नाहीच; पण ज्यांना त्यांचें चांगुलपण समजण्यासारखें शिक्षण मिळालें आहे त्यांनी बुद्धिपुरःसर त्यांचा स्वीकार व प्रसार केला पाहिजे. असें केलें तरच त्या लौकर मूळ धरतील; आणि त्यांच्या फलांचा लाभ थोड्या वर्षांत आम्हांस होऊं लागून जीवनकलहांत हार न जाण्याची आशा आम्हांस करतां येऊं लागेल. हें बुद्धिपुरःसर सुधारणा करण्याचें काम तरुण सुशिक्षितांशिवाय इतरांच्याने होण्यासारखें नाही, म्हणून इतका वेळ त्यांची विनवणी चालविली आहे.

तरुण सुशिक्षित मित्रहो, 'शरीर धड तर मन धड '(A sound mind in a sound body) अशी जी इंग्रजी भाषेंत सुप्रसिद्ध म्हण आहे ती तुम्हां सर्वांच्या ऐकण्यांत आलीच असेल. ज्याप्रमाणे जोरदार वृक्ष निपजण्यास मूळ अंकुर जोरदार पाहिजे, त्याप्रमाणे देशांत सुदृढ स्त्रीपुरुष निपजण्यास, सुदृढ मुलें होण्यास वैद्यशास्त्रांत जो खऱ्या विवाहाचा काळ सांगितला त्याचें कोणाकडूनहि उल्लंघन होता कामा नये. या काळाचें उल्लंघन आम्हांकडून अनेक वर्षें होत असल्यामुळे आमची प्रजा क्षीण, अल्पायुषी, श्रम करण्यास नादान, उत्साहशून्य व भेकड अशी होत आहे. आमच्या शरीरस्वास्थ्याचा लोप होत असल्यामुळे आमचें मानसिक सामर्थ्यहि नाहीसें होत आहे. याशिवाय बालविवाहापासून आम्हांवर जीं इतर अरिष्टें गुदरत आहेत त्यांचा येथे अगदी अल्प उल्लेख करण्यासहि जागा नाही. बालविवाह बंद झाल्यास आज प्रत्येक घरीं ज्या एक दोन हतभाग्य बालविधवा दृष्टीस पडतात त्या पडेनाशा होतील, पुरुषांच्या अंगीं अधिक पौरुष दृष्टीस पडूं लागेल; तरुणांस अधिक उद्योग करण्याची हिंमत येईल, व धाडसाचीं कामें

अंगावर घेण्याची छाती होऊं लागेल. ज्याला त्याला आपापल्या मनाप्रमाणे आपली बायको पसंत करण्याची सवड मिळूं लागल्यामुळे स्त्रीपुरुषांच्या सुखाची वृद्धि होऊन संसारयात्रा अधिक रमणीय होईल. विवाहापूर्वी मुलीस ज्ञान संपादण्यास अधिक फुरसत मिळाल्यामुळे पुढे त्यांच्याकडून अपत्यसंवर्धनाचें व प्रपंच चालविण्याचें काम चांगल्या रीतीने होऊं लागेल. पण हें सर्व होण्यास बालविवाहाची चाल बंद झाली पाहिजे, व ती बंद होणें किंवा न होणें हें सर्वथैव तुमच्याकडे आहे."

---

दुसरीकडे एका सोलापूरकर 'अपरिचित मित्रा'चें पत्र छापलें आहे. त्या पत्रावरून असें दिसेल की, अलीकडे समाजांत चाललेली चळवळ पाहून विशेषतः सामाजिक अनेक प्रश्नांविषयी जो चोहोंकडे खडाजंगी वादविवाद चालला आहे तो डोळ्यांपुढे येऊन, या 'आमच्या अपरिचित मित्रा'चें डोकें बुचकळ्यांत पडल्यासारखें झालें आहे! आणि तें ठीकच आहे. आपणांस अमुक दिशेने अमुक ठिकाणीं जावयाचें आहे, असा संकेत करून ठेवल्याशिवाय जे कोणी अफाट दर्यांत आपला पडाव घालतात त्यांची अशीच अवस्था होते! वाऱ्याच्या प्रत्येक झुळकेने त्याच्या नौकेस हेलकावे बसतात; इतकेंच नाही तर तिच्या जोराने ते भलत्याच दिशेस लागतात! आणि दुर्दैवाने एखादे प्रसंगीं सोसाट्याचा वारा लागला तर त्याचीं शिडें, वल्हीं व सुकाणूंहीं मोडून, एखाद्या अनपेक्षित खडकावर तें वाहात जाऊन आदळतें, आणि त्यांतील उतारूंवर जलसमाधि घेण्याचा प्रसंग येऊन गुदरतो! तेव्हा ज्यांना निर्भयपणे दूरचें जलपर्यटण करावयाचें असेल, त्यांनी त्या प्रवासास निघण्यापूर्वी सर्व प्रकारची नीटनेटकी तयारी केली पाहिजे. अगोदर ज्या बंदरास जावयाचें असेल तें आहे कोठे व किती लांब आहे; वाटेने वरवा करण्याची किंवा वादळांत सापडल्यास आश्रय घेण्यासारखीं कोणकोणतीं ठिकाणें आहेत; ज्या जहाजांत प्रवास करावयाचा तें मजबूत आहे किंवा नाही; ज्या खलाशांच्या आणि तांडेलांच्या स्वाधीन आपले प्राण करावयाचे ते आपल्या कामांत पक्के वाकबगार आहेत किंवा नाहीत; आणि त्यांचेपाशीं होका वगैरे समुद्रतरणास अवश्य लागणाऱ्या साधनांची हवी तशी सामुग्री आहे किंवा नाही—इत्यादि गोष्टींची नीट चौकशी करून, मग जलधिगमनास जे प्रवृत्त होतील ते सहसा कोणत्याहि प्रकारच्या धोक्यांत पडणार नाहीत; व पडले तरी त्यांतून सहज निभावतील! पण सामान्य लोक बहुधा इतकी काळजी घेत नाहीत, व त्यांनी ती घेणें शक्यहि नाही. जगाच्या सध्याच्या स्थितींत त्यांतील नऊदशांश लोकांस शुद्ध अंधाप्रमाणे कसें तरी चांचपडत त्यांतून निघून जावें लागतें असें

म्हणण्यास हरकत नाहीं. बहुतेकांची अशी दशा आहे, म्हणून आम्ही त्यांचा उपहास करतों असें कोणी समजूं नये. निरुपायास्तव त्यांना तसें करावें लागतें हें आम्हांस पक्कें ठाऊक आहे. मनुष्य वयांत येण्यापूर्वी व बऱ्याच विषयांचें बरेंच ज्ञान संपादण्यापूर्वी संसारांत पडेल, आणि रात्रंदिवस त्यांत चूर होऊन राहील, तर जग चाललें आहे कोणीकडे व त्याने जावें कोणीकडे हें त्याला नीटपणे समजण्याचा संभव नाही. ज्याप्रमाणे समोर येऊन भिडलेल्या शत्रूंशीं लढण्यांत निमग्न झालेल्या शिपायास आपण आहों कोठे व चाललों आहों कोणीकडे याचें भान राहात नाही, त्याप्रमाणे संसारसमरांत मेटाकुटीने झगडणाऱ्या सामान्य सांसारिकास समाजाची खरी स्थिति आहे कशी आणि ती असावी कशी हें समजत नाही. ज्याप्रमाणे समुद्रपृष्ठावर सुयंत्र नौका चालविणें हें सुकर्णधराचें काम आहे, किंवा लढाईत गुंतलेल्या शिपायांस योग्य हुकूम सोडणें हें थोड्या अंतरावरून रणदिनचर्येचें शान्त दृष्टीने अवलोकन करणाऱ्या सेनापतीचें काम आहे, त्याप्रमाणे समाजाची स्थिति कशी आहे व समाजास कोणतें वळण लागावें, याची चर्चा करून निश्चय करणें हेंहि एका प्रकारच्या विशेष व्यक्तींचें काम आहे. जन्मास आल्यासारखें होईल तेवढें स्वहित साधण्यांत व अहोरात्र प्रपंचांत गढून असण्यांतच ज्यांना जीवितसार्थकता वाटत नाही; सुदैवाने ज्यांना दोन अक्षरें प्राप्त झालीं आहेत; विचार करण्याची ज्यांस हौस आहे, व उद्योग करून ज्ञान संपादण्याचा ज्यांना छंद लागला आहे; प्राणिमात्राची, विशेषतः मनुष्याची, आणि त्यांतल्या त्यांत स्वदेशबांधवांची विपत्ति कमी व्हावी अशी ज्यांना स्वाभाविक इच्छा असून, तदनुसार थोडेंबहुत तरी वर्तन करण्याची सोय आहे, अशांनी सामाजिक विषयांच्या वाटाघाटींत पडणें विशेष श्रेयस्कर होणार आहे असें आम्हांस वाटतें. पण बहुतेकांचा असा समज नसतो. वैद्यक, चित्रकला, गायन, सुतारकाम, वक्तृत्व, शिवणकाम, किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या कोणत्याहि उद्योगास लागणारें चातुर्य अंगीं नसल्यास तें नाही असें उघडपणें कबूल करण्यास, किंवा तशा प्रकारचें एखादें काम कर असें कोणी सांगितल्यास त्याची मला माहिती नाही, आणि म्हणूनच तें मला करतां येणार नाही, असें म्हणण्यास कोणा-

लाहि बहुधा लाज वाटत नाही. पण राजकीय, किंवा धार्मिक विषयांविषयी अशा प्रकारचें अज्ञान कबूल करण्यांत बहुतेकांस मोठी शरम वाटते ! दहा वर्षांच्या पोरापासून अक्षरशत्रु व विचारानभिज्ञ साठ वर्षांच्या म्हाताऱ्या-पर्यंत किंवा म्हातारीपर्यंत वर सांगितलेल्या विषयांत, विशेषतः सामाजिक व धार्मिक विषयांत आपण पटाईत नाही, व दुसऱ्यास पढविण्याचा नियम घालून देण्याचा आपणांस अधिकार नाही, असें वाटणारे शेंकडा पांच इसम निघतील किंवा नाहीं याची बरीच शंका आहे ! तथापि, कांही अंशीं ज्याला त्याला असें वाटत असणें हें अपरिहार्य आहे. राजकीय, सामाजिक, व धार्मिक आचारांची व कल्पनांची प्रत्येकास थोडीबहुत ओळख असते; तसेंच ज्या आचारांत (व) ज्या कल्पनांत आपण वाढतों त्या कितीहि दोषार्ह असल्या तरी रोजच्या रहाटीमुळे त्यांची दोषार्हता लक्षांत येत नाहीं; इतकेंच नाही, तर त्याच प्रशंसनीय व सुखावह वाटूं लागतात; आणि त्यांहून भिन्न आचार व कल्पना विशेष श्लाघ्य व कल्याण-प्रद असतील अशी शंकादेखील येत नाही ! उलट ज्याप्रमाणे ज्वर आलेल्या मनुष्यास जें अन्न स्वतःच्या तोंडांत घालवत नाही तें दुसरीं माणसें मोठ्या आवडीने खात आहेत, असें पाहून मोठें आश्चर्य वाटतें इतकेंच नाही, तर त्यांचा तो अधाशीपणा पाहून कधी कधी कळमळूनहि येतें; त्याप्रमाणे ज्यांना सामाजिक व धार्मिक विषयाविषयी विशेष विचार करण्यास अंवकाश सापडलेला नाही, त्यांना आपणांस न रुचणारे तत्संबंधक विचार अत्यंत अमंगळ व तिरस्करणीय वाटतात यांत कांही नवल नाही ! असल्या विचारांचें ताट त्यांचेपुढे आलें की त्यांस उमळून येतें, व त्यांचेपुढे तें आणणारांवर ते क्रुद्ध होतात ! तथापि ज्याप्रमाणे दुखणेकऱ्याचे हितचिंतक सुज्ञ आप्त किंवा ममताळू वैद्य त्यांच्याकडून त्यांतील पदार्थांचें होईल तेवढें सेवन कधी धाकाने व कधी आर्जव करून करवितात, त्याप्रमाणे सामाजिक व धार्मिक भिषक् आपल्या विचाररूप 'अप्रिय पण पथ्यकारक' अन्नाचा स्वीकार आपल्या देशबांधवांकडून आळेबळे करवितात.

वरील लेखांत गर्वोक्ति आहे असें कोणीहि समजूं नये अशी आमची प्रार्थना आहे. विषयाच्या ओघांत असें लिहिणें भाग पडल्यावरून लिहिलें आहे ! राज-कीय, धार्मिक, व सामाजिक, विशेषतः शेवटल्या दोन विषयांविषयी आज दोन

अडीच वर्षे 'सुधारकां'त जे विचार प्रसिद्ध होत आहेत, त्याना वेडेंवाकडें कसलें तरी एक ठरीव वळण आहे, येवढें तरी हें पत्र बरेच वेळां ज्यांनी वाचलें असेल त्यांच्या ध्यानांत येऊन चुकेल. सामान्य लोकमताहून भिन्न मताचा स्वतः स्वीकार करून, शिवाय स्वदेशबांधवांत त्यांचा प्रसार करण्याच्या हेतूने थोडा-बहुत लोकापवाद, उपहास व त्रास सोसण्यास जे प्रवर्त होत असतील, त्यांनी ते भिन्न विचार जाणूनबुजून व बऱ्याच शोधाअंतीं पत्करले असतील, असें साधारण प्रतीच्या उदार व समंजस लोकांस कबूल करणें भाग आहे. तसेंच ज्याने आपल्या मनाशीं बरीच 'भवति न भवति' करून असल्या विचारांचा अंगीकार केला आहे, तो अडाणी म्हणजे अशा गोष्टींचा विशेष काथ्याकूट ज्याने केला नाही अशा प्रतिपक्षांनी केलेल्या चमत्कारिक प्रश्नास बुजणार नाही, किंवा त्यांचीं साफ उत्तरें देण्यास डगमगणार नाही, हेंहि त्यांस मान्य केलें पाहिजे. आमच्या 'अपरिचित मित्रा'ने आम्हांस जे प्रश्न केले आहेत, त्यासंबंधाने तो बराच 'अपरिचित' असावा असें आम्हांस वाटतें. तथापि अशा प्रकारच्या प्रश्नांला आम्ही उचित वाटतात तीं उत्तरें देऊन, आपल्या प्रतिपक्ष्याकडून किंवा उलट विचारांच्या लोकांकडून पक्षान्तर किंवा विचारान्तर करावें हाच या 'सुधारका'च्या अवताराचा मूळ हेतु असल्यामुळे आजपर्यंत अशा प्रकारच्या प्रश्नांचीं उत्तरें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने देण्यांत आलीं आहेत, व पुढेंहि तसें करण्यांत येईल. यावरून आमच्या 'अपरिचित मित्रा'ने असें समजूं नये की, ज्या शंका किंवा जे प्रश्न त्यास निरुत्तर किंवा अनुत्तर वाटताहेत त्यांचें समाधान करणें कांही तरी लपंडाव करून आम्ही कालान्तरावर टाकतों आहों. वास्तविक पाहतां तसें करण्याचें बिलकुल प्रयोजन नाही. तथापि त्याने हें ध्यानांत ठेविलें पाहिजे की, पत्रें पाठविणारांकडून ज्या शंका येतील त्यांचीं उत्तरें देत बसण्याचा प्रघात पडल्यास, अशा विषयाविषयी ज्या पद्धतीने लिहीत गेलें असतां, ते आमच्या वाचकांस सुगम होतील असें आम्हांस वाटत आहे ती पद्धत आम्हांस सोडून द्यावी लागेल; आणि पत्रलेखकाच्या लहरीप्रमाणे या विषयावरून त्या विषयावर आम्हांस उतरावें लागेल. असा प्रकार आम्हांस सोयीचा नाही, व वाचकांस आवडणार नाही. तथापि 'अपरिचित मित्रा'स अगदीच निराश करणें हेंहि बरें नाही, म्हणून त्याच्या प्रश्नांपैकी कांहीस अगदीं स्वल्प उत्तरें देतों. एवढ्याने

त्याची समजूत होईलच असें नाही; तथापि नाइलाजास्तव त्याने तेवढ्यांतच गुजारा करून घेतला पाहिजे. आमच्या सोलापूरकर ‘ अपरिचित मित्रा ’चे जे चार प्रश्न आहेत त्यांवर आम्ही दिलेलीं उत्तरें त्यास मानवतील, किंवा तीं सर्वांशीं बरोबर असतील असाहि आमचा अभिमान नाही. तथापि तीं चुकीचीं आहेत अशी आमची खात्री होईपर्यंत आम्ही तीं बरोबरच समजणार ! आमच्या मित्राच्या प्रश्नांस उत्तरें देण्याचा आरंभ करण्यापूर्वी, पुराणप्रिय मनुष्यांच्या अंतःकरणांतील एका सामान्य प्रवृत्तीविषयी येथे थोडासा उल्लेख करणें जरूर आहे. ती प्रवृत्ति ही,—कांही मनुष्यें जुन्या चालींस व जुन्या विचारांस चिकटून असतात, किंवा आपण त्यांस चिकटून आहों असें तरी त्यांना वाटत असतें. ही एका प्रकारच्या मनुष्याची गोष्ट झाली. दुसऱ्या प्रकारचे लोक आसमंत स्थिति फिरली आहे असें पाहून तिला अनुकूल असें वर्तनान्तर आपण व दुसऱ्यांनी करावें असें इच्छितात; आणि जेवढ्या हितावह नवीन गोष्टी आपल्या हातून होण्यासारख्या असतात, तेवढ्या स्वतः करूं लागून त्यांचा चांगुलपणा लोकांच्या नजरेस आणितात, आणि त्या लोकांनी कराव्या, असा उघडपणे उपदेश करतात. या दोन प्रकारच्या लोकांत वास्तविक पाहतां विशेष अंतर नसतें. दोघांचेंहि कमी-अधिक प्रमाणाने वर्तनान्तर होतच असतें; कारण आसमंत स्थिति बऱ्याच अंशीं बदलली असतां वर्तनान्तर होऊं न देणें ही मनुष्याच्या आटोक्या-बाहेरची गोष्ट आहे, असें म्हणण्यास हरकत नाही. उदाहरणार्थ, येथे मुसलमानांचा अंमल होण्यापूर्वी येथील लोकांचें जें वर्तन होतें तें ५-६ शें वर्षांच्या अंमलांत अगदी कायम राहिलें असें कोणाच्यानेहि म्हणवणार नाही. तसेंच, येथे इंग्रजी राज्याचा पाया पडल्यापासून आतापर्यंत ज्यांच्या वर्तनावर त्यांच्या अंमलाचा बिलकुल परिणाम घडला नाही असा एकहि इसम मिळणार नाही असें वाटतें. इंग्लिश लोकांनी स्थापिलेली राज्यपद्धति, इंग्लिश लोकांकडून मिळत असलेलें शिक्षण, इंग्लिश लोकांशीं होत असलेला सहवास, इंग्लिश पद्धतीचे कारखाने, गिरण्या, आगगाड्या, तारायंत्रें, आगबोटी इत्यादि गोष्टींनी येथील सर्व वर्गांतल्या, सर्व पदवींच्या व सर्व वयाच्या लोकांच्या वर्तनांत अलीकडील शंभर वर्षांच्या अंमलामुळे बराच फेरफार झाला आहे, यांत काडीमात्र संशय नाही. तथापि जे पुराणप्रिय लोक

आहेत त्यांना आपण जशाचे तसेच आहों असें वाटत आहे. ज्याप्रमाणे वेगाने चालणाऱ्या आगगाडींत किंवा आगबोटींत, अथवा झपाट्याने उडणाऱ्या विमानांत बसणारांस आपण अगदीं स्थिर आहों, पण सभोंवतालच्या वस्तु मात्र वेगाने हालत आहेत असा दृग्भ्रम होतो, त्याप्रमाणे या लोकांच्या मनाची स्थिति असते. यांत आणि सुधारकांत भेद एवढाच की, ज्या दिशेला हे लोक कधी नकळत व कधी निरुपायास्तव इच्छेविरुद्ध जात असतात, त्याच दिशेला **सुधारक** जाणूनबुजून व मार्गांत जे अडथळे असतील ते होतील तितके दूर करून संतोषाने जात असतात. 'बालविवाहा'चा पगडा बराच कमी झाला आहे; 'स्त्रीशिक्षणा'चा प्रसार झपाट्याने होत आहे; 'विधवावपन' बरेंच मागे पडत चाललें आहे; शेंपन्नास 'स्त्री-पुनर्विवाह' झाले आहेत, व थोड्या वर्षांत त्यांची संख्या बरीच होऊन त्यांतील अधर्मतेचा व अप्रशस्तपणाचा भाग नाहीसा होईल अशीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. 'संमतिवया'चा कायदा तर पसार होऊन गेला. या गोष्टी डोळ्यांपुढे धडधडीत घडून येत असतां किंवा आल्या असतां, व कामधंद्याच्या आणि प्रवासाच्या निमित्ताने नानाप्रकारच्या जातींच्या व आचारविचारांच्या लोकांचें संघट्टन होतें त्यामुळे धर्मविषयक, समाजविषयक व राज्यविषयक विचारांत व कल्पनांत प्रतिदिवशीं अंतर पडत असता, जे कोणी आम्ही आहों तेथेच आहों, व तसेंच करणें आम्हांस हितावह आहे असें विधान करतात, त्यांस का अंध म्हणावें, का भ्रान्तिष्ट म्हणावें, का वृथाभिमानी आणि हट्टी म्हणावें, हें आम्हांस समजत नाहीं. तात्पर्य, सामान्य लोक कोणत्याहि नवीन आचारास किंवा विचारास तो रूढ होईतोंपर्यंत नांवें ठेवीत असतात, व जेव्हा त्यांना नकळत किंवा समजूनउमजून ते त्याच्या कक्षेंत सांपडून तींत भ्रमण करूं लागतात, तेव्हा ते त्यास नांवें ठेवीनासे होतात, असा साधारण नियम आहे; व हाच नियम त्यांस प्रत्येक गोष्टींत लागू पडतो असें दिसून आलें आहे. तेव्हा स्त्रियांची दास्यस्थिति नाहीशी करणें, हिंदुधर्माचें संशोधन करून त्यास निर्विकल्प स्वरूप आणणें, किंवा जातिभेदाचें निर्मूलन करून ज्याला त्याला स्वतःच्या शारीरिक व मानसिक सामर्थ्यानुरूप स्वहितसाधन व परहितसाधन करूं देणें वगैरे ज्या सुधारणांविषयी अर्वाचीन **सुधारक** विचार करूं लागले

आहेत, उघडपणे बोलूं लागले आहेत, व सामर्थ्यानुरूप आचरण करूं लागले आहेत,—त्या सुधारणांच्या पाशांत हे स्वतःस ‘ सुधारणानिंदक ’, ‘ सुधारणा-द्वेष्टे ’ किंवा ‘ पुराणप्रिय ’ म्हणवून घेणारे लोक सांपडले असून, त्यांच्या मनांत असो किंवा नसो, भारलेल्या किंवा तोंडें बांधलेल्या चालत्याबोलत्या वस्तूंप्रमाणे ते त्याच्या पाठीमागे जात असतां जाणूनबुजून त्यांचा अंगीकार करणारांचा ते उपहास करितात, किंवा कधी कधी त्यांचा छल करण्यासहि प्रवृत्त होतात हा केवढा चमत्कार ? किंवा यांत चमत्कार तरी कसला ? तो त्यांचा प्रकृतिगुणच आहे; आणि प्रकृतिगुणानुसार आचरण करण्या-बद्दल त्यांना विशेष दोष लावणें हेंहि उचित नाही. अशा लोकांकडून होणारा अडथळा व त्रास यांबद्दल त्यांचा तिरस्कार न करतां, **मनुष्यतेचें ऐहिक सुखवर्धन ह्या सार्वत्रिक भावी धर्माची ज्यांनी दीक्षा घेतली असेल त्यांनी कोणास न भितां, आपल्या मनास जें शुद्ध, प्रशस्त व कल्याणप्रद वाटत असेल तें दुसऱ्यास सांगावें, आणि तदनुसार होईल तेवढें आचरण करावें हेंच त्यांस उचित आहे.** अशा रीतीने वागत असतां, जर पूर्वपद्धतीचा कोणी मनुष्य त्यास असा प्रश्न करील की, तुम्ही बोलतां त्याप्रमाणे वागत कां नाही ? तर त्यावर असें उत्तर द्यावें की, हा प्रश्न विचारण्याचा तुम्हास अधिकार नाही; तुम्हांस जीं मतें मान्य आहेत त्याप्रमाणे, किंवा ज्या शास्त्रकारांस तुम्ही पूज्य मानतां त्यांच्या आज्ञेप्रमाणे ज्या दिवशीं तुम्ही आपलें वर्तन ठेवून दाखवाल त्या दिवशी हा प्रश्न तुम्ही मला करण्यास या. तोंपर्यंत तुम्हांला जो मार्ग प्रशस्त वाटेल त्याने तुम्ही जा, आणि मला वाटेल त्याने मी जातों ! असें खरमरीत उत्तर दिल्याशिवाय उठल्याबसल्या सुधारकांच्या नांवाने खडे फोडणाऱ्या जुन्या कोल्ह्यांचें तोंड कोणासहि बंद करतां येणार नाही ! जुन्या पिढींतील लोकांत दुराचार व अधर्म काय थोडा आहे ? खोटें बोलणें, पैसा खाणें, प्रशस्तपणे हिंदु किंवा अहिंदु जातीच्या अंगवस्त्रांशी व्यवहार ठेवणें, वगैरे गोष्टी सदोष आहेत असेंहि त्यांपैकी बऱ्याच जणांस वाटत नाही ! वर्ष-प्रतिपदेपासून फाल्गुन वद्य अमावास्येपर्यंत अशा प्रकारच्या आचारांत गढून गेलेल्या लोकांनी हव्या त्या यात्रा करून दर पौर्णिमेला व अमावास्येला सगळ्या तोंडाचें क्षौर करविलें, महिन्यांतून चार-पांच

उपवास केले, मधून मधून ब्राह्मण जेवूं घातले, व प्रतिदिवशीं देवांच्या डोक्यावर फुलांच्या, दूर्वांच्या व बिल्वपत्रांच्या लाखोल्या वाहिल्या, किंवा श्रावणी पौर्णिमेस पंचगव्याच्या पंचपात्र्याच्या पंचपात्र्या पिऊन फस्त केल्या, तरी त्यांना अलीकडील आर्यसमाजाच्या, प्रार्थनासमाजाच्या, किंवा ब्रह्म-समाजाच्या कोणत्याहि अनुयायांस दोष देण्यास अधिकार प्राप्त होतो असें आम्हांस वाटत नाही. तसेंच हलवायाच्या घरची मिठाई, आगगाडींतल्या लाडू-करंज्या, आणि भाज्यांच्या गाडींतल्या किंवा तट्टावरच्या भाजणीच्या दशम्या, शुद्ध म्हणून बिनदिक्कत खाणाऱ्या मनुष्याने स्टेशनवरील घटांतलें (चाटींतलें) पाणी, सोडा वॉटरची बाटली, किंवा मेस्मनाने आणून दिलेला चहाचा पेला यांनी आपली तहान भागविणाऱ्यांस, किंवा पेपरमिटाच्या वड्यांचा, जंताच्या मोदकांचा, आणि इंग्रजी दवाखान्यांतील हवें तें औषध निःशंकपणे घेणाराने भुलेश्वराच्या बाजारांतील भाज्या किंवा पुऱ्या विकत घेऊन, अथवा स्टेशनवरील एखाद्या फरनँडिसपासून किंवा नवरोसजीपासून बिस्कुटांचा डबा घेऊन त्यावर आपली भूक भागविणारांस धर्मभ्रष्ट म्हणून कां हंसावें हें सांगणें कठिण आहे. तथापि धार्मिक व सामाजिक विषयांत सामान्य लोक स्वतंत्रपणे विचार करणारे असते, व अंधपरंपरेसारखे गतानुगतिक नसते, तर येवढालीं धर्मयुद्धें आणि घनघोर सामाजिक कारणें कशाला झालीं असतीं? एकंदरींत, थोड्याबहुत कलहाशिवाय मनुष्याचें पाऊल पुढे पडून त्यास कोणत्याहि प्रकारची उन्नतावस्था येणें अशक्य दिसतें. हें खरें असेल तर स्थाणुवत् आचरण करणारे जुने लोक सुधारकांवर हरएक गोष्टींत तुटून पडूं लागले तर त्यांनी तरी त्यांची येवढी मुर्वत कां ठेवावी हें आम्हांला समजत नाही. प्रीति प्रीतीस व अवज्ञा अवज्ञेस प्रसवते, ही गोष्ट सर्वांनीच ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

आता आमच्या मित्राच्या चार प्रश्नांस देववतील तितकीं स्वल्प उत्तरें देऊन या आजच्या सरमनाचा शेवट करून "आमेन" म्हणतों. सोलापूरकर 'अपरिचिता'चा पहिला प्रश्न असा आहे की, "समाजांत एकंदर सुधारणा हव्यात तरी कोणत्या!" 'सुधारका'ला असा प्रश्न करणें म्हणजे काय झालें असतां तूं 'सुधारक' या 'पदवी'चा त्याग करण्यास

तयार होईल असें त्यास विचारण्यासारखेंच आहे ! त्यावर त्याचें उत्तर येवढेंच आहे की, बालविवाहाचें नांव नाहीसें झालें, प्रत्येक स्त्रीस शिक्षण मिळूं लागलें, विधवावपन अगदी बंद झालें, स्त्रीपुनर्विवाह सर्वत्र रूढ झाला, व संमतिवयाच्या कायद्यासारखे अनेक कायदे पसार झाले तरी त्याची " तृप्ति " होण्याचा संभव नाही ! त्याच्या सुधारणाबुभुक्षेस मर्यादाच नाही असें म्हटलें तरी चालेल ! ज्याप्रमाणे समुद्राला नद्यांचा, चितेला प्रेतांचा, लोभ्याला द्रव्याचा, दुर्वासाला अन्नाचा, कर्णाला दानाचा व धर्माला शान्तीचा कंटाळा कधी येत नाही किंवा आला नाही, त्याप्रमाणे खऱ्या सुधारकाला सुधारणेचा वीट येण्याचा कधीच संभव नाही. मनुष्याच्या स्थितीस पूर्णता येणें बहुधा अशक्य आहे; पण ती येईतोंपर्यंत सुधारकाच्या मनाची शान्ति व्हावयाची नाही ! तेव्हा अमुक झालें म्हणजे तुम्ही आपलें तोंड बंद कराल काय? किंवा तमुक झालें म्हणजे स्वस्थ बसाल काय? असले वेडगळपणाचे प्रश्न त्यास करण्यांत कांही अर्थ नाही. त्यास अवश्य वाटत असेल ती सुधारणा झाल्यावर तो कदाचित् कांही दिवस विश्रान्ति घेईल, किंवा इतर गोष्टींत दुसऱ्याशीं ऐक्य ठेवण्यासाठी आपल्या विचाराचें घोडें फारसें पुढे ढकलणार नाही; पण तेवढ्यावरून त्याला सुधारणेचा किळस आला आहे असें कोणीहि समजूं नये. सध्या आपल्या देशांत ज्या सुधारणांची वाटाघाट चालली आहे त्या अमलांत आल्यावर, जातिभेद मोडणें, धर्मसुधारणा करणें, मदिरा व मांस यांचें सेवन बंद होणें वगैरे अनेक गोष्टींकडे लोकांचें लक्ष लागलें पाहिजे. सर्वांत सार्वजनिक शिक्षणाची फार आवश्यकता आहे. हिंदुस्थानांतील एकूण एक प्रौढ स्त्रीपुरुषांस लिहितां वाचतां आलें पाहिजे; तसेंच प्रत्येक व्यक्तीस आपला चरितार्थ चालविण्यासारखा एखादा तरी धंदा येत असला पाहिजे; सारांश, वयांत आलेल्या कोणत्याहि व्यक्तीस आपल्या उदरनिर्वाहासाठी दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची पाळी येऊं नये असें झालें पाहिजे. इतकेंच नाही, तर सहजगत्या उदरपोषण करतां येऊन, दिवसाचा काही वेळ आत्मचिंतनाकडे, आवडत्या शास्त्राच्या अभ्यासाकडे, मनास रुचेल ती करमणूक करण्याकडे, किंवा विश्रान्तीकडे लावतां आला पाहिजे. या सर्व गोष्टी घडून येण्यास किती शतकें लागतील हें सांगतां येत नाही. पण ज्या अर्थी 'अपरिचित मित्रा'ने समाजांत सुधारणा

हव्यात तरी कोणत्या ?— असा प्रश्न केला आहे, त्यां अर्थी कांही ठळक सुधारणांचें येथे दिग्दर्शन करणें भाग पडलें.

सोलापूरकरांचा दुसरा प्रश्न असा आहे की, सुधारक तरी म्हणावें कोणाला ? यावर आमचा असा उलट प्रश्न आहे की, सुधारकांच्या वर्तनावर किंवा विचारावर टीका करण्यास अधिकार तरी आहे कोणाला ? जोंपर्यंत या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर कोणाकडूनहि आलें नाही, तोंपर्यंत सुधारक कोणास म्हणावें ? सुधारकाची पदवी मिळण्यास कोणत्या प्रकारची योग्यता अंगीं असली पाहिजे ? स्वधर्माचा, स्वाचारविचारांचा व देवांचा कंटाळा करून सुधारकपण येतें की काय ? इंग्लिश लोकांच्या अनुकरणांत सुधारकपणा किती आहे ? वगैरे निंद्राप्रचुर प्रश्नांचें उत्तर देत बसण्याची गरज नाही. या प्रश्नांत गर्भित केलेल्या अर्थाची व्याख्या कोणासहि सुधारकाने दिलेली नाही अशा अर्थाची व्याख्या सुधारकांचे निंदक करतात. निंदकांनी केलेल्या व्याख्येकडे सुधारकांनी लक्ष कां द्यावें हें समजत नाही. सुधारकांस निराळ्या प्रकारचें शिक्षण मिळालें असल्यामुळे त्यांचे राजकीय, सामाजिक व धार्मिक विचार निराळ्या तऱ्हेचे बनले, आणि म्हणून त्यांना पूर्वीचे विचार नापसंत होऊं लागले तर त्यांत त्यांचा काय दोष आहे ? मेलेल्या जनावरांचें मांस खाऊन अति गलिच्छ रीतीने जो महारवाड्यांत आपलें आयुष्य काढतो अशा मनुष्याच्या आचारविचारांत आणि एखाद्या पर्वताच्या शैलावर पिकलेलीं पानें खाऊन आत्मानात्मविचारांत सर्व जन्म काढणाऱ्या योग्याच्या विचारांत केवढें अंतर असलें पाहिजे बरें ? सुधारणा करण्याचा विचार मनांत येण्यास आपल्या रीतीहून भिन्न रीति, आपल्या विचाराहून भिन्न विचार, आपल्या कल्पनांहून भिन्न कल्पना, आपल्या शास्त्राहून भिन्न शास्त्रें, आपल्या धर्माहून भिन्न धर्म, आपल्या भाषेहून भिन्न भाषा, आपल्या पेहरावाहून भिन्न पेहराव वगैरे अनेक गोष्टी अवलोकनांत येऊन त्यांपैकी बऱ्या कोणत्या व वाईट कोणत्या, याचा निवाडा करतां येण्यासारखें बुद्धिसामर्थ्य असलें पाहिजे. इंग्रजांचें राज्य होऊन, आम्हांस पाश्चिमात्य शिक्षण मिळूं लागल्यापासून अशा प्रकारच्या तारतम्याचा विचार करण्यास आम्हांस बरीच संधि सांपडूं लागली आहे. पण इंग्लिश लोकांच्या आणि आमच्या आचारविचारांत बरीच तफावत असल्या-

मुळे, व चांगुलपणाचें पारडें त्यांच्या अंगास झुकत असल्यामुळे, त्यांचे आचारविचार उचलण्याकडे ज्यांच्या मनाची प्रवृत्ति होते ते, ज्यांना पाश्चिमात्य शिक्षण न मिळाल्यामुळे ( जे ) जसेच्या तसेच राहिले आहेत अशा पूर्वपद्धतीच्या लोकांच्या द्वेषास पात्र होतात. पण या कलहाचा आणि द्वेषाचा लौकरच अंत होणार आहे. थोड्या वर्षांत पहिलीं खोडें नाहीशीं होतील, आणि नवीन आचारविचारांचें चोहोंकडे साम्राज्य होईल. असें झाल्यावर पिढीपिढींत जेवढा जेवढा मतभेद स्वाभाविकपणे होत जातो, तेवढ्यामुळेच होणारा कलह मात्र या देशांत दृष्टीस पडूं लागेल. अशा प्रकारचा कलह सर्व काळीं सर्व देशांत कमीअधिक प्रमाणाने दृष्टीस पडतो. पण सध्या अगदी भिन्न अशा दोन सुधारणांचें संघट्टन झालें असल्यामुळे उभयतांचा मोठा संग्राम माजून राहिला आहे. थोड्या दिवसांनी हिंदुसुधारणेच्या बऱ्याच भागांस पड खावी लागून रणांगणांतून आपला पाय काढून घ्यावा लागेल, आणि तिच्या जागीं विजयशाली पाश्चिमात्य सुधारणेचा बराच भाग स्थापित होईल. हिंदु लोकांच्या कमाईत जेवढा चांगला भाग आहे तेवढा गमावण्याची कोणासहि भीति नको. जें चांगलें आहे तें कोणीहि टाकीत नाही. तात्पर्य, फार थोड्या काळांत पूर्व-पश्चिम सुधारणांतील अत्यंत हितकारी भाग जींत सामील झाले आहेत अशा एका नामी सुधारणेची येथे स्थापना होऊन, भारतीय आर्य अननुभूतपूर्व अशा आधिभौतिक व आध्यात्मिक सुखाचा उपभोग घेऊं लागतील असा आमचा तर्क आहे !

सोलापूरकरांच्या तिसऱ्या व चौथ्या प्रश्नांचीं उत्तरें आता निराळीं देण्याची गरज उरली नाही. सुधारकांना हिंदुधर्माचा कंटाळा आला आहे की काय ? धर्मावांचून मूढ जनांचा निर्वाह होईल किंवा नाही ? श्रीशंकराचार्यांकडून धर्मसुधारणा करून घेतां येईल की नाही ?–वगैरे नानाप्रकारच्या प्रश्नांस नानाप्रकारचे सुधारक नानाप्रकारचीं उत्तरें देऊं शकणार आहेत; व या नानात्वांतच सुधारणेचें रहस्य आहे ! तथापि या प्रश्नांवर जीं आमचीं उत्तरें आहेत त्यांचा आम्हीं ध्वनि तर केलाच आहे. याहून ज्यांना आमचीं मतें विस्तृत रीतीने जाणण्याची इच्छा असेल, त्यांनी '**सुधारका**'चें वाचन नित्य सुरू ठेवावें ! याशिवाय त्यांचें समाधान करण्याचा दुसरा मार्ग नाही, याबद्दल आम्हांस मोठी दिलगिरी वाटते !

# महाराष्ट्रीयांस अनावृत पत्र : : ६

प्रिय देशबांधवहो, संमतीच्या बिलाच्या संबंधाने '**सुधारकां**'त अलीकडे आलेल्या कांही निबंधांतील भाषेची तीव्रता पाहून, तुम्हांपैकी कित्येकांचीं मनें त्यावर रुष्ट झालीं असतील यांत संशय नाही. न्यू इंग्लिश स्कूल, डेक्कन एज्युकेशन सोसायटी व फर्ग्युसन कॉलेज वगैरे लोकोपयोगी संस्थांची स्थापना व उत्कर्ष, त्याचप्रमाणे 'मराठा' आणि 'केसरी' पत्रांचा अवतार, प्रसार, आणि करवीरप्रकरण वगैरे गोष्टींशीं या पत्राच्या नम्र लेखकाचा व रा. रा. बाळ गंगाधर टिळक यांचा असलेला संबंध ज्यांना ठाऊक आहे, व हे दोघे इसम बरींच वर्षें एकमेकांशीं कसे वागत होते हें ज्यांनी पाहिलें आहे, त्यांना '**सुधारका**'सारख्या नवीन पत्राचें जनन, रा. टिळक व रा. पाटणकर यांचा पहिल्या तीन संस्थांशीं नुकताच घडून आलेला विश्लेष, व प्रस्तुत वादांत **सुधारक** व **केसरी** पत्रांच्या चालकांनी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने एक-मेकांवर चालविलेला भडिमार पाहून या उभयतांच्या बेबनावास व फुटाफुटीस झालेलीं कारणें त्यांस ठाऊक नसल्यामुळे विषाद वाटणें हें फार स्वाभाविक आहे. पण रा. टिळकांस तीं कारणें अवगत असतां, ज्या पत्राचें आधिपत्य त्यांचे-कडे आहे त्याच्या गेल्या अंकांत "ज्यांना वादांत स्वपक्षाची उणीव झांकण्या-साठी परपक्षावर, आणि विशेषतः त्यांतील एकदोन व्यक्तींवर अपशब्दरूपी गोळीबार करणें हीनपणाचें वाटत नाही त्यांची कानउघाडणी करण्याच्या नादास लागणेंहि व्यर्थ होय. सार्वजनिक विषयावर वादविवाद करण्याच्या मिषाने खासगी द्वेषाचें उट्टें काढण्याची अमूल्य संधि क्वचितच मिळते." अशीं दोन वाक्यें आहेत. हीं वाक्यें जेव्हा आमच्या नजरेस पडलीं तेव्हा मात्र आम्हांस मोठा विस्मय वाटला! टिळक आणि आगरकर यांचा खासगी द्वेष आणि तो कशासाठी? टिळक आगरकरांचे किंवा आगरकर टिळकांचे कांही एक लागत नाहीत, आणि म्हणून एकाला दुसऱ्याचा 'खासगी' द्वेष करण्याचें कारण आजपर्यंत झालेलें नाही; इतकेंच नाही, तर त्यांपैकी निदान एकाच्या मताने तरी तें केव्हाच होण्याचा संभव नाही. त्या दोघांचा बेबनाव व

फुटाफूट होण्यास ज्या समाईक संस्थांचे ते दोन सेवक होते, त्या संस्था चालविण्याच्या पद्धतीविषयी व त्यांच्या उत्कर्षाच्या साधनांविषयी कोणत्याहि रीतीने एकवाक्यता न होणारा त्यांचा मतभेद कारण झाला, व याच मतभेदामुळे, प्रस्तुत वादांत ते एकमेकांची मुर्वत न ठेवतां, आपापल्या मतांचा आणि पक्षांचा विजय होण्यासाठी अन्योन्यावर तुटून पडत आहेत; दुसरें कांही नाही ! अशा रीतीने आपापल्या देशविषयक विचारांचें प्राबल्य स्थापण्यासाठी अंतःकरणपूर्वक झुंझणाऱ्या लढवय्यांचें संग्रामचातुर्य पाहात राहून व कौतुक करावयाचें विसरून जाऊन, अशा युद्धप्रसंगीं केवळ कर्णकटु टणत्कारांच्या श्रवणावरूनच प्रेक्षकांनी 'एकाला दुसऱ्याचा मत्सर उत्पन्न झाला आहे,' किंवा कोणी कोणाचें 'खासगी द्वेषाचें उट्टें काढून घेत आहे,' असा कुतर्क करणें अत्यंत अनुदार होय ! एका जननीच्या उदरांतून अवतरलेल्या सहोदरांतदेखील जर भांडण किंवा मतभेद झाल्याशिवाय राहात नाही; तर ज्यांचा एकमेकांशीं कोणत्याहि प्रकारचा कुलसंबंध नाही, व ज्यांनी राजसेवेचा सामान्य मार्ग सोडून देऊन आपापल्या मनास प्रशस्त वाटेल त्या रीतीने आपल्या हयातींत आपल्या हातून होईल तेवढें देशकार्य करण्याचा निश्चय केला आहे, त्यांचे विचार सर्वांशीं न जुळणें, व ज्याला त्याला प्रसंगविशेषीं आपापल्या विचारांचा पराकाष्ठेचा अभिमान उत्पन्न होऊन, एकदा उभयतांनी आरंभिलेल्या सामान्य गोष्टींस आमरण चिकटून राहणें स्वतःस किंवा इतरांस सुखास्पद व कल्याणप्रद होणारें नाही, अशी खात्री झाल्यामुळे ज्याच्या मनास जी दिशा अत्यंत आक्रमणीय वाटेल त्याने ती धरणें, यांत नवल वाटण्यासारखें काय आहे हें आम्हांस समजत नाही ! बांधवहो, विचारकलहाला तुम्ही इतके कशासाठी भितां ? दुष्ट आचाराचें निर्मूलन, सदाचाराचा प्रसार, ज्ञानवृद्धि, सत्यसंशोधन, व भूतदयेचा विचार इत्यादि मनुष्यांच्या सुखाची वृद्धि करणाऱ्या गोष्टी विचारकलहाखेरीज होत नाहीत. आजपर्यंत या देशांत हा कलह माजावा तितका कधीच न माजल्यामुळे, व बहुधा आमचे लोक 'गतानुगतिक'च असल्यामुळे हें भरतखंड इतकीं शतकें अनेक प्रकारच्या विपत्तींत खितपत पडलें आहे ! हा विचारकलह दुष्ट विकोपास जाऊं न देण्याविषयी मात्र खबरदारी ठेविली पाहिजे. नाही तर त्यापासून पुढे खऱ्या लढाया आणि रक्तस्राव होण्याचा संभव

असतो. सुधारक आणि दुर्धारक, चपल सुधारक आणि मंद सुधारक, थंडे सुधारक आणि गरम सुधारक, अथवा नानाप्रकारच्या मतांचे नवे आणि जुने लोक यांमध्ये सांप्रत काळीं जी दुही माजून राहिली आहे, ती पाहून घाबरून जाण्याचें बिलकुल कारण नाही ! पाश्चिमात्य शिक्षणामुळे ज्या दिवशीं या वादास आरंभ झाला तो दिवस हिंदुस्थानच्या भावी इतिहासांत महोत्सव करण्यासारखा होईल. त्या दिवशीं अनेक शतकें गाढ निद्रेंत घोरत पडलेला हिंदुस्थान देश किंचित् जागा होऊन चाळवूं लागला, किंवा प्रेतावस्था झालेल्या त्याच्या विस्तीर्ण देहांत ईशकृपेने पुनः एकवार चैतन्यावतार झाला असें म्हणण्यास हरकत नाही. त्या दिवशीं त्याचें स्थाणुत्व नाहीसें होऊन त्याला जी यत्किंचित् गति मिळाली ती प्रतिवर्षी अगदी यव-प्रमाणांत का होईना, पण सारखी वाढत आहे, व जों जों हा विचारकलह निकराचा होऊं लागेल तों तों झपाट्याने होऊं लागणार आहे. आता किती झालें तरी कलह तो कलह ! तो कशाहि प्रकारचा आणि कितीहि सौम्य असला तरी त्यांत अप्रिय असें कांहीच नाही, असें कोठून होणार ? ज्या दोन मनुष्यांचा परस्परांशीं संबंध आहे, त्यांपैकी एक दुसऱ्याच्या विरुद्ध जाऊं लागला म्हणजे कधी त्या दोघांस एकमेकांशीं वर्दळीस यावें लागेल; कधी एकमेकांवर शब्दप्रहार करावे लागतील; कधी उभयतांनी आरंभिलेल्या कामांतून अंग काढून घेऊन विलग व्हावें लागेल, कधी पदराला बराच खार लावून घ्यावा लागेल, किंवा जीवाकडे न पाहतां अहोरात्र मानसिक व शारीरिक कष्ट करावे लागतील; पण जोंपर्यंत आपण आपल्या विचाराच्या विजयासाठी, प्रचारासाठी भांडत आहों असें प्रत्येकाच्या मनांत वागत राहील तोंपर्यंत न्यायसभेंत पक्षकाराचें भांडण भांडणाऱ्या वकिलाच्या दिखाऊ वैराच्या पार पलीकडे अशा दोन व्यक्तींचें वैर जाईल असें आम्हांस वाटत नाही; व आगरकर आणि टिळक यांच्या वैराचें स्वरूप याहून भयंकर नाही असें निदान त्यांपैकी एकाला तरी वाटत आहे. तसेंच या वैरामुळे या दोघांच्या व्यासंगांत जें अंतर पडलें आहे तें कमी न होतां कदाचित् अधिकच होत जाण्याचा जरी संभव आहे तरी, जेव्हा खुद्द आगरकरांच्या किंवा आगरकरांच्या निकट आप्तांच्या डोळ्यांस पाणी येण्यासारखी कांही अनिष्ट गोष्ट घडेल तेव्हा इतरांपेक्षा टिळकांस, व

जेव्हा टिळकांचे घरीं तसा प्रकार घडेल तेव्हा आगरकरांस विशेष वाईट वाटून डोळयांस पाणी येईल; व मतभेदामुळे उत्पन्न झालेल्या वैराचा एका क्षणांत विसर पडून, एक दुसऱ्याला मदत करण्यास सहज प्रवृत्त होईल !

धर्म, राज्य व समाज यांसंबंधाने अलीकडे जे औपपत्तिक सिद्धान्त सर्वमान्य होऊन बसले आहेत त्यांविषयी आम्हां उभयतांत म्हणण्यासारखा मतभेद नाही. मनुष्याच्या बुद्धीचे व्यापार इंद्रियाधीन असल्यामुळे या बुद्धीने ब्रह्मांडाच्या आदिकारणांचें किंवा परमेश्वराचें यथार्थ ज्ञान होण्याचा संभव नाही. हें धर्मतत्त्व मनांत बाळगून धर्मकल्पनांत किंवा धर्माचारांत जे फेरफार करावयाचे ते करीत गेलें पाहिजे, राजकीय स्वातंत्र्य असल्याशिवाय कोणत्याहि देशांत ऐहिक सुखाची परमावधि व्हावयाची नाही, पाश्चिमात्य शिक्षणाचा प्रसार आणि इंग्लिश लोकांचें साहाय्य असल्याशिवाय आमचें डोकें वर निघण्याचा संभव नाही, याकरिता राजनिष्ठा यत्किंचित् ढळूं न देतां, राजकीय हक्क संपादण्यासाठी जें करणें असेल तें आम्हीं केलें पाहिजे; नीतिप्रसार, संपत्त्युत्पादन, आरोग्यरक्षण वगैरे अनेक महत्त्वाच्या गोष्टी ज्ञानाधीन असल्यामुळे लोकशिक्षणाचें काम जितक्या झपाट्याने चालवेल तितक्या झपाट्याने चालविलें पाहिजे; जातिभेद नाहीसा झाला पाहिजे, स्त्रीपुरुषांच्या ज्ञानांत व स्वातंत्र्यांत जेवढें अंतर राहूं देणें अपरिहार्य असेल तेवढयाहून अधिक राहिल्यास पूर्ण संसारसुख प्राप्त होण्याचा संभव नाही, म्हणून स्त्रियांची उन्नति करण्याबद्दल रात्रंदिवस झटलें पाहिजे वगैरे धार्मिक, राजकीय व सामाजिक विषयासंबंधाने स्थूल औपपत्तिक सिद्धान्त जसे एकाला तसे दुसऱ्यालाहि संमत आहेत. दोघांत जो मतभेद पडतो तो आज तारखेस हे सिद्धान्त अंमलांत आणण्यासाठी काय करतां येईल व तें कोणत्या साधनाने करतां येईल यासंबंधाने पडतो. या घटकेस साध्य असलेल्या सुधारणेची इयत्ता आणि तिचीं साधनें यांविषयी टिळकांचे बहुतेक विचार सामान्य लोकांस मान्य होण्यासारखे असल्यामुळे किंवा त्यांस मान्य असलेल्या विचाराबाहेर जाण्यास टिळक तयार नसल्यामुळे त्यांचें वर्तन **भवभूतीने** रामचंद्रांकडून वदविलेल्या—

**स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।**
**आराधनाय लोकानां मुञ्चतो नास्ति मे व्यथा ॥**

(अर्थः—स्नेह, दया, सौख्य, फार तर काय लोकांच्या संतोषासाठी मला जानकीचादेखील त्याग करावा लागला तरी त्याबद्दल खेद वाटणार नाही! या श्लोकार्थाप्रमाणे होत आहे, व या क्षणीं ते अत्यंत लोकप्रिय झाले असून प्रत्येकाच्या तोंडांतून त्यांचें नांव निघत आहे. पण लोकांना आज ज्या गोष्टी प्रिय आहेत त्या या हतभाग्य लेखकास पसंत नसल्यामुळे, लोकछंदानुवर्तन त्याला अशक्य झालें आहे; इतकेंच नाही, तर लोकांस अप्रिय परंतु पथ्यकारक असे विचार त्यांच्या मर्जीविरुद्ध पुनः पुनः त्यांचेपुढे आणणें हेंच आपलें कर्तव्य व जीविताचें सार्थक अशी त्याची दृढ कल्पना झाली असल्यामुळे, धार्मिक व सामाजिक गोष्टींत आपलें ज्ञान विकटोपर्यंत जाऊन पोहोंचलें आहे, व तत्संबंधक आचारांत सुधारणा करण्यास म्हणण्यासारखी जागा राहिलेली नाही; निदान त्या कामांत सरकारचें किंवा कायद्याचें साहाय्य घेतलें असतां सर्वथैव नुकसान होणार आहे असें समजणाऱ्या श्रद्धाळू पंडितमन्य व देशाभिमानी म्हणवून घेणाऱ्या जनसमूहाच्या उपहासाचें आणि रोषाचें स्थान त्याने आपणांस करून घेतलें आहे. तथापि त्याला असा भरंवसा आहे की, म्हणण्यासारखी द्रव्यानुकूलता नसतां, श्रीशिवाजीरावमहाराज होळकरांनी देऊं केलेली दरमहा पांचशें रुपयांची नोकरी ज्याने 'मला नको' म्हणून सांगितलें, विशेष बुद्धिसामर्थ्य किंवा शरीरसामर्थ्य नसतां, आज दहा अकरा वर्षे जो उत्साहपूर्वक शिक्षकाचा आणि लेखकाचा धंदा करीत आहे, कवडीची किफायत नसतां ज्याने सात आठ वर्षे सर्वत्र प्रसिद्ध 'केसरी' पत्राचे बऱ्यावाईट रीतीने 'रकाने' भरून काढले, इतकेंच नाही तर एका दुर्दैवी संस्थानिकास सुदशा यावी येवढ्याच बुद्धीने लिहिलेले लेख न्यायाधीशास अप्रशस्त वाटल्यामुळे त्यांनी दिलेली शिक्षा त्याने आनंदाने साहिली, हातीं असलेल्या पत्राचे मालक शुद्ध वाटेल तें लिहूं देत नाहीत असें दिसून आल्याबरोबर त्यांच्या धमकावण्यांकडे बिलकुल लक्ष न देतां, समान शीलाच्या व विचारांच्या मित्रांचें प्रोत्साहन व साहाय्य मिळतांच, सर्वतोमुखी निंदा होत असलेल्या **सुधारणे**चा आणि **सुधारकां**चा पक्ष लोकांस वाटत असल्याप्रमाणे दुर्बल नाही, इतकेंच नाही तर त्याचेंच अखेरीस सर्वत्र साम्राज्य होणार आहे, असें युक्तिवादाने सिद्ध करून देण्यासाठी कोणत्याहि गोष्टीची अनुकूलता

नसतां, व लोकमत धडधडीत विरुद्ध असतां नवीन पत्राच्या नसत्या उठाठेवींत जो जाणूनबुजून पडला; रूढ धर्माचारांतील आणि लोकाचारांतील व्यंगांचें निर्भयपणे आविष्करण करण्याचें भयंकर पाप हातून घडत असल्यामुळे, देशाभिमानी व धर्माभिमानी म्हणविणाऱ्या पत्रांकडून होत असलेला शिव्यांचा व शापांचा प्रचंड भाडिमार ज्याला व ज्याच्या निरपराधी स्त्रीला एकसारखा सोसावा लागत आहे; स्वमताचें मंडन व तदनुसार होईल तेवढें वर्तन करण्यासाठी आपल्या फार दिवसांच्या मित्रांचाचसा काय, तर रात्रंदिवस काळजी वाहून आणि कडेवर खांद्यांवर खेळवून ज्यांनी लहानाचें थोर केलें अशा अत्यंत ममताळू व पूज्य आप्तांचाहि दीर्घ रोष ज्याने आपणांवर करून घेतला आहे—अशा मनुष्याच्या लेखांत कितीहि प्रमाद होत असले व केवढीहि कटुता असली तरी ते समंजस मनुष्याच्या स्वल्प आदरास निदान थोड्याशा अनुकंपेस तरी पात्र झाले पाहिजेत. " हा वेडापीर इतके हाल, संकटें व लोकापवाद सोसून ज्या अर्थी इतकी धडपड करीत आहे त्या अर्थी ती लोकांस अंतीं हितावह होईल अशी निदान याच्या मनाची तरी खात्री झाली असावी," असा विचार त्यांच्या मनांत येऊन, त्यांनी त्याच्या दोषांबद्दल त्यास क्षमा केली पाहिजे. त्यांनी तसें केलें तर ठीकच आहे, पण नाही केलें तरी त्यास विशेषसें वाईट वाटण्याचा संभव नाही; कारण सारें जग त्यावर उलटलें तरी पुढील कविवाक्याचें स्मरण करून त्याला आपलें समाधान करून घेतां येतें—

**ये नाम केचिदिह नः प्रथयंत्यवज्ञाम् ।**
**जानन्ति ते किमपि तान्प्रति नैष यत्नः ॥**
**उत्पत्स्यतेऽस्ति मम कोपि समानधर्मा ।**
**कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ॥**

**अर्थ**—खरोखरीच जे या गोष्टींत आमची निर्भर्त्सना करतात, त्यांना कांहीच समजत नाही, व त्यांच्याकरिता हा आमचा प्रयत्नहि नाही. माझ्या शीलाचा एखादा इसम कोठे तरी असेल किंवा निपजेल; पृथ्वी अफाट आहे व काल अनंत आहे !

---

## शिवराम महादेव परांजपे, एम्. ए. ( १८६४–१९२९ )

चिपळूणकरांच्या परंपरेंतील ज्वलज्जहाल निबंधकार म्हणजेच 'काळ'-कर्ते शिवरामपंत परांजपे. शिवरामपंतांनी नाटकें, कादंबऱ्या व कविता यांची महाराष्ट्रसाहित्यांत भर घातलेली असली तरी त्यांच्या प्रज्ञेचा व प्रतिभेचा खरा भर त्यांच्या 'काळ'मधील निबंधांतच आढळेल. या साहित्यिकाचें मन रसिक, सौंदर्यान्वेषी व विदग्ध सहृदयाचें असलें व त्यावर संस्कृत वेदान्त-ग्रंथांची व पूर्वपरंपरांची छाप बसलेली आढळली, तरी त्या मनाची उभारणी राजकीय स्वातंत्र्यलालसेंतून झालेली होती. 'महाराष्ट्रा'च्या वातावरणांत उत्पन्न केलेला स्वातंत्र्याचा वारा, परकीय राजसत्तेसाठी उत्पन्न झालेला तिटकारा, मनाच्या चोचीला स्वातंत्र्याच्या अमृतबिंदूची लागलेली चटक, यांत—यांतच खरे शिवरामपंत आहेत. चिपळूणकरांच्या निबंधांत रूढ झालेले सर्व विशेष आत्मसात् करून शिवरामपंतांनी त्यांत उपहास व उपरोधाची भर घातली, काव्यात्मकतेने अलंकृत व रसोत्कट केलें, आणि रूपकात्मक पेहरावाचा नवा आविष्कार दाखविला. त्यांचा 'काळ' हा इंग्रज सरकारला काळच वाटला; आणि १९०८ मध्ये जेव्हा त्यांचे 'काळां'तील सर्व लेख जप्त झाले तेव्हा त्या प्रसंगाला उद्देशून त्यांनी 'भासाची भवितव्यता' हा कल्पित पण आत्मनिष्ठेने भरलेला रसोत्कट निबंध लिहिला. राजकीय

असंतोष निर्माण करण्याचा त्यांचा प्रयत्न ' ध्रुवाची गोष्ट ' या पौराणिक वातावरण निर्माण केलेल्या रूपकांतून जसा प्रत्ययास येईल तसाच तो ' शिवाजीची एक रात्र ', 'अदृश्य क्रान्तिकारकांची परिषद' इत्यादि निबंधांतूनहि येईल. त्यांच्या सौंदर्यलोलुप, रसिक वृत्तीचा अनुभव 'मदनदहन ', 'प्रणयिनीचा मनोभंग ' 'सापडलेलें संपुष्ट ' इत्यादि काव्यपूर्ण निबंधांत पटेल. मराठी वर्तमानपत्री निबंधांचें ललितस्वरूप त्यांच्या ' काळ 'मधील निबंधांत आहे, पण या वाङ्मयाला ' मवाळांना जहाल, भेकडांना कर्तबगार, आणि तरुणांना बंडखोर ' बनविण्याचें सामर्थ्य आहे. अवघ्या दहा वर्षांच्या 'काळां'तील निबंधांचा हा विलास खांडेकरांना " अग्निनृत्या "सारखा रम्य पण दाहक वाटतो, तर आचार्य जावडेकरांना ' काळांतील लेख हीं आधुनिक भारताच्या स्वातंत्र्याचीं सूक्तें ' वाटतात. स्वातंत्र्याचीं सूक्तें निबंधांतून उद्धृत करणारा थोर निबंधकार व त्या सूक्तांचें ओजस्वी विवेचन करणारा अद्वितीय वक्ता म्हणजेच शिवरामपंत !

---

आगगाडीचा प्रवास किती तरी चांगला! त्या मानाने आगबोटींत माणसाचे अतिशय हाल होतात! आणि लोकांचीं किती तरी सामाने समुद्रांत पडतात! नुकतेच थोडे दिवसांपूर्वी एक भटजी एका बंदरांत उतरत असतां त्यांचें मचव्यांत म्हणून टाकलेलें गाठोडें समुद्रांत पडलें! रात्रीची तीनचार वाजण्याची वेळ! पुष्कळ पाहिलें, पण गाठोडें कोठे दिसेना. भटजींनी नाखव्याला दोन पैसे द्यावयाला केले, पण उपयोग झाला नाही. त्यांना मोठी हळहळ लागली. आज पुष्कळ दिवसांपासून चालवलेला नेम टळणार, म्हणून त्यांना वाईट वाटूं लागलें. सूर्योदयाबरोबर आपल्या संपुष्टांतील देवांची पूजा केल्यावांचून आजपर्यंत ते कधी राहिले नव्हते. पण काय करणार! मचव्यांत बसून तसेच ते किनाऱ्यावर आले. पण त्यांच्या मनाची तळमळ राहीना. ते कांही पैशासाठी तळमळत नव्हते. कारण, त्या गरीब ब्राह्मणाच्या बोचक्यांतील सगळे पैसे गोळा केले असते तरी ते दोनचार आण्यांच्यावर भरले असते किंवा नाही याची शंकाच आहे. पण भटजी आपल्या देवांच्या संपुष्टासाठीच तळमळत होते. वास्तविक पाहिलें असतां त्या संपुष्टांतहि फारसें कांही नव्हतें. तें एक जुनें तांब्याचें संपुष्ट होतें. त्याला जीं दोन पुडें होतीं त्यांपैकी खालच्या पुडांत देव असून वरचें पूड झाकण म्हणून बसविलें जात असे. या संपुष्टाच्या तोंडाचा व्यास सरासरी दीड इंच असावा; आणि त्याच्या काठाचा घेर चार इंचांहून कांही थोडासा अधिक होता. अशा तऱ्हेच्या त्या दोन पुडांपैकी खालच्या पुडांत देवांना जी गादी म्हणून अंथरली होती ती बऱ्याच चित्रविचित्र रंगाच्या कपडयांनी तयार केलेली होती. या गादीची जन्मकथा थोडीशी ऐकण्यासारखी आहे. आगाऊ पैसे घेतल्यावांचून भटजी सहसा कोणाकडे कोणतेंहि धर्मकृत्य करीत नसत. परंतु एका शिंप्याने सत्यनारायणाच्या पूजेंत भटजींना चांगलाच गंडा घातला. उद्या सकाळीं पैसे देतों असें म्हणून शिंप्याने आदल्या दिवशीच आपला सत्यनारायण उरकून घेतला; पण पुढे तो पैसे देईना. पैसे बुडवि-

णाऱ्या लबाड शिंप्याला सत्यनारायण पावला; पण भटजींना सहा महिने झाले तरी पैसे पावले नाहीत ! भटजी रोज त्याच्या दुकानांत संध्याकाळचे पैसे मागण्याकरितां जाऊन बसत; पण कांही इलाज चालेना. एक दिवस त्याच्याकडे एका व्यसनी श्रीमंत मनुष्याची चंची शिवण्याकरितां बनातीचे कांही तुकडे आले होते. त्यांची चंची शिवून झाल्यावर त्या तुकड्यांचे जे तुकडे राहिले होते ते पाहून आपल्या संपुष्टांत आसन नाही याची आठवण होऊन भटजींच्या मनांत आपले पैसे वसूल करून घेण्याची कल्पना आली. शिंप्यानेहि असें पाहिलें की, उगीच सत्यनारायणाच्या पूजेचे पैसे बुडवून असत्यपणा आपल्या पदरीं कशाला यावयाला पाहिजे ! असें म्हणून त्याने त्या चिंध्यांच्या गाळामधून भटजींच्या संपुष्टांत बसण्याजोगी एक लहानशी वर्तुळाकृति सुमारें दोनतीन इंच घेराची रंगीरेरंगी गोधडी शिवून दिली. ती पाहून भटजींना फारच समाधान वाटलें; आणि ती गादी अंथरून त्यावर त्यांनी आपल्या देवांना बसविलें. तें संपुष्ट जरी बरेंच लहान होतें, आणि त्यांतलि गादी जरी अगदी आकुंचित होती, तरी त्या गादीवर भटजी गर्दीगर्दीने बऱ्याच देवांना बसवीत असत. त्यांपैकी एका देवाचा इतिहास बराच अश्रुतपूर्व आहे. तो पूर्वी एका वैदूच्या पोतडीमध्ये मात्रेची गोळी म्हणून राहत असे. त्या वैदूने त्याला उगाळून उगाळून अगदी गरगरीत व गुळगुळीत केलें होतें. कोणाच्याहि प्रकृतींत अवगुण उत्पन्न करावयाचा नाही हा त्या मात्रेंत मोठा गुण असे ! एके दिवशीं एका सोनाराच्या घरीं तो वैदू ती मात्रा म्हणून उगाळून देत असतां सोनाराला संशय आला. तेव्हा आता आपली लबाडी बाहेर पडणार अशा भीतीने ती मात्रा तेथेच टाकून तो वैदू पळून गेला. पुढे सोनाराने तो दगड वजन करून पाहिला तों सहा माशाला सुमारें दोन वाल तो कमी भरला. तेव्हा त्याने आपलें अर्ध्या तोळ्याचें जें वजन होतें तें मागे टाकून व हेंच अर्ध्या तोळ्याचें बरोबर वजन म्हणून पुढे आणलें. आणि त्या दिवसापासून प्रत्येक तोळ्यावर त्याचा तीन साडेतीन वाल नफा होऊं लागल्याकारणाने ह्या धोंड्यांत कांही तरी देवपणा असला पाहिजे असा त्याच्या मनाचा ग्रह होत चालला. आणि त्यामुळे प्रत्येक सोनें वजन करण्याच्या कामांत तो त्याला वरच्यावर वापरूं लागला. त्यामुळे तो जास्त जास्तच झिजत जाऊन त्या सोनाराचा जास्त जास्तच फायदा होऊं लागला.

अशा रीतीने त्या भावी देवाने त्या सोनाराच्या वाटव्यांत बारा वर्षें आपला देह झिजविला पुढे फार बोभाटा होऊन खोटीं वजनें वापरण्याच्या आरोपा-वरून पोलिसाने त्या सोनाराचा वाटवा जप्त केला, त्या वेळीं त्याचें वजन बरोबर ५ मासे आणि १॥ गुंज भरलें. हा दगड नव्हे, देव आहे, हा परिसाप्रमाणे सोनें देतो असे त्या सोनाराचे शब्द एका भाविक पोलिसाने झाड्याच्या वेळीं ऐकिले होते. त्यामुळे पुढे कांही काळानें एके दिवशीं चोरीच्या मुद्देमालाच्या संग्रहामधून हा दगड नाहीसा झाला ! परंतु पुढे त्या पोलिसाची नक्कल झाल्यामुळे त्याचे देव जेव्हा ब्राह्मणांना वांटून टाकण्यांत आले तेव्हा हा देव या भटजींच्या वांटणीला आला. आणि तेव्हापासून तो त्यांच्या संपुष्टामध्ये वास करीत होता. भटजी सूर्योपासक होते, व त्या-मुळे त्या संपुष्टांत त्यांनी एक सूर्यकान्तहि ठेविलेला होता. ते मोठे भाविक होते, व त्यांची त्या देवांवर अतिशय श्रद्धा असे. त्यामुळे तें संपुष्ट हरवल्या-बद्दल त्यांना फार वाईट वाटूं लागलें. पडाव किनाऱ्यापाशी लागल्यानंतर ते वाळूंतून बरेच लांब चालत गेले. तों इतक्यांत दुसरा कोंबडा आरवला. जवळच एक गोड्या पाण्याची विहीर होती. तेथें त्यांनी नित्यनियमाप्रमाणे प्रातःस्नान केलें आणि देवाची पूजा करण्याकरिता आसन घालून ते बसले. या सर्व गोष्टी नेहमीच्या सवयीप्रमाणे साहजिक घडून आल्या. परंतु पूजा करण्याला बसल्यानंतर संपुष्ट नाही याची आठवण होऊन ते अतिशय खिन्न झाले, व आसनमांडी मोडून दोन गुडघ्यांच्या मध्ये डोकें घालून, "देवा, तूं इतके दिवस माझे हातून सेवा घेतलीस, आणि आजच तूं मला कंटाळलास ?" असें म्हणत ते दीर्घ श्वास सोडीत बसले.

आपल्याला देव कंटाळला असें भटजींना वाटत होतें. पण वस्तुस्थिति तशी नव्हती. जणूं काय आजपर्यंतच्या कर्मनिष्ठत्वाने संतुष्ट होऊनच की काय कोण जाणे, या ब्राह्मणाला ज्ञानदृष्टि द्यावी आणि याच्यावर अनुग्रह करावा अशीच देवाच्या मनांत इच्छा उत्पन्न झाली असावी यांत संशय नाही. ती उषःकालची रमणीय वेळ होती. पक्षी आपल्या वृक्षावरील अंथ-रुणावरून उठून मंजुळ शब्द करूं लागले होते. तरी पण सगळीं झाडें अजून जागीं झालीं नव्हतीं. आणि जीं जागीं झालीं होतीं त्यांच्या योगाने त्या वेळचा शान्तपणा भग्न होण्याऐवजी जास्त आल्हादकारकच भासत होता.

सर्व जग शान्त आणि निर्विकार दिसत होतें. मनुष्याचे मनोविकार अद्यापि जागे होऊन त्यांचा गलबला सुरू झाला नव्हता. फुलें प्रफुल्लित झालीं होतीं, पण त्यांचा सुगंध वाहून नेण्याला अद्यापि वारे निजून उठले नव्हते. रात्रभर जळलेल्या दिव्यांतील तेलें संपत आलीं होतीं. माणसांनी गजबजणाऱ्या वाटा अगदी शून्य होत्या. जलाशयांचे पृष्ठभागावरील तवंग अद्यापि कोणीहि हालवलेले नव्हते. भूतलावर जिकडे तिकडे शान्तता पसरलेली होती. पण त्याच्यापेक्षा आकाशामध्ये जास्त शान्तता भरलेली दिसत होती. पश्चिमेच्या बाजूकडे वळून चंद्र निजलेल्या सर्व जगावर पहारा करीत होता, आणि नक्षत्रें आकाशसरोवरांतील कल्हारपुष्पाप्रमाणे टवटवीत आणि हृदयाल्हादक दिसत होतीं. पूर्वेस अरुणाचा प्रकाश दिसूं लागला होता, परंतु चंद्राच्या चांदण्याचें तेज अद्यापि कमी झालें नव्हतें. अशी सभोवतालची परिस्थिति असतां भटजीमहाराजांनी गुडघ्यांत घातलेलें डोकें बाहेर काढलें, आणि वर आकाशाकडे पाहिलें, तों पूर्वजन्मींचें सुकृत त्या वेळीं उभें राहून त्यांच्या डोळ्यांवरील मोह एकाएकीं गळाला. त्यांचें मन आल्हादित झालें, आणि तो आल्हाद त्यांच्या शरीरांत शिरतांना त्यांचें हृदय धडधड धडधड असें वारंवार कंप पावूं लागलें; सर्व अंग सात्त्विक विकारांनी युक्त झालें. प्रेमाने त्यांचे नेत्र पाझरूं लागले, आणि भटजीमहाराजांच्या तोंडांतून पुढे लिहिल्याप्रमाणे उद्‌गार निघालेः—"अहाहा! हें खरें संपुष्ट! काय ही दिव्य शोभा! भूतल हें या संपुष्टाचें खालचें पुड आणि आकाश हें त्याचें वरचें झांकण! किती अद्‌भुत, किती विस्तीर्ण आणि किती दिव्य संपुष्ट हें! द्यावापृथिवीच्या स्वरूपाने वेदांत आणि उपनिषदांत वर्णिलेलें तें हेंच संपुष्ट! परमेश्वराने स्वतः आपल्या हाताने हें संपुष्ट निर्माण करून मनुष्याच्या हवालीं केलें असतां त्याच्याकडे आजपर्यंत मीं कधी पाहिलें नाही! आणि माझें संपुष्ट हरवलें म्हणून मी शोक करीत बसलों! आणि जसें संपुष्ट तसेंच त्यांतील माझे देव! संपुष्ट हरवल्याबरोबर त्यांतील माझे देवहि हरवले! परंतु देवा, तूं कधी तरी हरवतोस काय? परमेश्वरा, तूं विश्वव्यापक असतांना कोठे आणि कसा हरवशील? पण ही गोष्ट मूढ जनांच्या लक्षांत येत नाही. तरी पण येवढें मात्र खरें की, आजपर्यंत अज्ञानामुळे माझें कांही तरी हरवलें होतें खास! आज तुझ्या कृपेने तें सर्व मला सापडलें. देवा, माझें हरवलेलें संपुष्ट

आज मला सापडलें! पृथ्वीतल आणि आकाशमंडल यांनी बनविलेलें संपुष्ट, त्यांत या उगवणाऱ्या सूर्यासारखी माझी मूर्तिमंत उपास्य देवता, आणि त्याच्यावर वाहण्याकरितां हीं नक्षत्ररूपी सुवर्णकमलें असतांना मीं अज्ञानाने मोहित होऊन व्यर्थ शोक काय करावा! या दिव्य संपुष्टामध्ये प्रत्यक्ष परब्रह्म कोंडलें आहे, आणि अनंतालाहि यामध्ये राहण्याला अवकाश आहे. हें जें विश्वात्म्याचें विश्वस्वरूप दिसत आहे याचें भजन, पूजन, अर्चन, मनन आणि निदिध्यासन केलें असतां काय प्राप्त होणारें नाही? यांचें चिंतन करतां करतां मनुष्य एतद्रूपच होऊन जाईल; आणि असें जो करील त्याच्यावर परमेश्वराची कृपा होईल, त्याचे सर्व संकल्प परमेश्वर सिद्धीस नेईल, आणि अंतीं त्याला परमेश्वराची स्वरूपता प्राप्त होईल!" इतकें म्हणून ब्रह्मांडीं चढलेला आत्मा भटजीमहाराज खाली उतरीत आहेत तों समुद्राच्या पाण्यांत तरंगत तरंगत लाटांच्या उसळीने किनाऱ्याला येऊन लागलेलें भटजी-महाराजांचें बोचकें घेऊन तो त्या पडावावरील नाखवा भटजींचा शोध काढीत त्यांच्याजवळ आला, व पूर्वी कबूल केल्याप्रमाणे दोन पैसे देऊन भटजींनी आपलें हरवलेलें संपुष्ट परत विकतहि घेतलें. पुढे लोकसंग्रहार्थ ते तें संपुष्ट आपल्याजवळ बाळगीत असत; परंतु त्यांची खरी जोपासना या दोन पैशांनी मिळणाऱ्या संपुष्टाइतक्या आकुंचित जागेमध्ये इतःपर कधीहि मावूं शकली नाही.

---

## ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे ! : ८

पूर्वी अशी एक वेळ होती की, जेव्हा देवभोळे आणि धर्मभोळे असेच बहुतेक लोक असल्यामुळे त्यांच्या मनोरंजनाकरिता वाटेल त्या बनावट थापा मारल्या तरी चालत असत. वेडगळ लोकांना असत्य किंवा अशक्य असें या जगामध्ये केव्हाच आणि कांहीहि नसतें; त्यांना सर्व कांही खपतें. त्यांच्या देवभोळेपणाला चक्षुरिंद्रिय हें देवाने मुळी दिलेलेंच नसतें; अशी स्थिति असल्यामुळे त्या पूर्वीच्या कालांत कोणीं कांही सांगितलें किंवा लिहून ठेवलें, तरी तें त्या वेळच्या बावळट लोकांना सर्वच खरें वाटत असे. परंतु हल्लीची स्थिति तशी नाही. हल्लीच्या काळांत देवभोळेपणा आणि धर्मभोळेपणा यांना बिलकूल जागा नाही. आणि हल्लीच्या या इंग्रजी अमदानीमध्ये तर कांही एका विशिष्ट नाण्याखेरीज दुसरें कोणतेंहि खोटें अगर हिणकस नाणें चालणें शक्यच नाही. हल्लीच्या दिवसांत प्रत्येक रुपया खणखणीत वाजवून मग घेण्यांत येत असतो. अशा काळांत जुन्या पुराणांतल्या कांही कांही गोष्टींवरून लोकांचा भरंवसा उडाला तर त्यांत कांही आश्चर्य आहे असें नाही.

जुन्या गोष्टींची छाननी करण्याकरिता हल्ली किती तरी नव्या संस्था निघालेल्या आहेत, व त्या संस्थांतून अलीकडे सगळे जाडे जाडे विद्वान् रात्रंदिवस मेहनत करीत आहेत. कोणी इतिहाससंशोधन करीत आहेत, तर कोणीं पुराणवस्तूंचें संशोधन चालविलें आहे; कोणी फाटके कागद वाचीत आहेत, तर कोणी ताम्रपटावरचीं अक्षरें उकलीत आहेत; कोणी पृथ्वीच्या पाठीवरील शिलालेख वाचण्यांत गुंतलेले आहेत, तर कोणी पृथ्वीच्या पोटांत गडप झालेलीं जुनीं शहरें उकरून काढून पृथ्वीच्या पृष्ठभागावर आणीत आहेत. कोणी पृथ्वीच्या पोटांत काय काय घटकावयव आहेत याचा शोध करीत आहेत, तर कोणी मंगळावरील रहिवासी लोकांशीं आपला पत्रव्यवहार सुरू करण्याच्या खटपटींत आहेत. कोणी पृथ्वीवर पसरलेल्या समुद्रांतील नवीन बेटांचा तपास करण्यासाठी फिरत आहेत, तर कोणी

उत्तरध्रुवाचा शोध लावण्याच्या लालसेने विमानांतून वर उडून खाली बर्फामध्ये बुडून जात आहेत. पुराणवस्तुसंशोधनाच्या अशा विविध लाटा चोहोंकडे उठत असतां त्यांचा प्रादुर्भाव आपल्या इकडेहि न होणें हें अगदी अशक्य आहे, व तदनुरोधानेच अलीकडे आपल्याइकडील एका मोठ्या शहरी पुराणवस्तुसंशोधकांची एक लहानशी टोळी स्थापन झाली आहे. कोणत्याहि संस्थेला जर स्थिरता उत्पन्न व्हावयाला पाहिजे असेल तर तिला आधी सरकारांत नेऊन रजिस्टर केली पाहिजे, ह्या राजमान्य तत्त्वाला अनुसरून या टोळीने हा आपला क्लब सरकारदरबारीं सुरुवातीला रजिस्टर करून घेतला आहे. त्यामुळे आता ही टोळी यावच्चंद्रदिवाकरौ चालू राहण्याला कोणत्याहि प्रकारची हरकत नाही. शिवाय या संस्थेने चांगलें काम करून दाखविलें तर सरकारकडूनहि या संस्थेला उत्तरोत्तर जास्त मदत मिळण्याला अडचण पडणार नाही. या संस्थेच्या सभा दर महिन्यांतून कांही ठराविक दिवशीं भरतात, व त्यांमध्ये पुराणवस्तुसंशोधनाच्या निरनिराळ्या विषयांवर निरनिराळे निबंध वाचले जातात. हे सगळेच निबंध नवीन माहितीने भरलेले असतात. परंतु 'ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे!' या मथळ्याचा जो एक निबंध नुकताच या संस्थेच्या लहानशा दालनांतील हजारो लांकडी खुर्च्यांच्या समोर वाचण्यांत आला, तो नवीन माहितीने तर भरलेला आहेच, परंतु त्यांतील अनुमानें करण्याची पद्धतहि अगदी नवीन आहे. त्यामुळे हा विषय वाचकांना मनोरंजक होईल असें वाटल्यावरून त्या निबंधांतील मुख्य मुख्य गोष्टींचा सारांश पुढे देण्यांत येत आहे:—

हा निबंध सदर संस्थेच्या चालू १९२६ सालच्या एका बैठकीमध्ये वाचला गेलेला असल्यामुळे त्याच्यांतील ताजेपणा अद्यापि बिलकुल शिळा झालेला नाही; व या निबंधाचे लेखक हे हल्लीच्या नवीन निघालेल्या प्रतिसरकारपक्षाचे एक खंदे शिपाई असल्यामुळे त्यांतील विचारसरणीहि सर्व लोकांना मान्य होण्यासारखी अशीच आहे.

त्या निबंधाच्या मथळ्यांत म्हटल्याप्रमाणे त्या निबंधांतील मुख्य प्रतिपाद्य विषय 'ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे!' हा आहे. व या विषयांतील सिद्धान्त अखेरीस मोठ्या मार्मिकपणाने आणि बिनतोडपणाने सिद्ध करून

दाखविण्यांत आलेला आहे. पण ध्रुवाची गोष्ट खोटी आहे हें सिद्ध करून दाखविण्याला पहिल्याने ध्रुवाची खरी गोष्ट काय आहे याची वाचकांना आठवण करून देणें आवश्यक आहे. सूर्यवंशामध्ये उत्तानपाद या नांवाचा एक मोठा राजा होता. त्याला सुरुचि आणि सुमति अशा दोन बायका होत्या. त्यांपैकी सुमतीच्याचपासून ध्रुव हा पुत्र उत्पन्न झाला; व असें होणें हें साहजिकच होतें. सुरुचि आणि सुमति यांच्यामध्ये निसर्गाच्या नियमाच्या अनुरोधाने सवतीमत्सरहि नांदत होता. व सुमतीच्या पोटीं ध्रुव हें पुत्ररत्न उत्पन्न झाल्यामुळे तर तो मत्सर जास्तच वाढत चालला होता. अशा स्थितींत ध्रुव हा सात आठ वर्षांचा झाल्यानंतर एके दिवशीं तो राजवाड्यामध्ये खेळत असतां उत्तानपाद राजाला त्या आपल्या मुलाबद्दल अनिवार प्रेम उत्पन्न होऊन त्याने त्याला आपल्या मांडीवर घेतलें. तें पाहून त्याची सापत्न माता जी सुरुचि तिला अतिशय त्वेष आला, व तिने त्याला लाथ मारून खाली ढकलून दिलें. तेव्हा ध्रुवाला वाईट वाटलें, आणि त्याने परमेश्वराला प्रसन्न करून घेऊन आपल्याला अढळपद मिळवून घेतलें. अशी या गोष्टीची सामान्य रूपरेषा आहे. ही गोष्ट विष्णुपुराण, श्रीमद्भागवत, वगैरे पुराणांतून अत्यंत हृदयद्रावक रीतीने वर्णिलेली आहे. ती गोष्ट वाचीत असतांना किंवा ऐकत असतांना ज्याच्या डोळयांतून अश्रु आले नाहीत, आणि ज्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले नाहीत असा मनुष्य विरळाच सापडेल!

पण आजपर्यंत ही ध्रुवाची गोष्ट वाचून लोकांनी जे अश्रु गाळले ते फुकट गाळले! कारण, या अडाणी लोकांपैकी एकालाहि अशी कल्पना आली नाही की, आपण ज्या गोष्टीसाठी आपले अश्रु फुकट दवडीत आहों ती गोष्ट अजीबात खोटी आहे! ज्या नवीन संशोधकांनी ही ध्रुवाची गोष्ट खोटी म्हणून ठरवली आहे त्याच्यापाशी त्यांच्या म्हणण्याला अगदी भरभक्कम पुरावाहि आहे. ते असें म्हणतात की, ही ध्रुवाची गोष्ट खरी असूं शकेल कशी? त्यांच्या वादविवादांतील मुख्य मुद्दा आपल्याला आई म्हणवून घेणारी ध्रुवाची सावत्र आई जी सुरुचि तिने ध्रुवाला किती लाथा मारल्या याच्याविषयीचा आहे. या मुद्द्याची शहानिशा करून घेण्याकरितां त्यांनी हिंदुस्थानांतील अनेक ठिकाणच्या सगळया अठराहि पुराणांच्या

छापील व हस्तलिखित प्रती जमविल्या आहेत. इतकेंच नव्हे, तर हिंदुस्थानांतून विलायतेस ज्या पोथ्या नेण्यांत आल्या आहेत त्याहि त्यांनी इंडिया ऑफिसच्यामार्फत आणविल्या आहेत. पण या सगळ्या पोथ्यांतील मूळ श्लोक व पाठभेद तपासून पाहतां त्यांत ध्रुवाच्या सावत्र आईने त्याला एकापेक्षा जास्त लाथ मारली असल्याचा उल्लेख कोणत्याहि पोथीमध्ये सापडत नाही. तेव्हा ध्रुवाच्या सावत्र आईने ध्रुवाला फक्त काय ती एकच लाथ मारली असली पाहिजे ही गोष्ट त्यांनी अशा पुराव्याने अगदी निर्विवादपणे सिद्ध करून घेतली आहे; व ध्रुवाच्या आईने ध्रुवाला मारलेल्या लाथांची संख्या एकापेक्षा जास्त बिलकुल नव्हती, हा सिद्धान्त त्यांनी आधी ठामपणे निश्चित करून घेतल्यानंतर या सिद्धान्ताच्या पायावर त्यांनी पुढे उभारलेली इमारत अशी आहे की, जर ध्रुवाला त्याच्या सावत्र आईने फक्त एकच काय ती लाथ मारलेली होती, तर तेवढ्यावरून त्याच्या मनांत इतका तीव्र उद्वेग कसा उत्पन्न व्हावा? एकच लाथ आणि तिच्यापासून इतका भयंकर त्वेष, यांच्यामधील कार्यकारणभाव शक्य दिसत नाही. या दोन गोष्टींत विसंगतपणा आणि असंभवनीयता हीं मात्र स्पष्ट दिसून येतात. फक्त एकाच काय त्या लाथेपासून इतका परिणाम उत्पन्न होईल कसा? आम्हीं इतक्या लाथा खाल्ल्या असून आमच्या मनावर त्या लाथांपासून कांही एक परिणाम झालेला नसतां तो या ध्रुवाच्या मनावर फक्त एकाच लाथेपासून व्हावा, हें अगदी असंभाव्य आहे! फक्त एक लाथ खाल्ल्याबद्दल इतकी लाज वाटावी? आम्ही पाहा! शेकडो लाथा खाल्ल्या आहेत, तरी फिरून निर्लज्जपणाने नोकरी पत्करून जास्त लाथा मिळविण्याची महत्त्वाकांक्षा धरीतच आहों! स्वराज्यप्राप्ति काय वाटेवर पडली आहे! त्याच्याकरिता निर्लज्जपणा, बेशरमपणा, कोडगेपणा इत्यादि सद्गुणांची कमाल उडवून द्यावी लागते, तेव्हा कोठे उन्मत्त झालेली राजसत्ता वठणीवर येते! म्हणे एका लाथेनेच लाज वाटली! पण एका लाथेने इतकी लाज वाटेल कशी? मनुष्यांचीं मनें हीं येथून तेथून सगळ्यांचीं सारखींच बनलेलीं असतात. आमचीं मनें कांही निराळ्या तऱ्हेचीं बनवून ध्रुवाचें मन मात्र एका लाथेनेच इतकें चिडून जाण्यासारखें देवाने ज्वालाग्राही बनविलें असेल, अशी कल्पना करणें हें

मानसशास्त्राच्या तत्त्वाच्या अगदी विरुद्ध आहे. असला पक्षपात परमेश्वर कधीहि करीत नसतो. तेव्हा ध्रुवाची ही गोष्ट कोणीं तरी बनावट करून जुन्या पुराणांतून घुसडून दिली असली पाहिजे, हें आम्ही स्वानुभवावरून निखालस ठरवूं शकतों. कारण ध्रुवाला इतका राग यावा कसा हेंच आम्हाला समजत नाही ! ध्रुवच काय तो तेवढा मनुष्य होता, आणि आम्ही काय जनावरें आहोंत ? त्याला जसें नाक, कान, डोळे होते तसेच ते आम्हांलाहि आहेत, व यावरून मनुष्यत्वावर आमचाहि तितकाच हक्क शाबीत होतो, हें कोणींहि कबूल केलें पाहिजे. मग आम्ही इतक्या लाथा खात असतां आम्हांला कधीहि राग शिवलासुद्धा नाही ! आणि या ध्रुवालाच कोठून एकदम इतका राग आला ? बरें, आमच्यापेक्षा त्या पोरसवदा ध्रुवाला राजकारणाचें जास्त ज्ञान होतें आणि म्हणून त्याला राग आला, असें म्हणावें तर तसेंहि दिसत नाही. कारण त्या सातआठ वर्षांच्या वेडगळ पोराला राजकारणांतील ज्ञान येणार कोठून ? कारण आम्ही जसे आज वीस वीस, पंचवीस पंचवीस वर्षें राजकारणामध्यें—एक पोट भरण्याचा उपाय म्हणून—मुरून गेलेले आहोंत, तशी ध्रुवाची थोडीच गोष्ट आहे ! आम्ही म्हणजे आजकाल राजकारणांतले अगदी मुरब्बी आहोंत ! अगदी मोरांबे आहोंत ! अगदी उकडांबे आहोंत ! फार काय, या राजकारणाच्या कर्दमांतील आम्ही अतिशय उच्च दर्जाचे प्राणी आहोंत ! राजकारणांत आजकाल आमचा हात धरण्याला कोण समर्थ आहे ? आणि राजकारणातील सर्व प्रकारचें ज्ञान आपल्यालाच तेवढें झालेलें आहे, असें दाखविण्याला जी साधनसंपत्ति लागत असते, ती तरी आमच्यासारखी त्या ध्रुवापाशीं होती कधी, की ज्याच्या योगाने त्याला राजकारणांतील रोज रोज बदलावीं लागणारीं रहस्यें कळूं शकतील ? आणि असें असतानाहि हे जुने लोक खुशाल आपल्या धर्मग्रंथांतून असंभवनीय गोष्टी दडपून देतात, आणि अडाणी लोकांना सांगतात की ध्रुवाला एक लाथ बसल्याबरोबर त्याने आपल्याला अढळपद प्राप्त करून घेण्याचा उद्योग सुरू केला ! आम्ही आज इतकीं वर्षें लाथा खात आहोंत, तरी आमच्या मनांत अजून एकदासुद्धा तीव्र उद्वेग उत्पन्न होत नाही, हें प्रत्यक्ष ढळढळीत सत्य सर्व लोक आपल्या डोळ्यांनी दररोज समक्ष पाहत असतां, त्याच लोकांनी त्या ध्रुवाच्या

कल्पित कादंबरीवर विश्वास ठेवण्याला तयार व्हावें हें मोठें आश्चर्य आहे ! फक्त एकाच लाथेमध्ये ताबडतोब स्वराज्य देण्याचा सद्गुण असता, तर आम्ही इतक्या लाथा खाऊनदेखील इतकीं वर्षे रखडत कां बसलों असतों? या अनुपलब्धीच्या प्रमाणावरूनहि ध्रुवाची गोष्ट निःसंशय खोटी असली पाहिजे ! ध्रुवाच्या फक्त एकट्या आईनेच त्याला लाथ मारली होती—आणि तीहि फिरून एकच ! पण आम्हाला तर आमचें मायबाप सरकार—म्हणजे आमची आईहि आणि बापहि अशीं दोघेंहि—आम्हांला फक्त एकच नव्हे, तर अनेक लाथांवर लाथा मारीत असतां आमच्यावर त्यांचा कांही एक परिणाम होत नाही ! यावरून लाथेमध्ये त्वेष उत्पन्न करण्याचा धर्म आहे असें जे कोणी समजत असतील, त्यांची हा कार्यकारणभाव मानण्यामध्ये मोठी थोरली घोडचूक होत असली पाहिजे !

आता कदाचित् याच्यावर कोणी अशी शंका काढील की, या राजकारणाच्या आणि स्वराज्यसंपादनाच्या बाबतींत लाथा बसल्या असतां त्वेष कोणाला येतो ? तर ज्याच्या मनाला रात्रंदिवस स्वराज्याची खरी तळमळ लागलेली असेल त्याच्याच मनाला त्वेष येतो. तर मग आमच्या मनाला तशी तळमळ लागलेली नाही की काय ? आम्हांला तळमळ लागलेली आहे, म्हणून तर आम्ही ही सगळी खटपट करीत आहों; आणि आमच्या मनांत स्वदेशभक्ति आहे, म्हणून तर आम्ही या सगळ्या लाथा खात आहोंत ! आमच्याइतकी सोशिक आणि सहनशील स्वदेशभक्ति दुसरीकडे सांपडणार आहे कोठें ! आमच्यामध्ये स्वदेशभक्ति आहे, म्हणून तर आम्ही केवळ स्वराज्यसंपादनासाठी आजपर्यंत इतक्या अनेक लाथा खाल्ल्या, तरी फिरून गुलामगिरीच्या नोकऱ्या पत्करण्याला आम्ही कंबर बांधीत आहों ! इतकें धैर्य आणि इतकी चिकाटी आहे कोठे दुसऱ्या कोणामध्ये ? आणि स्वदेशभक्तीवांचून असल्या ह्या नोकरीच्या खस्ता खाण्याला आणि त्या नोकरींतील लाथा खाण्याला कोण तयार होणार आहे ? ध्रुवाने एकदा एक लाथ खाल्ली, यांत काय मोठा पुरुषार्थ झाला ? " एकदा नव्हे, शंभरदा नव्हे, हजार वेळा कोणीं लाथा मारल्या, तरी फिरून आम्ही तुमची नोकरी करतोंच !" असें म्हणण्यांत जें मनोधैर्य आहे, तें एका लाथेबरोबर आपल्या शत्रूपासून पळून जाण्यामध्ये केव्हा तरी आहे काय ? या स्वराज्य-

संपादनाच्या बाबतींत शत्रूला जेरीस आणणें हें तर आमचें ब्रीद आहे! रजपुताचा बच्चा आणि शिवाजीचा व संभाजीचा वंशज शत्रूला पाठ दाखवून समरांगणांतून कधीहि पलायन करणार नाही ! तो शत्रूशी सामना देण्यासाठी एकदा उभा राहिला, म्हणजे माघार ही कशी त्याला ठाऊकच नाही ! प्रतिपक्षी लाथा देऊं लागला, तर हा वीराचा बच्चा त्याला म्हणणार, " काय, लाथा देतोस ? देच तर मग ! आणि आता आपण पाहूंच या की तूं हटतोस की मी हटतों ! तूं जशा जशा लाथा देशील तसा तसा मी जास्त वाकत गेलों, तर मग पुढे तूं काय करणार ! " अशी जेथे टिकाव धरून लढाई दिली पाहिजे, आणि कोणीं एक लाथ मारली तर " ही मीं निर्भयपणाने तुझ्याकडे आपली पाठ केली आहे ! दे तुला किती लाथा द्यावयाच्या असतील त्या ! " असें जेथे न डगमगतां म्हटलें पाहिजे, आणि तूं लाथा मारल्यास तर मी जास्तच मिंधा होऊन तुझी नोकरी करीन असें म्हणून प्रतिपक्ष्याला जेथे चकविलें पाहिजे, तेथे एक लाथ लागली किंवा न लागली, तोंच एखाद्या पोरीप्रमाणे मुळूमुळू रडत आपल्या आईकडे पळून जाणारा जो ध्रुव, त्यांचीं व्याख्यानें रचून त्यांनी आपलीं पुराणें विटाळलीं जावीं, हा खरोखर आपल्या भारतवर्षाच्या—निदान आपल्या शूर महाराष्ट्राच्या—धैर्यावर मोठा काळिमा आहे !

अरे भेकड ध्रुवा ! सुरुचीसारखी एक कोमल स्त्री ती काय ! त्या बिचारीचे ते चरणपंकज किती तरी मृदुल असतील ! त्या अत्यंत लुसलुशीत अशा एका पदपद्माचा तुला कोठे स्पर्श झाला न झाला, तों तूं इतका गडबडून गेलास ! अरे वेड्या, आम्हां या धैर्यसागरांकडे बघ ! अरे भित्र्या, आम्हां या धैर्याच्या केवळ मेरुपर्वताकडे पहा ! आमच्या पाठी तूं पाहशील तर तूं आश्चर्याने अगदी थक्कच होऊन जाशील ! आज आमच्यामध्ये जे मोठमोठे शूर योद्धे म्हणून तुला दिसत आहेत, त्यांच्या पाठीवरील कपडे काढून आणि त्यांच्या पाठी उघड्या करून तूं जर पाहशील, तर त्या सर्व पाठी सुंदर अशा अर्धवर्तुळाकृति पदलांच्छनांनी सुशोभित झालेल्या अशा तुला आढळून येतील ! हल्लीच्या सर्कसमधील एखाद्या रिंगमास्तराच्या छातीवर त्याने मिळविलेल्या अनेक सुवर्णपदकांचे हार जसे लटकत असतात, त्याप्रमाणे आमच्या पाठी या लत्ताप्रहारांच्या अर्धवर्तुळाकृति लोहपदकांच्या

हारांनी आणि माळांनी अगदी गजबजून गेलेल्या आहेत ! तो बिचारा एखाद्या कूपमंडूकाप्रमाणे क्षीरसागरांत एकीकडे जाऊन आपल्या घमेंडींत निजणारा विष्णु ! त्याला बिचाऱ्याला भृगूकडून कोठे एक लाथ मिळाली, तर त्या एका लाथेचें वत्सलांच्छन बनवून घेऊन तो त्याबद्दल किती तरी फुशारक्या मारीत बसलेला आहे ! पण या एका पिसाने मोर होणाऱ्या थोतांडखोर लोकांनी खऱ्या गुणिजनांचें चीज नाहीसें करून टाकलें आहे ! पण त्या एक लाथ खाऊन फुशारकी मारणाऱ्या विष्णूला म्हणावें, तूं त्या एका वत्सलांच्छनाचा कसला डौल मारतोस ? येथे आमच्या पाठीवर तुझ्या-पेक्षा जास्त लालभडक रंगाचीं अशीं हजारों लत्ताप्रहारांचीं लांच्छनें रुळत पडलेलीं आहेत ! हे ध्रुवा, हे विष्णो, ही लत्ताप्रहार सहन करण्याची अजब किमया तुमच्या त्या इतिहासपूर्वकालीन युगामध्ये कोणाला माहीतच नव्हती ! पण तें शास्त्र अलीकडच्या काळांत आणि विशेषतः ह्या १९२६ सालांत फारच प्रगतीला जाऊन पोहोंचलेलें आहे. जो लाथा मारील त्याच्यापासून पळून जावयाचें, ही जी पूर्वीची स्वराज्याच्या लढाईत चुकीची कल्पना होती, ती हल्ली आम्हीं पार बदलून टाकली आहे ! आणि कोणी जसजशा जास्त लाथा मारील, तसतशी त्यांची जास्त नोकरी करून त्याला खूष करीत करीत जेरीस आणावयाचें हें अमोघ शस्त्र आम्हीं शोधून काढलें आहे. ध्रुवा, तुझ्या सावत्र आईने तुला लाथ मारली, तेव्हा तिच्या पायांत बूट असतील असें मानणें त्या वेळच्या अडाणी स्त्रियांच्या रीतीप्रमाणे शक्य दिसत नाही ! पण हल्लीच्या आमच्या लाथा बघ. त्या नुसत्या पायांच्या लाथा नाहीत ! त्या बुटांच्या लाथा आहेत ! आणि तूं बारकाईने पाहिलेंस, तर त्या नालबंद बुटाच्या लाथा आहेत हेंहि तुझ्या दृष्टोत्पत्तीस येईल ! असें असूनहि, आणि अशा बुटांच्या असंख्य लाथा खाल्लेल्या असूनहि जर आम्ही फिरून नोकऱ्या करण्याची पवित्र इच्छा धारण करितों, तर हे ध्रुवा, तुला एका लाथेनेच इतकी उपरति उत्पन्न झाली, हें थोतांड तूं कोठून काढलेंस ? आमच्या पाठी जरी आतापर्यंतच्या लत्ताप्रहारांनी सोलून निघालेल्या आहेत, तरी रिस्पॉन्सिव्हिस्ट पक्षाचा कविकुलगुरु जो कालिदास त्याने " पादार्पणानुग्रहपूतपृष्ठं । अवेहि मां किंकरम् " या आपल्या सुंदर श्लोकामध्ये जें रिस्पॉन्सिव्ह को–ऑपरे-

शानचें सुंदर सूत्र ग्रथित केलें आहे, त्याप्रमाणे 'पादार्पणानुग्रहपूतपृष्ठ' असे शोभिवंत 'किंकर' होण्याची अद्यापि आमची महत्वाकांक्षा वाढत असतांना आणि आमच्याप्रमाणे बाकीच्या लोकांच्याहि पाठी 'पादार्पणानुग्रहपूत' व्हाव्या, अशी केवळ लोककल्याणासाठी आणि स्वराज्यप्राप्तीसाठी आम्ही खटपट चालविली असतां, तूं एका लाथेने अढळपद मिळविलेंस, अशा-सारख्या या कपोलकल्पित गोष्टी आमच्या वाटेमध्ये मोठें विघ्न उत्पन्न करतात असें तुला वाटत नाही काय? एका लाथेनेच तुझ्या गोष्टींतल्या-प्रमाणे स्वराज्याचें अढळपद प्राप्त होणें शक्य असतें, तर आम्ही आजपर्यंत इतक्या लाथा खाल्ल्या की, प्रत्येक लाथेला एकेक स्वराज्य या हिशोबाने आम्हांला आतापर्यंत किती तरी स्वराज्यें मिळावयाला पाहिजे होतीं! पण तशी ती स्वराज्यप्राप्ति तर लांबच राहिली, पण आमच्यामध्ये उलट जो लाथा मारील त्याची नोकरी करण्याचीच इच्छा दुणावत आहे. यावरून लाथा खाणें आणि गुलामगिरीची चटक लागणें त्यांच्यामध्येच कांही तरी कार्यकारणभावसंबंध असला पाहिजे, हें उघड होत आहे. तेव्हा अशी खरी वस्तुस्थिति असतांना ध्रुवाच्या आईने त्याला एक लाथ मारल्याबरोबर त्याला त्वेष येऊन त्याने अढळपद मिळवून घेतलें; असली ही कोणी तरी इतिहासान-भिज्ञ आणि तर्कशास्त्रानध्ययनी अशा अडाणी मनुष्याने निसर्गाच्या निय-माच्या विरुद्ध रचलेली ही ध्रुवाची गोष्ट निःसंदेहपणे अशक्य आणि अतएव असत्य असली पाहिजे!

याशिवाय आणखीहि एका कारणासाठी ही ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे. कारच हें की, आकाशामध्ये सप्तऋषींच्यासारखे मोठमोठे ऋषी-देखील दररोज एकसारखे फिरत असतांना आणि आपल्या जागा बदलीत असतांना त्यांच्या मध्यभागीं ध्रुवाचा तारा हा नेहमी स्थिर असतो, हा चमत्कार सगळ्यांना माहीत आहे. तेव्हा या सगळ्या ऋषींमध्ये हाच एकटा अढळ कसा, अशी कोणाला शंका येऊन त्याने या अढळपणाच्या इमारती-करितां तिच्याखाली कृत्तिका, मृग वगैरे नक्षत्रांच्या गोष्टीप्रमाणे या कल्पित गोष्टीचा पाया रचला असला पाहिजे; आणि ध्रुवाच्या आईने त्याला लाथ मारल्यामुळे त्याला राग येऊन त्याने हें अढळपद मिळवून घेतलें, अशी ही ह्या खोट्या गोष्टीची पुस्ती कोणा तरी गांवढळ कारागिराने या ध्रुवाच्या

ताऱ्याच्या अढळपणाच्या पाठीमागे चिकटून दिली असली पाहिजे. परंतु अढळपणा हा कांही सद्‌गुण नव्हे. आणि यदाकदाचित् तो सद्‌गुण असला तर तो कोणाचा सद्‌गुण आहे? तर 'Consistency is the virtue of an ass' या एका इंग्रजी वेदवाक्यामध्ये सांगितल्याप्रमाणे अढळपणा हा गाढवाचा सद्‌गुण आहे! तेव्हा त्याच्याकरिता हें इतकें ध्रुवाख्यान रचून त्या गाढवाच्या गुणाची एवढी प्रतिष्ठा गात बसणें हें अगदी अस्थानीं आहे. गाढवाने पाहिजे तर अढळ राहावें! पण त्याच्याशिवाय या जगांत दुसरें कोण अढळ आहे? ज्या पृथ्वीवर आपण राहतों ती खुद्द पृथ्वीहि दररोज किती तरी झपाट्याने फिरत आणि बदलत आहे. वारा हा जर अढळ राहावयाचें मनांत आणील तर जगाचें कसें होईल? तेव्हा चंचलपणाचीच जगाला जास्त जरुरी आहे हें उघड आहे. नदीचा प्रवाह, वेश्येचें पातिव्रत्य, लबाड मनुष्याचा शब्द, हे सगळे चंचलच नाहीत काय? सारांश, चंचलपणामध्येच इतके फायदे असतांना असल्या ध्रुवासारख्या काल्पनिक गोष्टींनी अढळपणाचें स्तोम माजविणें हें केव्हाहि श्रेयस्कर नाही. तेव्हा या अढळपणाच्या वेडगळ सद्‌गुणाच्या प्ररोचनासाठी म्हणूनच केवळ रचलेली ही ध्रुवाची गोष्ट ढळढळीत खोटी असली पाहिजे, हें उघड रीतीने सिद्ध होतें. शिवाय ती गोष्ट रचण्यामध्ये ध्रुवाला एका लाथेने इतका राग आला, हें जें एक प्रमेय स्वहेतुसिद्ध्यर्थ अंगीकृत करण्यांत आलेलें आहे तेंहि अगदी असंभवनीय असल्यामुळे ही ध्रुवाची गोष्ट येथून तेथून बनावट असली पाहिजे, हें सिद्ध होतें.

अशा प्रकारच्या विचारसरणीने पूर्वी सांगितलेल्या पुराणवस्तुसंशोधकांच्या एका असोसिएशनने ध्रुवाच्या गोष्टीबद्दल आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. त्यांतील फक्त कांही कांही मुख्य मुद्दे येथे नमूद करण्यांत आलेले आहेत.

---

# भासाची भवितव्यता ! : : १

अलीकडे भासकवीसंबंधाने जी कांहीं थोडीशी माहिती उपलब्ध झालेली आहे, तिच्यावरून सर्वांना हें कळलेंच आहे की, भास हा एक चांगल्यापैकी कवि होता, त्याने पुष्कळ नाटकें लिहिलीं होतीं, आणि तीं बहुतेक लुप्तप्राय झालेलीं आहेत. तीं कोणत्या कारणाने लुप्त झालीं हें निश्चयात्मक सांगतां येण्याला हल्ली तरी निदान कांहीं साधन नाहीं.

**" भासनाटकचक्रेऽपि छेकैः क्षिप्ते परीक्षितुम् ।**
**स्वप्नवासवदत्ताया दाहकोऽभून्न पावकः ॥**

या श्लोकावरून त्याचीं नाटकें जाळलीं गेलीं असावींत असा पुष्कळ लोकांचा तर्क आहे. हा तर्क खरा असेल तर ती किती खेदाची व दुःखाची गोष्ट आहे ! दुसऱ्याहि कांहीं कारणांनी कदाचित् त्याच्या काव्याचा नाश झाला असेल; नाहीं असें म्हणवत नाहीं. किंवा त्याची वेळ आणि आतांची वेळ यांच्यामध्ये जें दीर्घकालीन महदंतर आहे त्यामुळेहि कदाचित् त्याची कविता उपलब्ध होणें अशक्य झालें असेल. परंतु ही कल्पना फारशी सयुक्तिक दिसत नाहीं. कारण भासाचीं नाटकें आता जशीं दुर्मिळ आहेत तशींच तीं हजार-पांचशें वर्षांच्यापूर्वीहि दुर्मिळच असलीं पाहिजेत. कारण, त्या वेळच्या लेखकांपैकीहि फारशा लोकांना भासाच्या कवितेची प्रत्यक्ष माहिती होती असें दिसत नाहीं. यावरून त्याचीं नाटकें बहुधा जाळलींच गेलीं असावींत हें अनुमान जास्त प्रामाण्यास्पद दिसतें. आणि तें खरें असेल तर ही किती शोचनीय गोष्ट आहे ! अलीकडे दोन तीन वर्षांत भासाचीं कांहीं थोडींशीं नाटकें सापडलीं आहेत ही गोष्ट अलाहिदा आहे. पण या दोन तीन वर्षांच्या पूर्वींची भासाच्या नाटकांची अज्ञेयत्वाची अवस्था लक्षांत घेतली असतां, आणि इतक्या चांगल्या कवीचें एकहि नाटक उपलब्ध नसणें ही कल्पना मनामध्ये आली असतां, कोणाहि सहृदय मनुष्याच्या हृदयाची कशी विदीर्ण अवस्था होत असली पाहिजे याची कोणालाहि कल्पना आल्यावांचून राहणार नाहीं.

हे हतभाग्य भासा ! तूं असें काय पातक केलें असावेंस की ज्यासाठी तुझ्या इतक्या अनेक नाटकांपैकी कांहीहि अवशिष्ट राहूं नये ! तुझीं नाटकें कोणीं जाळलीं ? सुंदर काव्यें हे जाळण्याचे पदार्थ आहेत काय ? ज्यांनी तीं तुझीं नाटकें जाळलीं त्यांना परमेश्वराने फक्त विचारशून्य हातच दिले होते काय ? आणि विचारशाली अंतःकरणें त्यांच्या वांट्याला परमेश्वराच्या एवढ्या विस्तीर्ण, उदार आणि समविभागी सृष्टीमध्ये मुळीच आलीं नव्हतीं काय ? तुझीं काव्यें जाळणारे ते लोक काळेगोरे कसले होते तें तरी तूं पाहिलें होतेंस काय ? ते राक्षसासारखे दिसत होते काय ? रामायणकालीं राक्षस होते असें म्हणतात ! पण ते बहुतेक रामाने मारून टाकले होते असेंहि म्हणतात ! त्या रामाच्या तावडींतून चुकून राहिलेले कांही राक्षस तुझ्याहि वेळी बहुधा जिवंत असले पाहिजेत. एरव्ही मनुष्यांच्या हातून असलें अमानुष कृत्य कसें होईल ? पण ज्या राक्षसांनी तुझीं काव्यें भस्मसात् केलीं त्यांचें तूं काय केलें होतेंस ? सापालासुद्धा धक्का लागल्याशिवाय तो दंश करीत नाही; तेव्हा खात्रीने तूं त्याचा कांही तरी अपराध केला असला पाहिजेस. राक्षस माणसें खातात, अगर मोठे क्रूर असतात, असलें कांही वर्णन तूं कोठल्या नाटकांत केलें होतेंस काय ?—निदान 'सीतेला रावणाने चोरून नेली,' याचा तरी उल्लेख तुझ्या कोठल्या तरी रामायणविषयक नाटकांतून आलेला असला पाहिजे. एरव्ही त्यांच्या हातून असा अन्याय कसा घडेल ? किंवा पिशुताशनांना पैशुन्य दाखविण्याला कारणच पाहिजे हा तरी सामान्य मनुष्यांचा भाबडा नियम त्यांच्या ठिकाणीं जरूर लागत असेल असें कशावरून ? अथवा असो. आजच्या कृत्यांचें कारण जेथे आज सापडत नाही, तेथे इतक्या जुन्या दुष्ट कृत्यांचेंहि कारण कोणाच्या कल्पनेला सापडणार आहे ? तेव्हा हजार गोष्टींतली एक गोष्ट खरी की, कोणत्याहि कारणामुळे का होईनां, पण तुझीं काव्यें कोणीं तरी जाळलीं खास !

भासा ! ही गोष्ट झाली–तुझीं नाटकें जाळलीं–तेव्हा तूं जिवंत होतास ! तुझ्या डोळ्यांदेखत ही गोष्ट झाली असेल तर ती पाहून तुझ्या मनाला काय वाटलें असेल ! तुझीं पुस्तकें होरपळलेलीं पाहत असतांना तुझें अंतःकरण होरपळून गेलें असेल ! तुझ्या पुस्तकांतून अग्नीच्या ज्वाला निघत असतांना तुझ्या हृदयांतूनहि तितक्याच लाल क्रोधाच्या ज्वाळा निघत

असतील ! तुझ्या जळणाऱ्या ग्रंथांतील आणि डोळ्यांतील ठिणग्या एकदमच बाहेर पडल्या असतील. भासा, कांही वेळाने तुझ्या पुस्तकांची आग विझली असेल, पण तुझ्या मनाची आग कधी तरी विझली असेल काय रे ? बहुधा ते बाहेरचे अंगार धुमसण्याचें थांबल्यानंतरहि अनेक वर्षेंपर्यंत तुझ्या अंतर्यामांतील क्रोधांगार तसेच धुमसत राहिले असतील ! तुझीं नाटकें जळलेलीं पाहून तूं रडला असशील, ओरडला असशील, हळहळला असशील, तळमळला असशील ! त्या आगीच्या उष्णतेने तुझे हातपाय गार पडले असतील ! आणि त्या नाटकांची प्रसवित्री ती तुझी जीभ दुःखातिरेकाने वाकडी पडल्यानंतर कंठाच्या अग्रभागीं असलेले तुझे पंचप्राण त्यां पेटलेल्या अर्चीवर आरूढ होऊन त्या सुप्रसिद्ध अर्चिरादि मार्गाने ब्रह्मलोकाला जाण्याला खरोखर उत्कंठित झाले असतील !

अशा स्थितींत, भासा, कोणाला तुझी दया आली नाही ? आणि कोणी तुझें सान्त्वन करण्याला उद्युक्त झालें नाही ? या उत्कृष्ट कवीचे उत्कृष्ट ग्रंथ जाळूं नका हो नका, असें कोणीं म्हटलें नाही ? सगळेच लोक दुर्बळ होऊन बसले होते ? पण माणसें कांही कारणाने दुर्बळ झालीं असलीं तरी त्या वेळीं अलीकडच्याप्रमाणे भरतभूमीचें पाणी ज्यांच्यांत खेळत आहे, अशा मेघांची आकाशामध्ये संचारण्याची चाल होती ना ? त्या आर्द्र अंतःकरणांच्या मेघांच्या अंगांत इतकें पाणी असतांना ते या अन्यायाच्या अग्निप्रलयाकडे अगदी उदासीनपणानेच पाहत होते ? त्यांचीं अंतःकरणें फाटलीं कशीं नाहीत ? आणि त्यांनी निदान आपल्या अश्रुधारांनी तरी ती आग विझवली कशी नाही ?—अथवा, भासा, तुझें अनुकरण करणाऱ्या कालिदासाने म्हटल्याप्रमाणे '**धूमज्योतिः सलिलमरुतां संनिपातः**' अशा जड स्वरूपाचा जो मेघ, त्याच्यामध्ये इतकी तेजस्विता कोठून असणार ? कारण, त्याची सगळी तेजस्विता विजेपासून उसनी आणलेली !

पण त्याला ही गोष्ट कदाचित् समजली नाही, तरी त्या वेळी आकाशामध्ये संचार करणारे यक्ष, गंधर्व, किन्नर, सिद्ध, विद्याधर हे कोणी नव्हतेच काय ? सिद्ध, विद्याधर इत्यादिकांचीं चरित्रें, हे भासा, तूं वर्णन केलेलीं नाहीस काय ? आणि ह्या वर्णनांच्या माधुर्याने मोहित झालेले यक्ष-गंधर्व अमृतपान थांबवूनहि तुझ्या मधुरतर कविता सुस्वर आवाजावर गात असतांना

हा मंजुळ आवाज कोठून येत आहे हें पाहण्याकरितां चकित झालेल्या मनुष्यांनी पृथ्वीतलावरून आकाशाकडे नेत्र थोडे वेळा लाविले आहेत काय? असें असतांना त्यांनी तुझ्या काव्याचें संरक्षण करण्याकरितां कांहीदेखील प्रयत्न कसे केले नाहीत? शकुंतलेला ज्याप्रमाणे मेनकेने एकदम उचलून आकाशांत नेलें, त्याप्रमाणे त्यांनी आपलीं विमानें खाली उतरवून त्यांत तुझी कविता बसवून स्वर्गलोकांत नेऊन ठेवली असती तर पुण्यवान सहृदयांना तेथे तरी तिचा आस्वाद घ्यावयास सापडला असता! पण तसें कोणींच कांही केलें नाही!

पण कदाचित् आकाशांतील त्या इंद्राच्या कचेरींतील स्तुतिपाठकांना पृथ्वीतलावरील माधुर्याचें महत्त्व वाटलें नसेल. परंतु हे वनदेवतांनो आणि जलदेवतांनो! तुम्ही पृथ्वीवरील देवता ना? तुम्हाला पृथ्वीवरील आनंदाचा अभिमान वाटायला नको काय? मग तुम्ही त्या वेळीं कशी उपेक्षा केली? तुम्ही कशा स्वस्थ बसलां? शिवाय भासाच्या कवितेमध्ये जें सौंदर्य होतें तें कोणाचें होतें? तें तुमचेंच होतें! त्याने आपल्या काव्यांतील मधुरता कोठून आणिली होती? त्याने ती तुमच्यापासूनच घेतलेली होती! त्याच्या काव्यांचा नाश हा तुमचाच नाश होय, हें तुम्हा मूढांच्या कसें लक्षांत आलें नाही? भासाच्या काव्यांतील सौंदर्याच्या संरक्षणाकरिता नव्हे, तर तुमच्या स्वतःमधील सौंदर्याच्या वर्णनाच्या संरक्षणाकरिता तरी तुम्ही कांही करावयाला पाहिजे होतें!—तुमचें महत्त्व कोण वाढवितो? चांगला कवि हा तुमच्या कीर्तीला कारणीभूत होतो. तुमची सर्व सृष्टि ही बोलूनचालून अचेतन! तिच्यामध्ये सरसतेचें चैतन्य कोण उत्पन्न करितो? कवि! आणि त्याच्यावर त्याचीं काव्यें जाळण्याचा प्रसंग आला असतां तुम्ही तटस्थ! असें होऊं लागलें तर नवीन कवि होण्याची इच्छा धारण करण्याला कोण तयार होईल? हे कृतघ्न वनदेवतांनो आणि जलदेवतांनो! तुमच्या अंगामध्ये परमेश्वराने आम्हां मनुष्यापेक्षा देवतारूपाने जी जास्त शक्ति ठेविली आहे ती कशासाठी? योग्य प्रसंगींहि अशी उपेक्षा करण्यासाठी आणि उदासीनपणा दाखविण्यासाठी होय? दुष्ट हात जेव्हा भासाचीं काव्यें जाळूं लागले असतील तेव्हा तुम्ही सृष्टीमध्ये भयंकर उत्पात कां उत्पन्न केले नाहीत? तुम्ही अंतरिक्षांत वादळें आणि जमिनीवर धरणीकंप ह्यांचा कहर

कां करून सोडला नाही ? भासाने तुमच्यांतील सृष्टिसौंदर्याचीं जीं इतकीं हृदयंगम वर्णनें केलीं, त्याबद्दल त्याला किती श्रम पडले असतील याची तुम्हाला कल्पना तरी आहे काय ? बिचारा तुंग पर्वताच्या शिखरावर चढला असेल, आणि तेथे एखाद्या नवशाद्वल भूमिकेवर अथवा पर्जन्यधूत शिलातलावर बसून त्या पर्वताचे सुळके गगनोदराला कसे टोचीत आहेत, कडे कसे तुटलेले आहेत, खोल दऱ्या कशा लांबवर पसरल्या आहेत, त्यांतून अरण्यें कशीं वाढलीं आहेत, पाण्याचे धबधबे कसे पडत आहेत, नद्यांचे उगम कसे होत आहेत, नवीन मेघांची रचना कशी बनत आहे, इत्यादि सृष्टिसौंदर्याचे अत्यद्भुत देखावे तल्लीन मनाने पाहत असतां तदाकार वृत्ति होऊन बाहेरचें कांही दिसेनासें होऊन, आणि बाहेरच्या सर्व देखाव्यांचें चित्र अंतर्यामामध्ये प्रतिबिंबित होऊन, त्यापासून उत्पन्न होणाऱ्या अद्वितीय आनंदाचा आस्वाद घेत देहभान विसरून बिचारा दिवसच्या दिवस ध्यानस्थ राहिला असेल ! एखादें फूल पाहिलें म्हणजे त्याचें कौतुक करीत तो तेथेच बसला असेल ! हिरवीगार वनश्री पाहून त्याच्या प्रकृतींतील सत्त्व, रज, आणि तम यांचे रंगहि हरितवर्ण झाले असतील ! कोकिळेचा आवाज ऐकून ती कोकिळा कोणत्या झाडाच्या माडीवर बसून हें मधुर गायन करीत आहे, हें पाहण्यासाठी तो वेड्यासारखा किती तरी ठिकाणीं फिरला असेल ! मेघ, विजा, पाऊस यांचीं वर्णनें हुबेहुब करतां यावीं, म्हणून पावसांतून किती तरी वेळां तो भिजला असेल ! चकोर चंद्रकिरण कसे प्राशन करीत आहेत, आणि मेघोदकांनी चातकांची तृषा कशी शान्त होत आहे, हें आकाशाकडे टक लावून पाहत असतांना त्याची मान किती वेळां खुडी झाली असेल ! तो रात्रीच्या अंधकारातून मुद्दाम एकटाच फिरला असेल ! मित्रांची संगति कितीहि सुखकर असली, तरीसुद्धा एकान्ताशिवाय सृष्टिसौंदर्याशी आपली एकतानता बरोबर होणें शक्य नाही, हें लक्षांत आणून त्या मित्रांना चुकवून तो एकटाच किती तरी वेळां अरण्यांतील डोंगरांपाशीं आणि वृक्षांपाशीं कवींच्या रसात्मक भाषेंत बोलत उभा राहिला असेल ! तो जलाशयाच्या काठीं बसला असेल, आणि त्यांत प्रतिबिंबित झालेलीं सभोंवतालच्या वनश्रीचीं चित्रें पाहण्यांत त्याने प्रहरच्या प्रहर घालविले असतील !

परंतु इतकीं संकटें सोसून अखेरीस सगळें व्यर्थ झालें! भासा, तूं कवि होऊन ह्या अचेतन आणि अकृतज्ञ अशा सृष्टिसौंदर्याचें वर्णन करीत बसलास, त्यापेक्षा एखादा भगवद्भक्त होऊन त्या करुणाघन प्रभूचें कीर्तन करीत बसला असतास, किंवा एखादा योगमुक्त वेदान्ती होऊन त्या चैतन्यघन परमात्म्याचा अपरोक्ष अनुभव घेत बसला असतास, तर त्याने तुला अशा संकटकाली खात्रीने दगा दिला नसता! पण तूं तरी काय करणार? पूर्वजन्मींचे संस्कार मनुष्याला त्या त्या विषयाकडे ओढून नेत असतात. तुझ्या पूर्वकर्मानुसार तुला बुद्धि झाली. तुझ्या पूर्वजन्मीं तूं आपल्या पूर्वीच्या कवींचीं काव्यें वाचलीं असशील, आणि सृष्टिसौंदर्य अवलोकन करीत बसला असशील, त्याचा हा परिणाम असला पाहिजे! त्याच्याबद्दल आता तुला पश्चात्ताप वाटत असेल! पण तो आता फार उशिरा होय!

भासा, तुझ्यावरील संकटांबद्दल तूं अजूनसुद्धा शोक करीत असशील! अजूनसुद्धा तुझ्या डोळ्यांतील अश्रु वाळले नसतील! भासा, तुला हें जग सोडून गेल्याला किती वर्षें लोटलीं हें ठरविण्याचा पुष्कळ लोक प्रयत्न करीत आहेत, परंतु अद्यापि निश्चित असें कोणालाच कांही सांगतां येत नाहीं. कोणी तुला खिस्ती शकाच्या मागे ढकलीत आहेत, तर कोणी तुला खिस्ती शकाच्या पुढे ओढीत आहेत! अशी तुझ्यासारख्या चांगल्या कवीची ओढाताण होत असलेली पाहून कोणा सहृदय मनुष्याचें हृदय फाटणार नाही! तुझीं नाटकें उपलब्ध असतीं तर असा प्रसंग कां आला असता? पण सामान्यतः बोलावयाचें असेल तर तुला आज सुमारें दोन हजार वर्षें झालीं असलीं पाहिजेत असें म्हणावयास हरकत नाही. इतकीं दोन हजार वर्षेंपर्यंत तुझा आत्मा तळतळत राहिला असेल! इतक्या दीर्घ दुःखाची कल्पनादेखील करवत नाही. भासा, तुझीं काव्यें जाळल्यानंतर तुला दुसरा तिसरा कांहीसुद्धा रोग झाला नसेल! केवळ त्या दुःखाच्या असह्य वेदनांनीच तुझा प्राणान्त झाला असला पाहिजे! आणि अवशिष्ट आयुष्याच्या जिवंतपणीं जसा तुझा देह झुरत असेल तसाच मरणोत्तरकालीं तुझा आत्मा झुरणीस लागला असेल! तुझ्यासारखा धर्मशील आणि पुण्यवान् कवि मेल्याबरोबरच मोक्षाला जावयाचा; परंतु तें भाग्य तुला अजूनहि लाभलें नसेल. तुझा हेतु खात्रीने गुंतून राहिलेला असेल. जिवंतपणीं "माझीं

नाटकें! माझीं नाटकें!" म्हणून ज्याप्रमाणे तूं धाय मोकलीत असशील, त्याचप्रमाणे त्या तुझ्या जड देहाच्या कोशांतून मुक्त झाल्याबरोबर तुझ्या लिंगदेहांतील तो तुझा आत्मा आपल्या अश्रवणीय वाणीने "माझीं नाटकें! माझीं नाटकें!" असे तेच शब्द फिरून उच्चारूं लागला असेल! आणि सूक्ष्मदेह ज्या लोकामध्ये राहतात, त्या लोकामध्ये प्रथमच नवीन राहण्या· करिता गेलेल्या तुझ्या लिंगदेहांतील आत्म्याने आपल्या काव्यासंबंधींच्या करुण विलापांनी तेथील अपरिचित अशा रहिवाश्यांनादेखील रडविलें असेल! आणि पुढे तेथे राहूं लागल्यानंतर तुझ्या आत्म्याचा परिचय झाला असला तरी तो कोणाशीं झाला असेल? त्याचे तेथील प्रथम परि-चयाचे स्नेही कोण बनणार? ज्यांनी 'पुत्र! पुत्र!' करीत इहलोकीं प्राण सोडले असतील, आणि जे तिलांजलींतील जलकणांसाठी परलोकीं तृषाक्रान्त झालेले असतील, अशा समानदुःखी आत्म्यांशींच तुझ्या आत्म्याची पहिली ओळखदेख जमली असेल! कृष्ण आणि द्वैपायन यांच्या कृपेने धृतराष्ट्र आणि गांधारी हीं उद्धरून गेलीं नसती, तर पुत्रशत-नाशाच्या दुःखाने तळमळणाऱ्या त्यांच्या आत्म्यांशीं तुझ्या आत्म्याचें चांगलेंच सख्य जुळलें असतें! तुझ्या और्ध्वदेहिक क्रियेमध्ये तुला ज्या वेळीं पिंड देण्यांत आला असेल त्या वेळीं तुझा वासनामय देह त्या पिंडाच्या सभोवतीं इतक्या भयानक रीतीने एकसारख्या घिरट्या घालीत असेल की, क्षुधा अत्यंत प्रदीप्त झालेली असतांनाहि कोणीदेखील कावळे त्या पिंडाला स्पर्श करण्याला धजले नसतील! आणि ही गोष्ट तुझे ग्रंथ जाळणाऱ्या तुझ्या वैऱ्यांना समजल्यावर ते तर तुझ्या भुताच्या भीतीने अगदी गर्भगळितच होऊन गेले असतील. भीतीनें त्यांची काय काय त्रेधा उडाली असेल! काळोखांत तूं कदाचित् कोठे उभा असशील की काय, अशा भीतीने त्यांनी रात्रीं कोठेहि बाहेर पाऊल टाकलें नसेल, आणि झोंपेंत आपल्या छातीवर आणि मानेवर कोणी तरी बसलें आहे, आणि आपण ज्या हातांनी एका उत्कृष्ट कवीचे ग्रंथ जाळले ते आपले हात अग्नीच्या ज्वाळांनी व्यापले जात आहेत, असा भास होऊने, भासा, ते किती तरी वेळां झोंपेंतून दचकून आणि घाबरून ओरडत उठले असतील! तेव्हापासून तुझा आत्मा अन्तरिक्षामध्ये वायूसारखा सैरावैरा फिरत असेल,

ाणि माझीं जाळलेलीं काव्यें फिरून मला कोठें सापडतील काय, अशा ाशेने प्रत्येक कोनाकोपरा शोधीत असेल ! कोठें पृथ्वीतलावर श्लोकांचा ावाज ऐकूं आला तर, भासा, तुझा आत्मा तेथे जात असेल, आणि हे ाझ्याच नाटकातले श्लोक कोणी म्हणत असतील काय, अशा आशेने तूं ळूच कानोसा घेत असशील ! प्रेक्षागृहांतून रंगभूमीवर कोठें नाटकांचे योग सुरू व्हावयाचे असतांना 'हा माझ्या नाटकाचा प्रयोग असेल काय !' ाशा लालसेने एखाद्या रिकाम्या जागीं अदृश्य रूपाने तुझा आत्मा जाऊन सत असेल, आणि सूत्रधाराने निराळ्याच एखाद्या नाटकाचा प्रस्ताव ेलेला पाहून हिरमुसलेला होऊन श्वास टाकीत टाकीत तो कोठे तरी एखाद्या नर्मानुष अशा शून्य अंधकारामध्ये जाऊन रडत बसत असेल ! आणि जेथे थे विद्वज्जनसमूह जमत असेल तेथे तेथे माझ्या काव्याबद्दल कोणी उल्लेख रीत आहे काय, म्हणून मोठ्या आशेने जाऊन तितक्याच निराशेने तो कती तरी वेळां माघारा फिरला असेल ! नाही ! भासा, तुझें नांव कोठेंहि कूं येत नाही ! तूं कोणालाहि माहीत नाहीसा झाला आहेस ! तूं शशशृंग ाला आहेस ! शुक्तीवरील रजताप्रमाणे तूं आभासमात्र झाला आहेस ! ला कोणी ओळखीत नाही ! तूं एक चांगला कवि होतास, किंवा इतर ांही होतास, हेंसुद्धा कोणाला माहीत नाही ! एखाद्या बिनवारशी ओसाड ाजवाड्याचें सामान कोणी तरी घेऊन जावें, त्याप्रमाणे तुझ्या नाटकांतील ांगले चांगले श्लोक इतर कवींनी केव्हाच उचलून नेलेले आहेत. कोणी र तुझीं सबंध नाटकेंच्या नाटकेंच उपटलीं आहेत, आणि तुझ्या नांवाच्या ठकाणीं त्यांनी आपलीं नांवें दाखल करून तुझीं नाटकें त्यांनी आपल्या ांवांवर राजरोसपणे चढवून घेतलेलीं आहेत. ह्या नांवमोबदल्याला, भासा, कधी संमति दिली होतीस ? साहित्यग्रंथांतूनसुद्धा तुझें नांव अलंकार- ास्त्रवेत्ते क्वचितच घेतात. परागंदा झालेल्या माणसांच्या घरांतून ज्याप्रमाणे सऱ्यांचीं कुटुंबें नांदत असतात, त्याप्रमाणे तुझ्या काव्यकीर्तीच्या मंदिरा- ध्ये आज दुसरेच लोक नांदत आहेत, व तेच त्याचा उपभोग घेत ाहेत !—आणि एरवीं तरी, भासा, तुझी हल्ली कोण पर्वा करणार आहे ? ज्या भाषेंत आपलीं काव्यें लिहिलींस, ती तुझी गीर्वाण मातृभाषा आज कती जणांना समजत आहे ? आणि यदाकदाचित् समजत असली तरी

त्यांतील सौंदर्य आणि सरसता समजून घेण्याइतकी कळकळ आणि फुरसत तरी आज कोणाला आहे ? भासा, तुझी ती कर्णरसायन आणि हृदयंगम अशी संस्कृत वाणी आज कोणी बोलत नाहीत किंवा समजत नाहीत ! तुझी ती साध्वी संस्कृत भाषासुंदरी आज कोठे आहे ? तिची दुबळी प्रजा आहे ! पण ती तरी आज शुद्ध स्थितीमध्ये कोठे आहे ? ती हल्ली अत्यंत अपभ्रष्ट झालेली आहे ! आणि तुझ्या त्या राजसिंहाच्या मागून आलेल्या कित्येक शकबर्बरादिकांच्या अनेक अपशब्दांनी ती अत्यंत विद्धगात्र झालेली आहे. अशा काळामध्ये आणि अशा लोकांमध्ये तुझें महत्त्व कोणाला, काय वाटणार आहे !

ही तुझ्याबद्दलची स्थिति पाहून अशा लोकांना वाईट वाटलें नाही, तरी हे भासा, तुला याच्याबद्दल किती वाईट वाटत असेल ? आपलें नांव मागे कांही राहिलें नाही, याच्याबद्दल तुझ्या मनाला फार खंती वाटत असेल ! आपल्या काव्याचा किंवा कीर्तीचा कांहीदेखील अवशेष पाठीमागे राहिला नाही म्हणून तुझें मन एखाद्या निपुत्रिक मरण पावलेल्या मनुष्याप्रमाणे तळमळत असेल ! पण तूं निपुत्रिक नव्हतास ! एखाद्या आईला पुष्कळ मुलें व्हावींत, परंतु त्यांतील एकहि जाग्यावर राहूं नये, तशा प्रकारची तुझी स्थिति झाली आहे ! आईदेखील आपल्या मुलांची जोपासना करीत नसेल, अशा तऱ्हेनें तूं आपल्या मुलांची—नाटकांची—जोपासना करून आणि त्यांच्यांवर नाना प्रकारचे अलंकार घालून तूं त्यांना बाळसेदार, गुटगुटीत, सुंदर आणि मोहक केलें असशील. पण ते तुझे सर्व श्रम वायां गेले. भासा, संग्रहालयांतून पाहावें, तों अगदी भिकारड्या कवींचेसुद्धा ग्रंथ सोनेरी अक्षरांमध्ये लिहिलेले दृष्टोत्पत्तीस येतात ! आणि भासा, तूं एवढा चांगला कवि असून तुझा एकहि ग्रंथ त्या संग्रहामध्ये संग्रहित झालेला असूं नये हें केवढें दुर्भाग्य आहे ! अगदी भिकारड्या कवीचेंसुद्धा एखादें वीतभर काव्य लिहून झाल्याबरोबर—अगर तें चोरून घेऊन झाल्याबरोबर आपल्या बेचाळीस पिढ्यांचे सपत्नीक पूर्वज कोण कोण होते त्यांची नांवानिशी, आपण केव्हा जन्मलों, आपल्या लहानपणीं आणि मोठेपणींसुद्धा आपण काय काय खुळचट प्रकार केले, आपण एखाद्या राजावर खोट्या कविता कशा रचल्या, त्याने दिलेल्या क्षुद्र देणगीनेहि आपण किती संतुष्ट झालों, आपल्या त्या क्षुद्र

काव्याचा शेवटचा श्लोक शालिवाहन राजाने प्रचलित केलेल्या कोणत्या शकवर्षांत, कोणत्या अयनांत, कोणत्या ऋतूंत, कोणत्या मासांत, कोणत्या पक्षांत, कोणत्या वारीं, आणि कोणत्या कुग्रामात्मक महाक्षेत्रीं रचण्यांत आला वगैरेबद्दलची दीडदीड हात स्वकीयचरित्रात्मक माहिती त्या काव्याला त्याने जोडलेली आढळून येते. आणि अजागळ लोकाच्या मनामध्ये ती बावळट माहिती मोठें कौतुकहि उत्पन्न करिते ! आणि, भासा, तूं एवढा चांगला कवि असून तुझा कोणाला पत्ताहि नाही ! काय अन्यायी हें जग आहे !

पण भासा, तुझे ग्रंथ कां जाळले गेले ? तुझ्या शत्रूंनी तुझीं काव्यें जाळलीं किंवा एखाद्या राजाचा तुझ्यावर प्रकोप झाला ? उदार मनाचे राजे लाभण्याच्या कामांत तुझ्या वेळचे लोक भाग्यवान् होते. मग तुझ्यावर हा प्रसंग कां आला ? किंवा तुझ्या अनेक नाटकांपैकी उत्कृष्ट नाटक कोणतें याची परीक्षा पाहण्याकरिता आग्नीचें दिव्य करण्याच्या कल्पनेचा हा परिणाम आहे ? कसली ही दिव्याची कल्पना ! ह्या कल्पनेच्या पायीं, भासा, तुझें स्वप्नवासवदत्ता हें नाटक चांगल्यांत चांगलें ठरलें असेल; पण बाकीचीं अजिबात जळून गेलीं, त्याची वाट काय ? अग्नींत टाकलेल्या सीतेप्रमाणे तुझी वासवदत्ता शुद्ध म्हणून अग्नींतून जशीच्या तशी बाहेर आली, ही मोठी अभिनंदनीय गोष्ट आहे खरी; परंतु ही एक चांगली ठरविण्यासाठी तुझ्या परीक्षकांनी—नव्हे, तुझ्या जन्मान्तरींच्या वैऱ्यांनी—तुझीं बाकीचीं सर्व नाटकें जाळून टाकलीं, हें केवढें अघोर कर्म त्यांनी केलें आहे !

परंतु, भासा, आता त्याबद्दल खेद करून काय होणार ? झाली गोष्ट फिरून येत नाही. आणि आपले ग्रंथ लुप्तप्राय होण्याचा हा पुत्रशोकवत् दुर्धर प्रसंग तुझ्यावरच आलेला आहे असें नाहीं. पुष्कळांनी हीं दुःखें सहन केलीं आहेत. इतरांची गोष्ट तर राहूं देच ! परंतु प्रत्यक्ष वेददेखील एकदां लुप्त झाले होते. आणि आतांदेखील त्यांपैकी कांही थोडेसेच मात्र उपलब्ध झालेले आहेत. देवांचे वेद दुष्ट दैत्यांनी चोरून नेऊन समुद्रामध्ये बुडविले, हें तुला माहीत आहे ना ? जेथे देवांच्या ग्रंथांना दुर्दैवाने सोडलें नाही, तेथे मनुष्याचा काय पाड ? त्याचप्रमाणे तुझ्या वेळचा आणि तुझ्याचप्रमाणे गुणाढ्य असलेला जो गुणाढ्य, त्याच्या बृहत्कथेची क़था तुला माहीत

नाही काय ? ती लक्षांत आण, आणि त्याच्याकडे पाहून तूं आपलें दुःख कमी कर ! हे गुणाढया भासा, त्या गुणाढयाने पैशाची भाषेमध्ये सात वर्षांत बृहत्कथेचा सात लक्ष ग्रंथ अरण्यांत लिहून तयार केला होता; आणि त्या ग्रंथांतील विशेष हा होता की, तेथे शाई नसल्यामुळे त्या कवीने आपल्या शरीरांतील रक्त काढून त्या रक्ताने तो ग्रंथ लिहिला होता. आपल्या शरीरांतील अशा रीतीने रक्त आटवून लिहिलेले ग्रंथ ते लिहिणारांना किती प्रिय असले पाहिजेत, याची कल्पना दुष्ट दुर्जनांशिवाय दुसऱ्या कोणालाहि आल्यावांचून राहणार नाही. तो ग्रंथ जगामध्ये प्रसृत व्हावा म्हणून गुणाढयाने आपल्या दोघां शिष्यांबरोबर सातवाहन राजाकडे पाठविला. परंतु भाषा पैशाची, शाई रक्ताची, आणि ग्रंथसंख्या सप्त लक्षांची, या गोष्टीवर कटाक्ष ठेवून सातवाहनाने त्या ग्रंथाचा धिक्कार केला ! तेव्हा तो ग्रंथ घेऊन ते दोघे शिष्य गुणाढयाकडे परत आले. आपल्या ग्रंथाचा झालेला अपमान सहन न होऊन, उद्वेगाच्या भरांत एका पर्वतावरील एकान्तस्थळीं जाऊन, आणि तेथे एक अग्निकुंड सिद्ध करून, तो आपल्या काव्याचें एकेक पत्र शेवटचें वाचून पेटलेल्या अग्नीमध्ये जाळून टाकूं लागला ! अपमानामुळे दाक्षायणीप्रमाणे असा उद्वेग कोणाला उत्पन्न होणार नाही ? एकेक पत्र वाचावें आणि तें अग्नीमध्ये टाकावें असा क्रम चालला असतां त्या सुंदर काव्याचें श्रवण करण्याकरितां अरण्यांतील पशुपक्षी हळूहळू सर्व तेथे येऊन बसूं लागले; इतकेंच नव्हे तर त्या अद्वितीय काव्याच्या श्रवणानंदाने ते इतके तल्लीन आणि तन्मय होऊन जाऊं लागले की, त्यांतील करुणरसाच्या गोष्टी ऐकून त्यांच्या डोळ्यांतून खळखळां पाणी वाहूं लागलें. त्यांतील कथाभाग ऐकावयाचा अंतरेल म्हणून ते तेथून हालेनासे झाले, आणि त्या एकाग्र अवस्थेमध्ये तृष्णा आणि क्षुधा यांचीहि त्यांना शुद्ध राहिली नाही ! त्याच वेळी इकडे सातवाहन राजाची प्रकृति हळूहळू बिघडूं लागली. तेव्हा राजवैद्यांनी कारणाची अशी चिकित्सा केली की, शुष्क मांस खाण्यांत आल्यामुळे प्रकृतीमध्ये हा विकार उत्पन्न झाला असावा. तेव्हा स्वयंपाक करणाऱ्या आचाऱ्यांना बोलावून आणिलें. ते म्हणाले, ‘आमच्याकडे काय दोष आहे ? आतांशा पारधी लोक जसें शुष्क मांस आम्हांला आणून देतात, तसें आम्ही शिजवून देतों.’ पुढे त्या पारध्यांना आणून विचारलें. तेव्हा त्यांनी अरण्यांतील सर्व हकीकत

राजाला सांगितली. ‘ कोणी एक ब्राह्मण येथून जवळच्याच एका पर्वतावर बसला आहे. तो फार प्रेमळ वाणीने कोण्या एका उत्कृष्ट ग्रंथाचें एकेक पान वाचतो आणि अग्नींत टाकतो. तें काव्य ऐकण्याकरितां अरण्यांतील सर्व प्राणी त्याच्याभोंवतीं येऊन बसलेले आहेत; ते तेथून हालत नाहीत, आणि कांही खात नाहीत की पीत नाहीत. त्यामुळे त्यांच्या सगळयांच्या शरीरांतील मांस शुष्क होऊन गेलेलें आहे. तेव्हा आम्हीं तरी त्याला काय करावें ? ’ ही हकीकत ऐकून सातवाहनाला मोठें आश्चर्य वाटलें, आणि हा काय प्रकार आहे तो पाहण्याकरितां तो स्वतः अरण्याकडे निघाला. तेथे आल्यावर त्याला समजलें की, ज्याच्या ग्रंथाचा आपण धिक्कार केला होता तोच हा गुणाढ्य असून दुःखातिरेकामुळे तो आपल्या ग्रंथाचें एकेक पान शेवटचें वाचून घेऊन तें अग्नीमध्यें टाकीत आहे. हें पाहून राजाला फार वाईट वाटलें, आणि ज्या ग्रंथाचें श्रवण करीत असतां पशुपक्षीहि चित्रासारखे तटस्थ होतात, आणि त्यांच्या डोळयांतून अश्रु वाहत असतात, त्या ग्रंथामध्ये खरोखरच कांही तरी अद्वितीय गुण असले पाहिजेत अशी राजाची खात्री झाली; आणि ज्या ग्रंथाचें स्वारस्य पशुपक्ष्यांनाहि कळलें, त्याचें स्वारस्य मनुष्याला कळलें नाही याबद्दल त्याला मोठी लज्जा वाटली. मग पश्चात्तापाने संतप्त होऊन त्याने गुणाढ्याचे पाय धरले. परंतु गुणाढ्य म्हणाला, “ राजा, आतां काय उपयोग ? माझा सहा लक्ष ग्रंथ अशा रीतीने आतापर्यंत जळून गेला आहे ! ” राजा म्हणाला, “ झाल्या अपराधाची क्षमा करून उरलेला ग्रंथ तरी आता आपण मला द्यावा.” तेव्हा ती गोष्ट गुणाढ्याने मान्य केली, आणि बृहत्कथेपैकी एक लक्ष तरी ग्रंथ जगांत आज शिल्लक राहिला आहे. नाही तर तोहि जळून गेला असता. परंतु सहा लक्ष ग्रंथ या जगांतून नाहीसा झाला तो झालाच ! ही काय गुणाढ्याची लहान हानि झाली आहे ? त्या श्यामसुंदर श्रीकृष्णाच्या मुरलीस्वराप्रमाणे जें मनमोहन काव्य ऐकून वनांतील वन्य पशुपक्षीहि तहानभूक विसरून तटस्थ बसले आणि अश्रु गाळूं लागले, तें सहा लक्ष काव्य ज्या कवीचें दग्ध झालें, त्याचें या जगामध्ये काय दग्ध व्हावयाचें उरलें होतें ? तरी पण त्याने तें सोसलें ना ? भासा, हे दुष्ट लोक जगामध्ये नेहमी कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपामध्ये उत्पन्न झालेले असतातच. त्यांनी तुझीं काव्यें जशीं अग्नींत टाकलीं, तशीच अगदी

अलीकडे त्यांनी तुकाराममहाराजांच्या अभंगांची अप्रतिम गाथा पाण्यामध्ये बुडविली! दुष्टांचे हात कोणत्याहि काळीं धरले किंवा तोडले जात नाहीत! तुकारामासारख्या साधुपुरुषाची कविता बुडविण्याची कल्पना ज्यांच्या मनामध्ये आली, त्यांच्या मनाची रचना देवाने कोणत्या द्रव्याने केलेली होती, हें कोण जाणूं शकणार आहे? पण भासा, अशा एकेक कवीचीं उदाहरणें किती सांगावीं? जसा सबंध अरण्याला वणवा लावून त्यांतील सर्व वृक्ष एकदम जाळण्यांत येतात, त्याप्रमाणेच कित्येक घोरकर्म्या राजांनी एकदम असंख्य ग्रंथांच्या राशीच्या राशी जाळल्याचीं उदाहरणें इतिहासामध्ये नाहीत काय? मिसर देशामध्ये अलेक्झँड्रिया या नांवाचें एक मोठें शहर आहे. तेथे अनेक विद्वानांनी लिहिलेल्या असंख्य ग्रंथांचा फार मोठा संग्रह होता. तें शहर उमर नांवाच्या एका यवन राजाने काबीज केलें. त्या वेळीं ते सगळे ग्रंथ जाळून टाकण्याविषयीं त्याने हुकूम केला. त्या हुकुमाप्रमाणे चार हजार स्नानगृहांतून पाणी तापविण्यासाठी ते ग्रंथ वांटून टाकण्यांत आले, आणि तें कागदी सर्पण प्रत्येक ठिकाणीं सहासहा महिने भरपूर पुरलें असें सांगतात! यांत किती ग्रंथकारांची कत्तल झाली असेल याची कोणाला कांही तरी कल्पना करतां येण्यासारखी आहे काय? इतक्या लोकांच्या ग्रंथांची होळी पेटलेली पाहिली असतां मग आपले ग्रंथ नष्ट झाल्याचें कांहीच वाटत नाहीसें होतें, असें तुला वाटत नाही काय? आपल्या कपाळीं असेंच होतें, असें म्हणून स्वस्थ बसण्याशिवाय अशा गोष्टीला दुसरा काय उपाय आहे?

भासा, तुला पूर्वजन्मीचें तुझें चरित्र कांही आठवतें का? पूर्वी कधी तूं एखाद्या हरिणीचीं पाडसें मारिलीं होतींस काय, किंवा एखाद्या वेलीचीं फुलें नासून टाकलीं होतींस काय, की ज्यामुळे तुझ्यावर असा प्रसंग यावा? परंतु तुझ्यासारख्या प्रेमळ रसिकाच्या हातून असला अपराध घडेल तरी कसा?

भासा, तुझ्या वेळचे सगळे कवि हल्लीच्या वाङ्मयामध्ये हयात आहेत आणि तूं मात्र त्यांच्यामध्ये नाहीस! अंतरिक्षांतील एखाद्या ग्रहमालिकेमध्ये पूर्वी एकदा कांही तारे चमकत असावेत, परंतु बाकीचे आपापल्या जागीं कायम राहून त्यांतील एखादाच तेजस्वी तारा आकाशांतून तुटून नाहीसा

व्हावा आणि त्याची आकाशांतील जागा रिकामी पडावी व शून्य दिसावी, त्याप्रमाणे वाङ्मयाच्या अंतरिक्षांतून तुटून गेलेल्या हे भासमान् ताऱ्या, भासा, तुझी अवस्था झाली आहे! कालिदास, दण्डी, भवभूति, बाण इत्यादि संस्कृत वाङ्मयाचे प्रवर्तक महर्षि आपापल्या आसनावर बसून काव्यधर्माचें प्रवचन करीत असतां तूंच आपल्या आसनावरून उठून कोणीकडे अदृश्य झाला आहेस?

ज्या जलाशयाच्या लाटा उचंबळलेल्या पाहून तुझ्या अंतःकरणामध्ये काव्यकल्पनांच्या लाटा उचंबळत असत, ते जलाशय कोरडे पडून आज जसे नाहींसे झालेले असतील, त्याप्रमाणे त्यांच्याबरोबर तूंहि नाहींसा झालेला आहेस! त्या फुलांनी, वेलींनी, पशूंनी, पक्ष्यांनी तुझ्या मनामध्ये पहिली कवित्वाची स्फूर्ति जागृत केली तीं राहिलीं नाहीत, म्हणून त्यांच्या दुःखाने त्यांच्याबरोबर सहगमन करून तूं नाहींसा झालास काय? परंतु, भासा, तुझ्या प्रतिभेला उद्दीपित करणाऱ्यापैकी दुसऱ्या वस्तु अद्यापि थोड्या का अविशिष्ट आहेत? स्वच्छ आकाश, पौर्णिमेचा पूर्ण चंद्र, ज्योत्स्नेचा अमृतप्रवाह, सुंदर दिग्वधू, मंजुळ वायु, हे सगळे कवितेचे कायमचे खेळगडी आहेत! हे जसे निरंतर टिकणारे आहेत त्याप्रमाणे तुझी कविताहि निरंतर टिकावयाला योग्य होती; परंतु अमरांना मृत्यु यावा त्याप्रमाणे तुझ्या काव्याची आज दशा झाली आहे! तुझें काव्य जळून नष्ट व्हावयाचें आहे, असें जर तुझ्या वेळच्या रसिक लोकांना समजलें असतें, तर त्यांनी तें वेदांप्रमाणे सर्व मुखोद्गत करून आपल्या स्मृतीमध्ये सांठवून ठेविलें असतें; आणि तें पितृधन म्हणून मोठ्या प्रेमाने फक्त आपल्या आवडत्या मुलांच्याच स्वाधीन त्यांनी केलें असतें! परंतु असें होणार हें आधी कोणाला कळलें होतें? एखादी जिन्नस हरवली तर ती सापडण्याचा कदाचित् संभव असतो; पण आपले ग्रंथ जाळले, ते आता फिरून हातीं कसचे लागणार, असे विचार मनांत येऊन हे भासा, तुझा आत्मा निराश होत असेल!

पण, हे भासाच्या आत्म्या, तूं असा निराश होऊं नको. परमेश्वर या जगांत जोंपर्यंत हयात आहे, तोंपर्यंत दुष्ट लोकांनी कितीहि अपकार केले तरी कोणालाहि निराश होण्याचें कारण नाही. ज्याने बुडणारी श्रुति मत्स्यरूपाने तारली, ज्याने ज्वालांमध्ये प्रविष्ट झालेली सीतादेवी प्रत्यक्ष अग्नीच्याहि हातून

श्रीरामचंद्राच्या हातीं आणून दिली, आणि ज्याने तुकारामाच्या अभंगांची गाथा श्रीपांडुरंगाच्या रूपाने इंद्रायणीच्या डोहांतून कोरडीच्या कोरडी वर काढून आणली, तोच परमेश्वर तुझ्याहि कवितेच्या पाठीमागे उभा आहे ! तो पाहा ! तो या जगांतील जरूरीची अशी कोणतीहि चांगली गोष्ट नाहीशी होऊं देणार नाही ! भासा, तुझीं कांही नाटकें त्याच्या प्रेरणेने हल्ली उपलब्ध झालेली आहेत, आणि कांही उपलब्ध होण्याचा अजून संभव आहे. परमेश्वराची कृपादृष्टि वळल्यावर कोणता निधि उपलब्ध होणार नाही ! भासा, लावणकांत जळलेली वत्सराजाची वासवदत्ता जशी फिरून जिवंत झाली, तशी तुझी वासवदत्ताहि फिरून जिवंत झालेली आहे ! आपल्या गुरूचीं मुलें जशीं भगवंतांनी परत आणून दिलीं, तशीं तुझीं नाटकें पुनरुज्जीवित झालीं आहेत. तीं वाचून सर्व रसिकांना किती आनंद होत आहे पाहा. त्यांच्या चर्या बदलल्या आहेत, त्यांचे नेत्र प्रफुल्लित झाले आहेत, आणि त्यांचीं मनें प्रसन्न झालीं आहेत. हे भासाच्या आत्म्या, आता तूं शान्त हो, आणि ब्रह्मलोकांत आनंदामध्ये ऐस !

---

## नरसिंह चिंतामण केळकर, बी. ए., एल्‌एल्‌.बी. (१८७२-१९४७)

शिवरामपंतांच्याच काळांत वर्तमानपत्रीय जीवनांत प्रवेश करणाऱ्या निबंधकारांत श्री. न. चिं. केळकरांचा अग्रभागीं समावेश केला जाईल. सुमारें ३०-४० वर्षें सतत त्यांनी निबंधलेखन केलें. केळकरांची दृष्टि कलाप्रधान आहे आणि प्रज्ञा सर्वगामी आहे; त्यामुळे वर्तमानपत्रांत विविध प्रसंगीं, विविध विषय घेऊनहि त्यांनी त्या लेखांना सहेतुक निबंधविलासाचें रूप आणून दिलें. फारशी अतिशयोक्ति न करतां असें म्हणतां येईल की, इतकें विविध व विपुल, सरस व सुबोध निबंधवाङ्मय लिहिणारा लेखक मराठींत अन्य झालेला नाही. चिपळूणकर-टिळकांच्या परंपरेंत राहूनहि आत्यंतिक अभिनिवेश न बाळगतां त्यांनी समतोल राखला. पंडित असूनहि पांडित्य-प्रदर्शनाच्या आहारीं ते गेले नाहीत; आणि प्रासंगिक वस्तुनिष्ठ निबंध घेऊनहि आत्मनिष्ठा राखूं शकले. यामुळेच ‘ जुन्या व नव्या निबंधकारांचा दुवा ’ असें त्यांना सार्थ मानतां येईल.

मराठी साहित्यांतील नाट्य-कथा-काव्य-कादंबरी-इतिहास-टीका-चरित्रें अशा विविध प्रकारचें लेखन या ‘ सम्राटा ’नें केलें असलें, तरी केळकरांच्या लेखनकौशल्याची परमावधि निबंधांतच आहे. राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक, ऐतिहासिक, पौराणिक, औद्योगिक, चरित्रात्मक अशा

विविध तऱ्हेचे निबंध 'केसरी'तून लिहून आपल्या समतोल विचारसरणीची प्रासादिक भाषाशैली, उपमा-दृष्टान्ताने सजविण्याची आणि मर्यादित अवकाशांत विषयाचें मर्म उलगडून दाखविण्याची चातुरी प्रकट केली केळकरांनीच ! ' शनिवारवाड्याचा जीर्णोद्धार, सिमलावर्णन, काव्यदृष्टि, घमेंडखोर बर्कनहेडांना उत्तर, वाङ्मय म्हणजे काय, ऐतिहासिक पोवाडे, दिल्लीचा दरबार, भविष्यकथन, लोकमान्य टिळकांचा मृत्युलेख '—इत्यादि विषयांवर त्यांच्या प्रतिभेचा संचार मनोज्ञ रीतीने होतो. बहुश्रुतपणा व मार्मिक उपयोग यामुळे केळकरांचे निबंध प्रौढ झाले आहेत; प्रासादिक शैलीने त्यांना सुबोधपणा आलेला आहे. केळकरांपर्यंत वर्तमानपत्री निबंध हा विशिष्ट मतप्रचाराच्या हिरीरीने भरलेला असे, आणि त्यामुळेच तो एकांगी वाटे. केळकरांत भावनेचा आवेग कमी, पण बुद्धीचें प्रमाण अधिक असल्यामुळे निबंधाला समतोलपणा प्राप्त झाला. कलावंताचा स्पर्श शिवरामपंतांच्या लेखणीने निबंधाला केलेला असला तरी तो क्वचित् अमर्याद असे. केळकरांनी निबंधाला अंतर्बाह्य मर्यादा आणून दिली.

---

# वाङ्मय म्हणजे काय ? : : १०

'वाङ्मय' या शब्दाची व्याख्या आजवर अनेकांनी अनेक रीतींनी केली आहे. पण त्यापासून स्वतः व्याख्या करणारांनाच जें समाधान लाभलें नाही तें इतरांना कोठून लाभणार? व्याख्या करण्याला निश्चित अर्थाच्या शब्दांनी बोलावें लागतें. पण केवळ वाच्यार्थाने बोलूं असें म्हटल्यास वाङ्मयाच्या व्याख्येची मजल गाठतां येणें शक्यच नाही. वाच्यार्थाच्या रुक्ष मार्गाने किंचित् प्रवास करतांच थकून, शेजारीं पसरलेल्या अलंकारिक भाषेच्या ताटव्यांत शिरून तेथील छायासुख अनुभविण्याचा व करमणूक करण्याचा मोह प्रवाशाला अनावर होतो. व त्याहून मौज ही की, जें त्याला हमरस्त्यावर मिळालें नाही तें आड-मार्गांत लाभतें. अमेरिकन प्रोफेसर डन्स (Dr. Waldo H. Dunns, M. A., LL. D.) लिहितो की, "The word Literature is not only difficult; it is well nigh impossible to define. There is a distinct border-land where 'expression' of thought merges into the pure gold of literature." याचा अर्थ, "विचार व्यक्त करण्याच्या वाटेने जात असतां मध्येच अशी एक यक्षभूमि लागते की तेथे एकदम शब्दार्थाचें सुवर्ण बनतें." अर्थात् प्रतिभासंपन्न अशा प्रवाशाच्या वांट्यालाच हा दिव्य अनुभव यावयाचा! इतर लोक या मार्गावरून नित्य येरझारा घालीत असले तरी त्यांना ही यक्ष-भूमि आढळावयाची नाही, व त्यांच्या मनांतील अर्थाला सुवर्णाचें स्वरूप कधी यावयाचें नाही.

अल्पसंतुष्ट किंवा घाईत असणाऱ्या मनुष्याला वाङ्मयाची कल्पना अवघ्या दोन शब्दांत देतां येईल. पण खनपटीस बसणाऱ्या संशयखोर पृच्छकाचें समाधान करावयाचें तर दोनशें शब्दहि त्या कामाला पुरणार नाहीत. सांगणारा–ऐकणारा भेटेल तसा वेदान्त श्लोकार्धांत सांगतां येतो, किंवा हजारों ग्रंथ लिहिले तरी पुरे पडत नाहीत. तीच गोष्ट वाङ्मयाचीहि

आहे. एका इंग्रज ग्रंथकाराने तर वाङ्मयाची व्याख्या Memorable Words अशी केली आहे. मीं पाहिलेली सर्वांत लहान व्याख्या हीच होय. तर्कशास्त्रांतील व्याख्येच्या पद्धतीप्रमाणे अव्याप्ति-अतिव्याप्ति यांचा घोळ आपण घालीत बसलों तर या व्याख्येची टर तेव्हाच उडविता येईल. कारण संसारी मनुष्याला वाङ्मयाव्यतिरिक्त लक्षांत राहणारे शब्द इतर पुष्कळ असतात. पण मार्मिक मनुष्याला या दोन शब्दांनी पुरेशी कल्पना येईल. दुसऱ्या एका इंग्रज ग्रंथकारानेहि व्याख्येची अडचण खालील वाक्याने व्यक्त केली आहे.— I will tell you what literature is. No. I only wish I could. But I can't. No one can. Gleams can be thrown on the secret inklings given but no more. इतकें बोलून हताश होऊन तो नाद सोडून दिल्याचा आविर्भावच त्याने केला आहे!

वाङ्मय हें शब्दात्मक असलें तरी त्याला अनेक प्रकारची कसोटी लावितां येते. त्याला वजन, माप, प्रमाण, शरीर, स्वरूप, रंग, तेज, मन, आत्मा, इतिहास, यशापयश, ईश्वरी कृपा इत्यादि अनेक अंगें व गुण असतात. प्रथम वाङ्मयाचा शारीरदृष्ट्या विचार करूं. वाङ्मय याचा वाच्यार्थ 'यच्चयावत् जें वाचेने वदलें गेलें तें' असाच करावा लागेल. पण हा जगड्व्याळ अर्थ कोणासहि अभिप्रेत नसणार हें उघड आहे. वेडा बोलतो तोहि वाङ्मयव्यवहार म्हणूं लागलों तर स्वतःलाच वेडें म्हणवून घ्यावें लागेल. पण प्रतिभावान् नाटककार नाटकांत वेड्याचें पात्र घालून त्याजकडून असें बोलून दाखवूं शकतो की तें वाङ्मय होऊं शकेल. वाङ्मयाची व्याप्ति संकुचित करितांना हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे की, पुस्तकांतून, त्यांतल्या त्यांत रक्षणीय अशाच विचारांचा संग्रह होत असला तरी सर्वच्या सर्व पुस्तकें हें कांही खरें वाङ्मय नव्हे; त्यांतहि निवड करणें प्राप्त आहे. छापण्याची कला निघाली यामुळे टाकाऊ अशीं पुष्कळ पुस्तकें छापून बाहेर पडतात हें खरें. तथापि, हाताने पुस्तकें लिहावीं लागत तेव्हाहि टाकाऊ पुस्तकें लिहिलीं जात नसत असें नाही. छापलेला म्हणून कोणताहि मजकूर जसा खरा असतोच असें नाही, तसाच तो संग्राह्य किंवा संस्मरणीय असतोच असेंहि नाही. प्रत्येक पिढीची अभिरुचि व स्मरणशक्ति या दोन चाळणी होत. या जोड-

चाळणींतून प्रत्येक पिढींत कांही कांही लेख सरस्वतीच्या गंगाजळींत पडतात; व हे सर्व गाळीव लेख मिळून जो संग्रह होतो त्याचेंच नांव वाङ्मय. अखिल पुस्तकसंग्रह हा जसा वाङ्मय होऊं शकत नाही, त्याचप्रमाणे एखाद दुसरा शब्द अत्यंत सुंदर असला तरी त्याला वाङ्मय मानतां येत नाही. पण असे जितके अधिक शब्द एकत्र सूत्रबद्ध होतील तितकी त्याची किंमत श्रेढीने वाढत जाईल. बावनकशी सोनें झालें म्हणून एका कणाची किंमत एका चिपेच्या किंवा लगडीच्या किंमतीबरोबर होऊं शकत नाही. तेजाच्या दृष्टीने दोन मोत्यांची बरोबरी झाली तरी त्यांतल्या त्यांत जें मोती वजनाने अधिक चव भरेल तें किंमतीलाहि अधिक भरणार! कोहिनूरच्या तोंडांत मारील अशा तेजाची एखादी हिरकणी असूं शकेल. पण तुझें वजन किती कॅरेट व कोहिनूरचें किती, असें विचारल्यास हिरकणीच्या गालावर लाजेची गुलाबी चमकलीच पाहिजे. शुक्राच्या चांदणीचें आपण कौतुक करितों त्या मानाने सूर्य–चंद्रांचेंहि करीत नाही. पण एखादा पाणीदार लहान मुलगा पाहिला म्हणजे त्याचें कौतुक आपण करितों त्यांतलाच हा प्रकार आहे. शुक्राची टिकली व हाताच्या तळव्याएवढा तळपणारा पौर्णिमेचा चंद्र हे दोन डोळ्यांपुढे आणून त्यांची तुलना केल्यास चंद्रालाच कोणीहि अधिक किंमत देईल. तुटक सुभाषितें वाङ्मयाच्या जातीचीं खरीं, पण समग्र ग्रंथ, किंवा काव्य, किंवा महाकाव्य यांच्या मानाने त्यांची किंमत क्षुद्रच ठरणार!

वाङ्मय या नांवाला पात्र होणारा शब्दसमूह शरीराने भव्यच नसला तरी निदान भरदार असला पाहिजे. त्याला एखाद्या ग्रंथाचें स्वरूप नसलें तरी त्यांत कांही तरी विषय प्रतिपाद्य असला पाहिजे. यालाहि अपवाद असूं शकतो. उदाहरणार्थ, Autocrat of the Breakfast Table या Oliver Wendell Holmes च्या ग्रंथांत किंवा माधवराव मोडकांच्या 'खडे तात्त्विक बोल' या ग्रंथांत एकच विषय प्रतिपाद्य नसून अनेक फुटकळ विषयांचें तुटक प्रतिपादन आहे. पण ग्रंथकाराची तात्त्विक विचारसरणी हें त्या सर्वांतून गोवलेलें एकच सूत्र असून भाषापद्धतीनेहि त्यांत एकीकरण साधलें आहे.

वाङ्मय हें शब्द व अर्थ मिळून होतें, यामुळे तें साभिप्राय गुणमंडित व दोषरहित असावें लागतें. काव्य व वाङ्मय हे शब्द क्षणभर समानार्थक

मानिले तर शब्द व अर्थ यांच्या गुणदोषांविषयी मम्मटप्रभृति साहित्य-शास्त्रकारांनी जी चर्चा केली आहे ती सर्व वाङ्मयाला ग्राह्य धरण्यास हरकत नाही. पण शब्द व अर्थ हे स्वतः सगुण व दोषरहित असले तरी त्यांच्या संबंधांत युक्तायुक्तता म्हणून पाहण्याची एक वेगळी बाब असते त्याला औचित्य हें नांव आहे. 'औचित्यविचारचर्चा' नामक आपल्या अवघ्या एकेचाळीस कारिकांच्या सूत्रग्रंथांत क्षेमेंद्राने या औचित्याचा पूर्ण विचार केला आहे. औचित्य नसेल तर अलंकार हे केवळ जड अलंकार व गुण हे केवळ निरर्थक गुण ठरतात. पण औचित्य हेंच काव्याचें जीवित किंवा आत्मा होय असें क्षेमेंद्राचें म्हणणें आहे. त्याच्या मतें काव्यांत किंवा वाङ्मयांत औचित्य हें निरनिराळ्या पंचवीस तीस बाबतींत संभाळावें लागतें. पद, वाक्य, प्रबंध, अर्थ, गुण, अलंकार, रस, क्रिया, कारक, लिंग, वचन, विशेषण, उपसर्ग, निपात, काल, देश, कुल, व्रत, तत्त्व, सत्त्व, अभिप्राय, स्वभाव, सारसंग्रह, प्रतिभा, अवस्था, विचार, न्याय, आणि आशीर्वाद इतक्या बाबतींत औचित्य तावून सुलाखून घेतलें पाहिजे. ही परीक्षा फारच कडक असल्यामुळे तींत कोणाहि कवीला किंवा वाङ्मय-लेखकाला उत्तीर्ण होणें बहुधा कठीण, व यांपैकी एका ना एका गोष्टी-विषयी ज्यांत प्रमाद घडला नाही असें वाङ्मय मिळणें बहुधा अशक्य. तथापि वरील औचित्यप्रपंच सांगण्याचें कारण इतकेंच की, आपल्याकडील साहित्याचार्योंनी वाङ्मयाच्या स्वरूपांत किती सूक्ष्मपणे लक्ष घातलें आहे हें कळावें. वाङ्मयाला रस व अलंकार यांचा काय उपयोग आहे याची कल्पना मी पुढे सांगणारच आहें. पण हे दोनहि वाङ्मयास अवश्य आहेत एवढेंच येथे सांगून पुढे जातों.

यानंतर विचारांत घेण्याचा मुद्दा हा की, वाङ्मयाचा हेतु काय असावा ? कोणत्या हेतूने लिहिलें गेलेलें वाङ्मय तें खरें वाङ्मय ? या बाबतींत थोडा मतभेद होऊं शकतो. कित्येकांची मजल मनोरंजनापलीकडे जातच नाही, तर कित्येक नैतिक शिक्षण हाच वाङ्मयाचा हेतु असा आग्रह धरून बसतात. जातां जातां केवळ शाब्दिक कोट्या करणारे लोक कृतीने पहिल्या हेतूचें समर्थन करितात. उलट जॉन मोर्ले यांनी वाङ्मयाची व्याख्या केली आहे तींत त्यांनी नैतिक सत्य हा वाङ्मयाचा आत्मा मानिलेला असून, लिहिणें

चित्ताकर्षक असावें ही एक अट, पण ती गौण बाब म्हणून दिली आहे. पण त्या व्याख्येने वाङ्मयाचा फारच संकोच होतो. ज्या अर्थी वाङ्मय हें मनुष्याच्या सद्भावनांनाच आलंकारिक स्वरूप देण्याने निर्माण होतें, त्या अर्थी नीतिबोध हा वाङ्मयाचा अप्रत्यक्ष परिणाम होऊं शकेल. परंतु जें नीतिबोध करण्याच्या प्रत्यक्ष हेतूने लिहिलें नाही तें वाङ्मयच नव्हे असा जर आग्रह कोणीं धरला तर अनवस्थाप्रसंग होईल असें वाटतें.

" Great art ignores the frailties of men; while mediocre art focusses its attention upon them. A great Italian critic gave this famous advice to a young poet anxious to know how he could best serve the higher morals in poetry. 'Don't think about morals; that is the best way of serving them in art."

**—Creative Criticism by Spingan, P. 83.**

शेक्स्पिअर किंवा कालिदास यांचा आपलें प्रत्येक नाटक लिहिण्यांत नीतिबोध करण्याचा हेतु होता, की प्रतिभेच्या उच्च दर्जाचा खेळ खेळण्याचा हेतु होता ? शाकुंतल नाटक हें नीतिबोधाच्या दृष्टीनेच पाहिलें तर कालिदासाने शाकुंतल प्रौढ विवाहाचें खंडन करण्याकरितां लिहिलें की मंडन करण्याकरितां लिहिलें म्हणावें ! उत्तररामचरित्र लिहिण्याचा हेतु तेजस्वी सीतेची स्तुति करण्याचा की आत्मविश्वासशून्य रामचंद्राची निंदा करण्याचा मानावा ? उत्कृष्ट वाङ्मयात्मक शेंकडों ग्रंथांसंबंधाने असेच प्रश्न विचारतां येतील, व एकावरहि ऐकमत्य होणार नाही. कलाविलासाच्या मागे हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून दिला तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीत. वाङ्मयाला नैतिक प्रबंध म्हणणें आणि साखरभाताला नुसत्या साखरेचा केलेला भात म्हणणें हीं दोनहि सारख्याच समंजसपणाचीं होत. शिल्पशास्त्रांत कलेच्या दृष्टीने निरनिराळे आकार बनविणें यांत प्रतिभाकौशल्य दिसून येतें. पण देवळाचें उंच शिखरच सुंदर कां, तर हें आकाशांत ईश्वर आहे असें उंच बोट करून दाखवितें म्हणून; अथवा तीन तीन कमानींची जोडीच कां शोभते, तर तिजवरून त्रिमूर्ति ब्रह्मा-विष्णु-महेश्वराची आठवण होते म्हणून असें म्हणणें

बरोबर होईल काय? ताजमहालाच्या पांढऱ्या शुभ्र दगडांत जी रंगीबेरंगी कुसर बसविली आहे तिचा नैतिक हेतु शोधून काढणाराने ताजमहाल पाहण्यास जाण्याचे श्रम न घेतलेलेच बरे. चित्रकार पौराणिक किंवा ऐतिहासिक चित्रें रंगवितो. तेव्हा त्याचा हेतु कलेच्या दृष्टीने सुंदर चित्रें रंगविण्याचा असतो की नीतिबोध करण्याचा असतो? पोहावयास पडणारा मनुष्य जलक्रीडा करतो ती स्नानाच्या हेतूने नव्हे. शिकारी-क्षत्रिय अरण्यांत मृगयाविलास करतो तो एक दिवस चांगलें मांस खावयास मिळावें म्हणून करीत नाही! गवई दीपराग आळवितो तो अर्थशास्त्रदृष्ट्या मशालजीचा खर्च वाचविण्याकरितां नव्हे. तात्पर्य, 'अधिकस्याधिकं फलं' या न्यायाने कलेच्या दृष्टीने वाङ्मय सुंदर असून त्यांतूनच नीतिबोध निघण्यासारखा असल्यास दुधांत साखर पडेल; पण ज्याचा मूळ हेतु नीतिबोध नाही तें वाङ्मय नव्हे हें म्हणणें यथार्थ नाही. अशीं कांही स्थलें असलींच पाहिजेत की, त्यापलीकडे जाऊन हेतूची पृच्छा करितांच येत नाही. हा रस्ता कोठे जातो? तर अमुक गांवाला, असें सांगतां येतें. पण थेट गांवाशीं गेल्यावर हा गांव कोठे जातो असें विचारणाराला काय सांगावें? अध्यात्मज्ञानाचा किंवा ईश्वरभजनाचा हेतु काय, तर मोक्ष मिळविणें असें म्हणतां येईल. पण फिरून मोक्षाचा हेतु काय असें विचारल्यास त्याला काय सांगावें! उत्कृष्ट वाङ्मयाचीदेखील अशी गोष्ट आहे की, प्रायः तिचा हेतु व तिचें फल हीं एकच असतात, दोन नसतात.

वाङ्मयालाहि सत्याची चाड आहे; पण कलाविलासाच्या द्वाराने जें सत्य प्रतीत होण्यास कबूल होईल त्या सत्याचीच. अडेलतट्टू सत्याकरितां वाङ्मय थांबून राहणार नाही. तर स्वतःचें सत्य निर्माण करून कार्यभाग करून घेईल. यजमान विद्वान् असला तरी रीतीप्रमाणे यथासांग धर्मविधि करण्यास तो प्रायः उपाध्यायाला बोलावून त्याला नमस्कार करील, पण उपाध्याय जर लहरी भेटला तर सुशिक्षित यजमान स्वस्तःच्या हातांत पोथी घेऊन तो धर्मविधि स्वतःच यथासांग करूं शकतो! वाङ्मयकलेच्या मदतीचा धिक्कार करून सत्य हें जर स्वतःच कारभार करूं म्हणेल तर तें निभणार नाही. शास्त्रज्ञान नुसतें समजावून द्यावयाला अलकारादिकांची गरज नसते. पण नुसतें समजावून देणें वेगळें व मनावर

बिंबवणें वेगळें. तें मनावर बिंबण्यास नुसत्या बुद्धींत प्रवेश करून चालत नाही तर कल्पनाशक्तीचीहि मदत घ्यावी लागते. वाङ्मयाचा जन्म भौतिक शास्त्राच्या आधी झाला असून सर्व शास्त्रांना पुरून अखेरहि उरणारें तेंच आहे. शास्त्रांचें वाङ्मयाच्या मदतीशिवाय चालणार नाही. वाङ्मयाचें मात्र शास्त्रांच्या मदतीशिवाय निभूं शकतें. ज्या वेळीं भौतिक शास्त्र जन्माला आलें नव्हतें त्या वेळीहि कवि काव्यें लिहीत होते. बरें, पुढे शास्त्रें जन्माला आलीं म्हणून काव्य कांही थांबलें नाही; उलट शास्त्रांची मदत घेऊन काव्य वाढीसच लागलें. कित्येक लोकांची अशी समजूत आहे की, भौतिक ज्ञानाची वाढ ही काव्यकल्पनेला विघातक होते. मेकॉले याने Poetry declines as civilisation advances हा सिद्धान्त ठोकून दिला आहे, व विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीहि त्याचा अनुवाद केलेला आहे. माझ्या अल्पमतीला असें वाटतें की, हा सिद्धान्त खरा नाही. अज्ञान आणि प्रतिभा हीं समानार्थक होत ही समजूतच बहुधा या सिद्धान्ताच्या मुळाशीं असावी. पण ती खरी नाही. उदाहरणार्थ, मनुष्य-जातीच्या अज्ञान स्थितींत त्याला पंचमहाभूतें हीं जिवंत भूतें किंवा राक्षस अशीं वाटत असल्यामुळे तो त्यांची पूजा-अर्चा व त्यांना नवस करी. पण त्यांना उद्देशून तो ज्या प्रार्थना करी त्या हल्ली आपणांस काव्य-मय वाटत असल्या तरी त्या तेव्हा खऱ्याखुऱ्याच सरळ मनाच्या प्रार्थना होत्या. त्यांत लाक्षणिक किंवा रूपकगर्भ असें कांहीच नव्हतें. पुढे भौतिक ज्ञानाची प्रगति होऊन या पंचमहाभूतांविषयीची कल्पना बदलली, व त्यांत देवतांश किंवा मनुष्यांश नाही असें त्याच्या प्रचीतीस आलें. पण त्यामुळे प्रतिभेची हानि झाली नाही. जुन्या पांचव्या मराठी पुस्तकांत तीन राक्षसांच्या गोष्टीच्या रूपाने ज्याने सुंदर वाङ्मय लिहिलें, त्याला पाणी, वारा, वाफ यांचें यथार्थ ज्ञान नव्हतें असें म्हणतां येणार नाही. पण त्या ज्ञानाने त्याच्या प्रतिभेचा बिघाड न होतां, उलट त्या ज्ञानाचा फायदा घेऊन त्याने एक नवीन कल्पनालंकार बनविला. जुन्या कवींना जें भौतिक ज्ञान होतें, त्याचा उपयोग त्यांना आपली प्रतिभा चाल-विण्यांत जसा करतां येत होता तसाच आजच्या कवींनाहि वाढलेल्या ज्ञानाचा उपयोग करून घेतां येतो. ही पालवा पूर्वी अधिक व हल्ली कमी असण्याचें

कांही कारण नाही. टेनिसनने आपल्या प्रतिभा–पाशांत दैविक कल्पना जशा ओढल्या तशा भौतिक शास्त्राच्या अगदी ताज्या कल्पनाहि ओढल्या आहेत. अरेबियन् नाइटस्वर लिहितांना कल्पनेने जुन्या बगदादी बादशहांचा दरबारी थाट जसा त्याने वर्णन केला तसाच Princess काव्याच्या आरंभीं एका शास्त्रीय प्रदर्शनाचें वर्णनहि त्याने काव्यमय केलें आहे. In memoriam मध्ये Evolution, Survival of the fittest, तसेंच भूगर्भशास्त्राने सुचविलेलीं उदात्त प्रमेयें या सर्वांचा उपयोग त्याने वाङ्मयरीत्या केला आहे. आज कालिदास किंवा ज्ञानेश्वर यांच्या प्रतिभेचा मनुष्य असूं शकणार नाही असें म्हणून हा वाद मुळांतच कोणीं खुंटविला तर गोष्ट वेगळी; पण ते हल्लीच्या युगांत असते तर त्यांच्याहि काव्यांत आधुनिक शास्त्रज्ञानाचा उपयोग, उपमा, दृष्टान्त, उत्प्रेक्षा, रूपक वगैरेकरितां केला गेला असता हें सांगावयाला कशाला पाहिजे ? इंद्रियापेक्षा मन हें केव्हाहि मोठें असणार. म्हणूनच वाङ्मय हें भौतिक शास्त्रांपेक्षा केव्हाहि श्रेष्ठ ठरेल. एका हिंदी दोहऱ्यांत मनाची श्रेष्ठता खालीलप्रमाणे वर्णिली आहे—

**पृथ्वी काहे की बडी । वो तो शेष माथेपर खडी ।**
**शेष काहे का बडा । वो तो शंकरहातका कडा ।**

इत्यादि. याचा अर्थ असा की, पृथ्वी सर्वांत मोठी म्हणतात खरी, पण तिला शेषाचा आधार म्हणून शेष मोठा. शेष मोठा म्हणावा तर श्रीशंकराने त्याचें वळें करून आपल्या हातांत घातलें. शंकर तरी कसला मोठा ? कारण तो बसतो कैलासाच्या माथ्यावर ! पण कैलास हा कांही मोठा नाही; कारण रावणाने सगळा हिमालय तीन वेळां बाहुबलाने गदगदां हालविला. पण काय हो ? याच रावणाला वालीने एक वेळ खांकेंत धरून चिरडला म्हणतात ! तथापि वाली सर्वश्रेष्ठ असेंच कांही ठरत नाही. कारण श्रीरामचंद्राने एका बाणाने त्याचा वध केला. तेव्हा राम सर्वांत श्रेष्ठ असें ठरतें. पण कवि लगेच म्हणतो, अहो, तेंहि खोटें. कारण एवढा मोठा परक्रमी रामचंद्र भक्तजनांच्या अणुमात्र मनांत सबंध साठविला जातो ना ? मनाचा मोठेपणा ठरविण्याची ही प्रमाणमालिका विचित्र दिसली तरी तींतील प्रमेय मात्र अगदी सत्य आहे. कारण असें कोणतेंहि ज्ञान जगांत नाही की ज्याचें मनाला

आकलन होत नाही, व जें आपल्या प्रतिभेच्या कुंचल्याने मनुष्य हवें तसें रंगवूं शकत नाही, किंवा त्याला कल्पनेचीं हवीं तशीं वस्त्रें नेसवूं शकत नाही.

असो. मन कोणत्याहि विषयाला वाङ्मयाचें रूप देतें तें मुख्यतः प्रतिभेच्या म्हणजे कल्पनेच्या मदतीने. कल्पनाशक्ति ही मुख्यतः रस व अलंकार यांच्या द्वाराने प्रकट होते; व बहुधा वाङ्मय या नांवास शोभणारा असा कोणताहि शब्दसमूह सापडणार नाही की ज्यांत रस किंवा अलंकार यांचा विलास नाही. पण याहूनहि पुढचा असा एक प्रश्न सुचतो, व त्याचें उत्तर देण्याचा प्रयत्न करून मी हा निबंध पुरा करितों.

प्रश्न किंचित् तात्त्विक स्वरूपाचा आहे. तो असा की, वाङ्मय हें उचित रसालंकारात्मक मानलें तरी तें वाचल्यापासून मनाला आनंद होतो; तो कां व कसा होतो ? त्याला माझें उत्तर खालीलप्रमाणे आहे. जीवात्मा व परमात्मा हीं अंतिम स्थितींत एक असोत वा दोन असोत; आत्म्याला सर्व जगाशीं एकरूप व्हावें, एकाच क्षणीं सर्व जगाचें आकलन करावें, अशी महत्त्वाकांक्षा असते. यामुळे ती जितक्या प्रमाणाने सफल होईल तितक्या प्रमाणाने त्याचा आनंदहि वाढतो. इंद्रियांचें बंधन नसतें तर जगत्स्वरूप होण्याची आत्म्याची आकांक्षा अर्थात् सफल होऊं शकते. पण हीं बंधनें असतांहि तो अतींद्रिय अशा प्रतिभा-मायेच्या साहाय्याने जगभर पसरण्याचा प्रयत्न करितो. आपली तर भूमिका सोडावयाची नाही, पण बसल्या बैठकींत इतर भूमिकांचाहि अनुभवानंद सेवावयाचा, ही गोष्ट प्रतिभाच घडवूं शकते. आपण नवरसांचेंच उदाहरण घेऊं. रसपूर्ण असें काव्य वाचतांना जो आनंद होतो तो आत्मौपम्य बुद्धीमुळेच. कोणत्याहि रसाचा स्थायीभाव क्षणभर दुसऱ्याचा घेऊन आपलासा केल्याशिवाय रसप्रतीति होत नाही. प्रत्यक्ष आपली मुलगी सासरीं चालली असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण बोलतों तें आपणाला काव्य नव्हे. तो आत्मभूमिकेवरचा एकेरी अनुभव. पण तेंच शाकुंतलाच्या चौथ्या अंकांतील कण्वावरचा कन्याविरह-प्रसंग वाचीत असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण वाचतों तें मात्र आपणाला काव्य किंवा वाङ्मय. कारण, येथे एकाऐवजीं दोन भूमिका होतात. वाचक आपली भूमिका न सोडतां मनाने दुसऱ्या भूमिकेवर संक्रमण करितो व प्रतिभेने अनुभव घेतो, म्हणून तें दुःख नसून रसास्वादाचा

आनंदच होय. यापुढे जाऊन अशी कल्पना केली की, दुसऱ्या एकच भूमिकेचा अनुभव प्रतीत करण्याऐवजी एकदम दोन किंवा तीन भूमिकांचा अनुभव जर प्रतीत करतां आला, तर तेथे तो आनंद द्विगुणित किंवा त्रिगुणित झाला पाहिजे. उचित रससंकराने ही गोष्ट प्रत्ययासहि येते. उदाहरणार्थ, वीर व शृंगार यांचा संकर उचित मानला जातो. रघुवंशाच्या अकराव्या सर्गांत ताटकावधाचा खालील श्लोक आहे—

**राममन्मथशरेण ताडिता । दुःसहेन हृदये निशाचरी ॥**
**गंधवद्रुधिरचंदनोक्षिता । जीवितेशवसतिं जगाम सा ॥**

यांत रामाचा ताटकावधाचा वीररसोत्पादक भीषण प्रसंग, व मदनविव्हळ अभिसारिकेचें अभिसारवेशाने दयितगृहीं गमन, हे दोन अनुभव एकाच श्लिष्ट शब्दप्रबंधाच्या साहाय्याने आणून दिले आहेत. सकृद्दर्शनीं असें वाटतें की, हा कल्पनांचा गोंधळ होतो. पण तें खरें नाही. किंबहुना तीन-तीन चार-चार अर्थ असणारे श्लेषात्मक शब्द सुसंगत जुळवितां येतील तर तीन-तीन चार-चार काल्पनिक प्रसंगांचा अनुभव एकदम घेतां येणें शक्य आहे. मुक्तेश्वराच्या भारतीय रणवर्णनांतील—

**पांडवप्रताप पुरुष तरणा । नववधू कौरवसेना**
**शृंगारिली परि संघट्टना । युद्ध सुरता न थोरवे**

... ... ... ... ...

**ते गदा घेऊनि मांडीवरी । रणमंचकीं निद्रा करी**
**प्राणपारिखे दवडुनि दुरी । मग एकांतीं पहुडिजे ॥**

या वर्णनांत अश्लीलपणाचा दोष आहे, व रघुवंशांतील

**सदयं बुभुजे महाभुजः ।**

वगैरे जें अजराजाच्या सुराज्यव्यवस्थेचें वर्णन शृंगारिक भाषेंत केलें आहे तेंहि थोडें सदोषच आहे; तथापि औचित्यदृष्टि क्षणभर बाजूला ठेविल्यास अनेक भूमिकांचा अनुभव मनाला एकसमयावच्छेदेंकरून कसा घेतां येतो हें त्यावरून दिसून येईल.

अलंकाराची गोष्ट घेतली तरी हाच सिद्धान्त सिद्ध होतो. बहुतेक अलंकार हे उपमा व रूपक यांच्या निरनिराळ्या परीच आहेत. उपमा व रूपक या दोहोंत पूर्ण किंवा ईषत्तादात्म्य असा फरक असला तरी एकरूपता-प्रतिपादन हाच दोहोंचा मुख्य उपयोग आहे. या तादात्म्याने तरी आनंद कां होतो असें विचारलें तर त्याचेंहि उत्तर रसाविषयी दिलें तेंच होय. रस व अलंकार यांच्या स्वरूपांत वास्तविक इतकाच फरक की, रसाचे स्थायीभाव जीवनसृष्टीच्या भावनांवर आधिष्ठित असतात; व अलंकाराचे विभाव अचेतन सृष्टीवरहि अधिष्ठित होऊं शकतात. स्त्रीला लतेची उपमा दिली असतां आनंद होण्याचें कारण हेंच की, समगुण अशा दोन पदार्थांचा अनुभव मनाला एकदम घेतां येतो, व हीच गोष्ट समगुण अशा जितक्या अधिक पदार्थांविषयी एकदम घडेल तितका तो आनंद वाढेल. या आनंदाने एक प्रकारची तल्लीनता येते, व तो आनंद फारच उत्कट झाला तर त्यापासून समाधीहि लागूं शकेल. या दृष्टीने पाहतां 'खरी सविकल्प समाधि उत्पन्न करूं शकतें तें वाङ्मय' अशी नवीन व्याख्या मीं बनविली आहे. वाङ्मयाची कोणतीच व्याख्या समर्पक होऊं शकत नाही हें मी जाणतों; तरी ही माझी व्याख्या आपल्या विचाराकरितां मी सादर करीत आहें. लक्षांत घेण्याचा मुद्दा हा की, नेहमी समाधि असा शब्द आपण उच्चारितों तेव्हा ती योगशास्त्रांतील 'निर्विकल्प' समाधि हाच अर्थ मनांत येतो. पण मी म्हणतों ही समाधि 'सविकल्प', म्हणून या दुसऱ्या समाधीच्या अगदी उलट आहे. निर्विकल्प समाधींत बाहेरच्या जगाची किंबहुना आपल्या देहाचीहि कांहीएक जाणीव शिल्लक उरत नाही, व उरतां कामाहि नये. पण वाङ्मयसेवनाने निर्माण होणाऱ्या समाधींत स्वतःच्या मनोभूमिकेची जाणीव तर उरतेच, पण वर दर्शविलेल्या रीतीने इतर भूमिकाहि तींत समाविष्ट होऊं शकतात. एवढेंच नव्हे तर तेंच वाङ्मय अधिक उत्कृष्ट, की ज्याच्या सेवनाने अधिकांत अधिक कल्पना मनांत एकदम उठतील, व अधिकांत अधिक भूमिकांचा मनाला अनुभव घडेल. या दृष्टीने पाहतां सुंदर कल्पना-कल्लोळ ही वाङ्मयप्रेमी मनुष्याला इष्टापत्तीच होय. निवान्त पाण्यांत खडा टाकला असतां एकाच मध्यबिंदूपासून एकामागून एक व एकाहून एक मोठीं अशीं तरंगवर्तुलें निघतात हें आपण पाहतों. उत्कृष्ट प्रतिभेच्या

धक्क्यानेहि मनःसरोवरांत अशाच प्रकारचीं तरंगवर्तुळें उठतात. पण तीं इतकीं जलद उठतात की त्यांतील अंतर मनश्चक्षूंना दिसूं शकत नाही, व त्या वर्तुलांच्या कक्षा विश्वव्यापीहि असतात. 'साहित्यदर्पण'कारांनी रसाला 'ब्रह्मास्वादसहोदर' असें विशेषण दिलें आहे तें यथार्थच आहे.

असो. माझें हें वाङ्मयपुराण अदमासाबाहेर लांबलें; पण आपण सर्व वाङ्मयप्रेमी असल्यामुळे त्याचा कंटाळा मानला नसेल. स्वतः वाङ्मयाप्रमाणे वाङ्मयवर्णनाचीहि गोडी अवीट आहे. वाङ्मयदेवतेचा भक्तसंप्रदाय सर्व-काळ सर्व देशांच्या समाजांतून पसरलेला असतो. देशाभिमानाला येथे नमावें लागतें. तेथे जातगोत कांही नाही. जात असलीच तर ती वाङ्मय-प्रेमी लोकांची मिळून बनते. वाङ्मय-ग्रंथकार हे तर स्वतः स्वयंभूच असतात. एका ग्रंथकाराने म्हटलें आहे की,

'Literary men have neither ancestors nor posterity; they alone compose their whole race.'

वाङ्मय-ग्रंथांना कुलपरंपरा किंवा वतन नसलें तरी निःस्वार्थबुद्धीने परो-पकारच त्यांच्या हातून घडत असतो. त्यांनी मुद्दाम वाङ्मयाची उपासना नित्य चालू ठेवली पाहिजे. साहित्यसंमेलन हें या उपासनेंतील एक वार्षिक व्रत आहे. गेल्या सोळा वर्षांत निदान दहा संमेलनें तरी आपण भरविलीं, व यापुढे या व्रतानुष्ठानांत एक वेळहि खंड न पडूं देण्याचा आपला निश्चय असल्यास तो फारसा धाडशी नसल्यामुळे तडीस जाणें कठीण नाही. बरें, तो तसा असला तरी समर्थांनी श्रीशारदेचें वर्णन 'जे धारिष्टाची कृतबुद्धी' असें केलें आहे; व 'कर्तृत्व जितुकें झालें। तें शारदा गुणें' असें आश्वासन दिलें आहे. म्हणून त्या शारदेची प्रार्थना केल्यास सर्व मनोरथ सिद्धीस जातील असें विनवून पुरें करितों.

---

" आपली आपण करी स्तुति, तो एक मूर्ख " असें एक मूर्खलक्षण रामदासांनी लिहून ठेविलें आहे. पण हें लक्षण ' स्वतः 'ची स्तुति करणाऱ्या व्यक्तीला लागतें; स्वतःच्या 'राष्ट्रा'ची किंवा 'समाजा'ची स्तुति करणाऱ्या व्यक्तीला लागत नाही. फार काय, पण खुद्द रामदासांच्या पुढे हा प्रश्न असता तर त्यांनी असेंहि लिहून ठेवलें असतें की, " आपुल्या राष्ट्राची न करी स्तुति तो शतमूर्ख." स्वतःच्या स्तुतीबरोबर ' वडिलांची कीर्ति ' सांगणें हीहि एक निषिद्ध गोष्ट म्हणून रामदासांनी सांगितली आहे खरी; पण तिचा अर्थ मात्र उघड दिसतो तसा नव्हे. वडिलांची स्तुति करणें किंवा कीर्ति गाणें यांतहि दोन प्रकार असतात. एक प्रकार म्हटला म्हणजे नादान चढाईखोरपणाचा; ज्यांत निव्वळ वडिलांच्या कीर्तीच्या भांडवलावरच सर्व व्यापार भागविण्याचा प्रसंग असतो असला मनुष्य वेळीं अवेळीं वाड-वडिलांच्या नांवाशिवाय बोलावयाचाच नाही. त्याला कांहीहि विचारा, किंवा तो तुम्हांस कांहीहि सांगो, त्यांत त्याच्या बापदादांची साक्ष किंवा जामीनकी असावयाचीच. त्यांच्या आयत्या पिठावर याच्या रेघा; त्यांच्या कर्तबगारीवर हा आपल्या मिशीला पीळ भरणार ! आणि निवळ खान-दानी–कीर्तिमान् पूर्वजांच्या पोटीं जन्मास येणें–हीच काय ती त्याची अवघी लायकी, हेंच याचें सारें शील. समर्थांच्या उक्तीचा कटाक्ष असल्या चढाई-खोर स्तुतिपाठकांवरच आहे. पण मूर्खपणा पदरीं बांधून न घेतांहि ' वडि-लांची कीर्ति ' गातां येणें शक्य असतें. या दुसऱ्या प्रकारच्या स्तुतिपाठकांना आपल्या पूर्वजांच्या लायकीचा अभिमान असतो; पण त्याबरोबर त्यांना स्वतःच्या नालायकीची जाणीव असून तशी लायकी, परमेश्वरा ! आपल्याहि अंगीं येईल काय ? अशी आर्त व कळकळीची प्रार्थना त्यांच्या अंतःकरणां-तून निघत असते. प्रत्येक मूर्तिपूजकाला आपली देवाची मूर्ति उज्ज्वल असावी अशी इच्छा असते; व यामुळे तो ती मूर्ति शक्य तितक्या मौल्य-वान् पदार्थांनी शृंगारतो. पण " माझ्या देवाच्या अंगावर मीं हजारों रुप-

यांचें जवाहीर घातलें आहे, हजारों रुपयांच्या किंमतीची रामाची मूर्ति आज माझ्या मिळकतीच्या यादींत आहे," असें म्हणणाऱ्या उपासकाची भक्ति ही भक्ति कसली? तेंच "हजारों रुपयांच्या जवाहिरांचें तेज एकवटलें, तरी परमेश्वरा! तुझ्या तेजाच्या एका किरणांशाइतकी तरी शोभा त्याला येणार आहे काय? पण हा त्या तेजाची कल्पना मनांत आणण्याचा केवळ एक मानवी प्रयत्न आहे" असें म्हणणाऱ्या सगुण रूपाच्या उपासकाची भक्ति ही मात्र भक्ति खरी! या दोघांच्याहि मूर्तीवर जवाहीर आहे खरें; पण एकाची सर्व दृष्टि आपल्या बडेजावीची, दुसऱ्याची दृष्टि पूज्याची पूजा करण्याची! हेंच त्यांतलें अंतर!

आपल्या पूर्वजांचे पोवाडे गाण्यांतहि इष्ट व निषिद्ध असे हे दोन प्रकार आहेत. महाराष्ट्राच्या हल्लीच्या स्थितींत दोन्ही प्रकार संभवतात. मोडकळीस आलेल्या खानदानीच्या घराण्यांतील विद्यामान वंशजांच्या तोंडीं निषिद्ध प्रकारचे पूर्वज-कीर्तिपाठ आढळून येतात. पण उच्च शिक्षणाने, प्रेमळ भावनेने, आणि राष्ट्रीय प्रेरणेने जेथे महाराष्ट्राच्या जुन्या पिढीची कीर्ति गाइलेली आढळते, तेथे तेथे मात्र ती इष्टच होय यांत शंका नाही. मोठ्या राष्ट्रीय दृष्टीने पाहिलें म्हणजे मग गोत्र, कुळ, जात हे सारे क्षुद्र भेद लय पावतात, व जेथे ब्राह्मणाचा अभिमान मराठा धरितो, व मराठ्याचे गुण ब्राह्मण घेतो, तेथे राष्ट्रीय भावना खरीच उदित झाली असें समजून चालण्यास हरकत नाही. असल्याच भावनेने मराठ्यांचे ऐतिहासिक पोवाडे संग्रहित करून छापण्याचें काम १८७९ सालीं महाराष्ट्रांत रा. शंकरराव शाळिग्राम यांनी कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या प्रेरणेने प्रथम केलें. सदर पुस्तकाची सुधारून वाढाविलेली आवृत्ति रा. शाळिग्राम व मि. ऑक्वर्थ, आय. सी. एस्. यांनी १८९१ मध्ये काढली, व याच ग्रंथाची तिसरी आवृत्ति हल्ली रा. शाळिग्राम यांनी, मुंबई सरकारचे पोलिटिकल सेक्रेटरी व मराठ्याच्या इतिहासाचे चाहते व भोक्ते युरोपियन सिव्हिलियन मि. सी. ए. किंकेड यांच्या साहाय्याने प्रसिद्ध केली आहे. आणि या गोष्टीवरून मराठ्यांचे राष्ट्रीय पोवाडे गाण्याची महाराष्ट्राची इच्छा, व ते उघड गाऊं देऊन त्यांचें स्वारस्य सेवून गौरव करण्याची विद्वान् युरोपियन अधिकाऱ्यांचीहि इच्छा कायमच नव्हे तर वाढती आहे हें पाहून कोणाहि महा-

राष्ट्रीयांस आनंद झाल्यावांचून राहणार नाही ! अशा कामीं युरोपियन लोकांकडून होणारें साहाय्य खरोखरच त्यांस भूषणास्पद आहे. राज्यकार-भाराच्या वेळीं 'आम्ही तुम्हांस जिंकणारे' अशा अभिमानाचा मुखवटा चढवून प्रजेस त्यांना कदर दाखवावी लागत असली, तरी कारभाराची वेळ जाऊन तो उग्र मुखवटा बाजूस काढून ठेवल्यावर, प्रजाजनांच्या अंतरंगांत आपलें अंतरंग मिळवून त्यांच्या राष्ट्रीयत्वास पोषक अशा गोष्टी जाणून-बुजून व निर्मत्सरबुद्धीने करणाऱ्या परकीय अधिकाऱ्यांचा धन्यवाद कोणीहि गाईल ! ( मराठ्यांचे पोवाडे गाणें म्हणजे इंग्रजांशी राजद्रोह करणें नव्हे, ही गोष्ट खुद्द ऑक्वर्थसाहेबांनी आपल्या विद्वत्त्वपूर्ण प्रस्तावनेंत १८९० सालीं लिहिली. तेव्हापासून महाराष्ट्राच्या राजकीय वातावरणांत विचित्र अभ्रें व वादळेंहि उठलीं, आणि त्यांचा परिणाम भित्याची भीति दुणावण्यांत झाला. पण रा. शालिग्राम यांच्या पोवाड्यांच्या पुस्तकाच्या नव्या आवृत्तीस प्रस्तावना लिहून किंकेडसाहेबांनी तें फिरून एकवार जगापुढे मांडून "ही भीति निराधार आहे; महाराष्ट्राच्या विभूतींचे पोवाडे गाण्यास—प्रजा-जनांनी आपल्या पूर्वजांचे गुण आनंदाने घेण्यास—सरकार कधीहि हरकत करीत नसतें व करणार नाही," असेंच एक प्रकारें सिद्ध केलें असें म्हणण्यास हरकत नाही.

कोणत्याहि देशांतील पोवाड्यांत महानुभाव विभूतींचीं चरित्रें व राष्ट्रीय अभिमान जागृत करणारा उदात्त प्रसंग याचेंच वर्णन असतें. वीररस हा पोवाड्यांतील मुख्य रस कोठेहि असणार; व त्याचप्रमाणे प्रस्तुतच्या पोवाड्यां-तहि तो आहे. पण खुद्द ऑक्वर्थसाहेबांनी नमूद केल्याप्रमाणे एखाद्या वीराचा पोवाडा होण्यास तो यशस्वीच झाला असला पाहिजे असें मात्र नाही. पानिपतास भाऊसाहेब पडले व मराठे लढाई हरले; व उलटपक्षी उद्‌गीरची लढाई भाऊसाहेबांनी जिंकली, किंवा त्यांनी दिल्लीचें तख्त फोडलें; असे तीन प्रसंग असतां पानिपतच्या लढाईचा पोवाडा झाला, व उद्‌गीरच्या लढाईचा झाला नाही–निदान झाला असला तरी पानिपतच्या पोवाड्याइतका लोकप्रिय होऊन टिकला नाही–हें ऑक्वर्थसाहेबांनीच साक्ष दिल्याप्रमाणें, पोवाडे करणाऱ्या शाहिरांच्या आणि ते पोवाडे प्रेमाने

गाणाऱ्या मराठे लोकांच्या प्रामाणिकपणाचेंच लक्षण आहे! विभूतिमत्व हें केवळ अंगीकृत कार्याच्या यश.सिद्धीवरच अवलंबून नसतें. निदान हें तरी खरें की, चारित्र्याची यशसिद्धि हीच खरी सिद्धि. अंगीकृत कार्य साधो वा न साधो, केवळ कार्याची सिद्धि ही खरी सिद्धि नव्हे. भारत व रामायण यांतील नायकांचा विजय झाला आहे खरा; पण ग्रीक आद्य कवि होमर याच्या 'ईलियड' नामक महाकाव्यांतील खरा नायक हेक्टर हाच असून तो युद्धांत पडला व मारला गेला; किंबहुना त्याच्या शत्रूने प्रेतास आपल्या रथास बांधून फरफटत फिरविलें व त्याची दुर्दशा केली. तथापि, ईलियडला हेक्टरचा पोवाडा म्हटलें तरी त्यांत फारशी चूक होणार नाही.

पोवाड्यासंबंधाने दुसरीहि एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे; ती ही की, त्यांतील नायक यशस्वी झालेला असला पाहिजे हा निर्बंध जसा नाही, तसेंच तो तत्कालीन सनदशीर रीतीने भांडणाराच असला पाहिजे असेंहि नाही. सनदशीर व बिनसनदशीर हा भेद वास्तविक फार महत्त्वाचा आहे; व कोणत्याहि बिनसनदशीरवाल्यास–त्याचें उदाहरण राजसंस्थेच्या आद्यतत्त्वास विघातक व सद्यस्तापदायक असल्यामुळे–शिक्षा होणें व त्याच्या कृत्यास राजशक्तीने आळा घालण्याचा प्रयत्न होणें हें योग्यच आहे; आणि तें ज्या वेळच्या त्या वेळीं व्हावयाचें तसें होतच असतें. पण कालान्तराने सनदशीर व बिनसनदशीर हा सूक्ष्म औपचारिक भेद विसरला जाऊन ज्या त्या कर्त्या पुरुषांच्या अंगच्या अलौकिक गुणांची तेवढी आठवण जनतेस राहते. कायदेशीर व बेकायदेशीर हे मानवी कृत्याचे गुणधर्म अनित्य व अशाश्वत आहेत; पण त्या कृत्यांमधील शौर्य–धैर्यादि उच्च मानवी गुण हे मात्र नित्य व शाश्वत असल्यामुळे कालान्तराने तेच टिकतात. इंग्रजी वाङ्मयांत राजेलोकांप्रमाणे राजबहिष्कृत दरोडेखोरांचेहि पोवाडे झाले आहेत; यावरून ही गोष्ट सिद्ध होते. रॉबिनहूड हा इंग्रजी भाषेंतील पोवाड्यांचा एक अत्यंत लोकप्रिय नायक आहे; पण तो फांशीची शिक्षा झालेला दरोडेखोर होता! त्याच्या अंगीं माणुसकीचे उंची गुण सर्व कांही होते. सुष्टांचा कैवारी, दुष्टांचा शत्रु, न्यायी, शूर, उदार, प्रणयी अशा गुणांनी युक्त असलेल्या रॉबिनहूडचें व त्याच्या वेळच्या अधिकाऱ्यांचें भांडण होतें; तो त्यांच्या हातीं लागता तर त्यांनी त्यास फांसावर चढविण्यास कांही कमी

केलें नसतें; त्याच्या समकालीन पिढीला त्याची स्मृति उघडपणे करणें कठीण गेलें असतें; व कित्येकांना तर तो कोणी मोठा मनुष्य आहे असेंहि कदाचित् मनांतून वाटलें नसतें; पण पुढील पिढ्यांना त्याच्या चारित्र्याचें खरें मर्म कळल्यामुळे त्यांना रॉबिनच्या बेकायदेशीर वर्तनाचें कांहीच वाटलें नाही; व त्यांनी त्याला उमदा नायक बनवून त्यावर पोवाडे केले. इकडे इंग्रजी अमलांत झालेल्या उमाजी नाईक वगैरेंचीहि तीच गोष्ट आहे. तो दरोडेखोर तर खराच, व अखेर फांशींहि गेला; पण त्याच्या दरोडेखोरींत शौर्य, धैर्य, प्रसंगावधान, औदार्य, महत्त्वाकांक्षा, माणुसकी वगैरे अनेक उत्कृष्ट गुणांचें मिश्रण झालेलें असल्याने पीनल कोडाप्रमाणे शिक्षा झालेल्या त्या अलौकिक व्यक्तीचे पोवाडे शाहिरांनी केले; ते गाणारे भिकारी अजूनहि या दरोडेखोराच्या नांवावर आपलें पोट भरतात; व सरकारलाहि, त्या पोवाड्यापासून दरोडे घालण्यास उत्तेजन मिळेल अशी भीति वाटत नसल्याने, तें ते पोवाडे गाण्यास प्रतिबंध करीत नाही.

तात्पर्य, मनुष्याचे पोवाडे होऊन लोकांनी ते गाण्यास त्याच्या अंगीं कांही लोकोत्तर गुण असावे लागतात. मग सुदैवाने तो शिवाजीमहाराजांसारखा अफझलखानास मारण्याचें धाडस करणारा पूर्ण यशस्वी वीर असो; तानाजी मालुसऱ्यासारखा सिंहगड घेऊन प्राणास मुकलेला अर्धयशस्वी सरदार असो; सदाशिवरावभाऊसारखा पानिपतची लढाई हरून स्वपक्षाची कीर्ति व स्वतःचे प्राण गमावणारा सर्वस्वी अपेशी असा सेनानायक असो; अहिल्याबाईसारखी उदारचरित व पुण्यशील पापभीरु साध्वी असो; किंवा उमाजी नायकासारखा बेकायदा वागणारा व प्रसंगविशेषीं प्राणहानि न पाहणारा मिश्रगुणविशिष्ट दरोडेखोर असो !

पोवाड्यांचें उत्पत्तिकारण हें असें असल्यामुळे, कोणत्याहि समाजांत तत्कालीन वीरपुरुषांचे पोवाडे ताबडतोब होऊन गाण्यांत येणें अशक्य असतें; आणि ज्याच्या अंगीं वीररसाचे भाव व विभाव होऊं शकतील असे किंवा इतर लोकोत्तर गुण नसतात, ते इतर रीतींनी कितीहि चांगले असले तरी त्यांचे पोवाडे होऊन गाइलेले ऐकावयास मिळण्याची प्रायः केव्हाच आशा नको. इंग्लंडांत झालें तरी, ' चेव्ही चेस 'च्या लढाईचे किंवा रॉबिन हूडच्या पराक्रमाचेच पोवाडे झाले आहेत; पण इंग्लंडला नेपोलियनबरोबर दहा

बारा वर्षें लढवून पांचपंचवीस लढाया अप्रत्यक्ष रीतीने घडवून आणणाऱ्या बालमुत्सद्द्याचे म्हणजे–राजकारस्थानी विलियम पिट्चे–पोवाडे कधी झाले नाहीत ! महाराष्ट्राच्या ऐतिहासिक पोवाड्यांचीहि गोष्ट अशीच आहे. या पोवाड्यांचा ओघ पेशवाईच्या अखेरपर्यंत टिकला,व तेथपासून तो मावळल्यासारखाच झाला म्हटलें तरी चालेल. वास्तविक चारित्र्याने उदात्त असणाऱ्या लोकांची महाराष्ट्रांतील परंपरा पेशवाईबरोबरच मावळली हें मुळीच खरें नाही. परंतु महाराष्ट्रांत स्थापित झालेली शान्तता, आधुनिक सुधारणेचा रसहीन प्रवाह व प्रभाव, विशेषतः स्वराज्याचा लोप,या गोष्टी नवीन पोवाडे होण्यास प्रतिबंधक झाल्या आहेत.आधुनिक सुधारणेचें मूर्धाभिषिक्त उदाहरण म्हणजे आगगाडी. या आगगाडीपासून इतर अनेक फायदे झाले असले तरी तिने महाराष्ट्रीयांची बरीचशी रसिकता कमी केली, निसर्गनिर्मित भूषणास्पद देखाव्यापासून महाराष्ट्राची दृष्टि ओढून घेऊन भलतीकडे लावली, व पोवाड्यांसारखी जनतेच्या अंतरंगांतून निघणारीं–जनतेचें अंतरंग तल्लीन करून सोडणारीं–राष्ट्रीय काव्यें निर्माण होण्याचा रसिकतेचा झरा आटवून सोडला, असें मि. ऑक्वर्थ यांनी गाऱ्हाणें केलें आहे तें सर्वस्वी खरें आहे. कालाच्या कलाटणीमुळे आम्हांस पूर्वी कधी न मिळणारीं अशीं देशी व विदेशी सौख्यें मिळूं लागलीं आहेत हें खरें; तथापि पोवाडे करण्याचें, पोवाडे म्हणण्याचें, व पोवाडे ऐकण्याचें आमचें सुख नष्ट झालें आहे यांत शंका नाही. ऑक्वर्थ, शाळिग्राम, किंकेड वगैरे मंडळींच्या परिश्रमाने जुने पोवाडे छापले जाऊन ते विस्मृतिरूपी मृत्यूच्या दाढेंतून तरी बाहेर पडले यांत वाद नाही. पण आरामखुर्चीवर पडून, विजेच्या पंख्याचा वारा घेत व हॅवाना सिगारेटचे झुरके सोडीत वाचलेल्या पोवाड्यांपेक्षा, जुन्या पद्धतीने म्हटले जाणारे पोवाडे ऐकून होणारें सुख खरोखर किती तरी श्रेष्ठ ! रंगपंचमीच्या दिवशीं सायंकाळीं चावडीसमोर पिंपळाच्या पारावर फाटकीतुटकी बैठक घातली आहे; बुदलीने ओतल्या जाणाऱ्या तेलाने पेटणारे हिलाल पाजळत आहेत; रंगीबेरंगी कपडे घातलेले अर्धउघडे लोक गोळा झाले आहेत; पायांत तोडा, डोक्यावर कंगणीदार पगडी, व तींत तुरा खोवलेला—अशी अर्ध–गोंधळी अर्ध–तमासगीर मंडळी तुणतुणीं खेचून तिसऱ्या सप्तकांत सूर नेऊन गात व साथ करीत आहेत; कडकडीत डफावर डाव्या हाताची टिचकी व

उजव्या हाताची थाप मारून त्यांचा पुढारी एकाहून एक सरस असे पोवाडे आठ-आठवून म्हणत आहे; आणि सर्व श्रोते मंडळी तल्लीन होऊन तटस्थ झाली आहे—अशा अस्सल देशी थाटांत पोवाडे ऐकण्याची गोष्ट कांही वेगळीच आहे! तिचें स्वारस्य ज्याने अनुभविलें नसेल त्याला तें सांगून काय मिळणार?

पोवाडे म्हणण्याची ही जुनी पद्धत जशी लोपली, तसेच पोवाडे होण्याचे विषयहि महाराष्ट्राला तूर्त लोपले आहेत असेंच म्हणणें भाग आहे. अलीकडच्या काळीं पोवाडे कशाचे होणार? पेशवाई नष्ट झाल्यापासून युद्धाची रम्यकथा फक्त पुस्तकांत वाचावयाला मात्र शिल्लक उरली आहे. दरम्यानच्या काळांत एखाद्या मराठ्या सुभेदाराने साऊडनमध्ये शौर्य दाखवून, किंवा सरहद्दीवरच्या धामधुमींत डोंगर चढून उतरून, शाबासकीची फीत किंवा बहाद्दरीचा एखादा बिल्ला मिळविला असेल. पण ही लढाई कोणाकरितां? तिची हुकमत कोणाकडे? तिचें वर्णन ऐकावयास कोणास मिळणार? व मिळालें तरी त्याने पोवाडे रचण्यास लागण्यासारखा उत्साह ऐकणाऱ्यांच्या हृदयांत कसा उत्पन्न होणार? बिनलष्करी पेशाच्या धंद्यांतहि धैर्य–वीर्य दाखविण्याचे प्रसंग येत असतील, नाही असें नाही. पण पोवाडा करणाराने आज पोवाडा करावा तरी कुणाचा? कळकळीने वस्तुपाठ शिकविणाऱ्या मास्तराचा? की 'गाउन' घालून तडतड इंग्रजी बोलणाऱ्या प्रोफेसराचा? की टाकाच्या एका वळशाने कारवाईचें कारस्थान साधणाऱ्या शिरस्तेदाराचा? की कौन्सिलांत तोंड-पाटिलकी गाजविणाऱ्या नामदाराचा? की धान्याचीं पोतीं विलायतेस पाठवून दलाली मिळविणाऱ्या राइलीच्या एजंटाचा? ऑक्वर्थसाहेब आधुनिक पोवाड्यांचा शोध करीत असतां त्यांना 'आगगाडी'वर रचलेला एक पोवाडा आढळला होता; आम्हींहि व्हिक्टोरिया महाराणीच्या चरित्रावर एका आधुनिक महामहोपाध्याय—प्राय: पंडिताने—संस्कृतांत लिहिलेलें एक महाकाव्य पाहिलें आहे. पण असले पोवाडे व असलीं महाकाव्यें यांची प्रसिद्धि छापखान्याच्या कंपॉझिटरापलीकडे फारशी होणे शक्य नाही. मग राष्ट्रीय वारें अंगांत खेळवूं लाविण्याचें जें पोवाड्यांतील सामर्थ्य तें यांच्यांत कसें येणार? नव्या कालमानाप्रमाणे कांही नव्या अशा गोष्टी आम्हास मिळत आहेत. पण जुन्या कित्येक गोष्टींची

जागा कोणत्याहि नव्या गोष्टींनी भरून निघणें शक्य नाही; व ऐतिहासिक पोवाडे ही त्यापैकींच एक गोष्ट होय!

खुद्द ऑक्वर्थसाहेबांनीच असे उद्गार काढले आहेत की, "मराठ्यांचें स्वराज्य गेले, परक्यांचें राज्य त्या जागीं आलें; व शान्तता चांगली खरी, पण तिच्यामुळे सर्व राष्ट्राच्या चरित्रांत एकेरीपणा आला व वैचित्र्य नष्ट झालें. युद्धें हीं वाईट खरीं, पण त्यांच्या वेगाने राष्ट्रीय चारित्रपटावर जीं निरनिराळीं चित्रें दिसावयाचीं, आणि मनास ताजेपणा व उल्हास वाटावयाचा तें सर्व नाहीसें झालें. तात्पर्य, राष्ट्रांतील जातिवंत कवींना खरी काव्यस्फूर्ति होण्यास जी परिस्थिति लागते ती हल्ली नाहीशी झाली आहे. मग नवीन पोवाडे कसे निर्माण व्हावेत? आगगाडी पाहून क्षणभर मनास चमत्कार वाटतो खरा; पण विजेच्या दिव्याने लखलखणारी व तासाला ६० मैल जाणारी पंजाब मेल डोळ्यांपुढून गेली, तरी स्वदेशी इतिहास बनत असतांना एखाद्या कोनाकोपऱ्यांत झालेल्या लहानशा चकमकीइतकेंहि तिच्याने महाराष्ट्रीय कवीला स्फुरण येणार नाहीं. मग शिवाजीमहाराज व बाजीराव यांचा पराक्रम, अगर नाना फडणवीस किंवा पाटीलबुवा यांचें राजनीतिचातुर्य यांची भर कशाने निघून येणार! पोवाड्यापेक्षा वाङ्मयदृष्टीने आधुनिक कवींची कविता अधिक चांगली असेल; पण पोवाडे सोडून या कवितेकडे आपण आलों म्हणजे, हिमालयावरील किंवा नर्मदाकांठच्या प्रचंड वनांतून निघून फळझाडांचें बीं विकणाऱ्या एखाद्या नर्सरीवाल्याच्या परसांतील बागेंत, किंवा दिवाणखान्यांतील चिनी कुंड्यांतून खुरटाविलेल्या तालतमालांच्या हातभर पानांच्या सावलींत आपण आलों आहों असें वाटतें, याला नाइलाज आहे! आधुनिक कलाकुसरीची कविता महाराष्ट्रांतील शेंकडा ९५ लोकांच्या कानींहि अद्यापि गेलेली नाहीं. उलट, पोवाडे गाण्याची पद्धति नष्टप्राय झाल्यामुळे पोवाडे जवळ जवळ लोपले तरी त्यांची तेजस्वी स्मृति अद्यापि त्यांच्या मनांतून नष्ट झालेली नाही. अशा वेळीं पोवाड्यांना जितकें उत्तेजन देतां येईल तितकें थोडेंच होणार आहे. या तेजस्वी पोवाड्यांची ओळख महाराष्ट्रीयांना बाळपणापासून व्हावी अशा इच्छेने मि. ऑक्वर्थ यांनी शालिग्राम यांच्या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत अशी सूचना केली होती की,

मराठी शाळांतून व इंग्रजी शाळांच्या मराठी अभ्यासक्रमांतून पोवाड्यांचें थोडेंसें शिक्षण द्यावें. या सूचनेनंतर प्राथमिक शाळांच्या अभ्यासक्रमाचीं पुस्तकें ठरविण्याकरितां एक स्पेशल कमिटीहि नेमली गेली होती; परंतु ऑक्वर्थसाहेबांच्या सूचनेचा विचार झाला नाही. उघडच आहे; तो कसा होणार? जेथे सगुण देवांचीं नांवें एकतर्फी व विशिष्टधर्मीय म्हणून आहेत तशीं राहूं देण्यास विचार पडतो, व शिवाजीच्या गोष्टी राहूं दिल्याच तर मोठ्या कष्टाने राहूं दिल्या जातात, तेथे मुलांच्या पुस्तकांत पोवाडे घालून त्यांचें शिक्षण देण्याचें भयंकर घातक कृत्य करण्यास कोण धजणार! पण हें असें आहे म्हणूनच, शालिग्राम यांच्या पोवाड्यांच्या संग्रहाची तिसरी आवृत्ति निघते, व मे. किंकेडसाहेबासारखे इतिहासप्रिय सद्‌गृहस्थ त्यास प्रस्तावना लिहून जगापुढे आणतात, या गोष्टीचा आम्हांस आनंद वाटतो.

---

# सिमल्याचें वर्णन : : १२

दिल्ली आणि सिमला यांतील अंतर जमीनअस्मानाचें म्हणण्यास हरकत नाही. दिल्ली समुद्राच्या सपाटीपासून सुमारे तीनशें फूट उंच असेल तर सिमला सात हजार फूट उंच भरेल. सिमल्यावर चढलेल्याला झालें तरी आकाश ठेंगणें होतें असें थोडेंच आहे! पण हिमालय म्हटला म्हणजे पृथ्वी-वरच्या कोणाहि मनुष्याला जरा आदरानेच बोलावें लागतें. समुद्राच्या सपाटीपासून तडक एकदम सात हजार फूट उंच चढणें हें आधुनिक वैमानिकालाहि थोडें अवघडच जाईल. ‘ सिमल्याची टेकडी ’ हें ‘ नगाधि-राज हिमालया ’चें एक लहानसें बछडें आहे; तथापि, हें बछडें आपल्या वडिलांचें नांव कांही अगदीच घालविणारें नाही. कारण येथे हिवाळ्यांत तर बर्फ पडतेंच, पण ऐन उन्हाळ्यांतदेखील येथून जवळच बर्फाच्छादित शिखरें दिसतात. हल्ली सिमल्यास हवा फारशी गार नाही. सिंहगड किंवा महाबळेश्वर येथील हवादेखील कदाचित् थोडी अधिक गार ठरेल. पण आठपंधरा दिवसांपूर्वीच येथे थंडीचा कडाका पडून लिंबाएवढ्या गारांचा पाऊस कोसळला होता असें आमच्यापूर्वी येऊन राहिलेले लोक सांगतात! उंच दर्जाच्या माणसाच्या स्वभावाप्रमाणे उंच जागेचें हवामान लहरी नसेल तरच आश्चर्य!

हिमालय पर्वतांत एकाहून एक उंच अशा शिखरांच्या रांगा एकामागे एक लागलेल्या असतात असें म्हणतात. त्याचा मासला सिमल्यास येतांना पाहावयास सांपडला. कालका येथे चढण्यास प्रारंभ केला, तेव्हा वाटे, हा डोंगर चढून गेलों म्हणजे सिमला दिसेल. पण सिमला नुसता दिसण्याला-देखील त्याच्या सात हजार फूट उंचींतले सहा हजार फूट खर्ची घालावे लागले. आणि हें करतांना आगगाडीला वळसे इतके घ्यावे लागले की, आम्ही जिच्याकडे तोंड करून चाललों नव्हतों अशी एकहि दिशा उरली नाही. खुद्द सिमलाच पाठीशीं घालून पुढे चाललों की काय असाहि कित्येक ठिकाणीं भास झाला! वळणें घेण्याला सापाच्या गतीची उपमा

देतात. पण आमच्या पूर्ण चक्राकार गतीने ही म्हण साफ खोटी पाडली! वळणांची एक रांग संपली की पहिली दरी बुजून नवी दरी व नवें खोरें दिसूं लागे, यामुळे जमिनीपासून डोळ्याला उंची फारशी भासत नसे. पण नवीं संकटें उद्भवलीं म्हणजे जुन्यांचा विसर पडावा त्यांतलेंच हें आहे! अगणित दऱ्याखोऱ्यांचीं पुडांत पुडें बसवून हिमालयाची बनावट एखाद्या गेंदेदार दीपमाळेप्रमाणे किंवा पाकळीदार फुलांच्या माळेप्रमाणे केलेली आहे. सिमल्याचा पर्वत हें या एकंदर माळेंतील शेंकडों फुलांपैकी फक्त एक फूल आहे. या प्रत्येक फुलाच्या वांट्याला एकेक उंच गिरिशिखर आलेलें आहे. प्रायः हीं सर्व शिखरें श्रीशंकराच्या नांवाने पवित्र झालेलीं असावीं. आमच्यासमोर दिसतें त्या शिखराला 'चुडेश्वर' म्हणतात, व या 'जटाधारी' योगीश्वराच्या विरागी ऐश्वर्याची आठवण करून देणारा पवित्र भस्मराशीच की काय असा तो त्या शिखरावरील बर्फाचा विसकटलेला ढीग दिसतो. येथून केदार, कैलास, कांचनगंगा, धवलगिरी वगैरे शंकरजींच्या इतर आवडत्या निवासस्थानांची आठवण सहजच होते. आणि 'एवरेस्ट'वर चढण्याच्या 'प्रयत्नां'ची हकीकत आजच्याच वर्तमानपत्रांत वाचली, त्यावरून अजून 'साहेब शिवला नाही' अशी देवतानिवासाची एक तरी जागा शिल्लक उरली आहे या विचाराने खरोखरच जरा बरें वाटलें!

हिमालय हा महादेवाच्या सहवासाला शोभण्यासारखा म्हणजे 'महा' या नांवाला योग्य असाच एक पर्वत आहे. पण महादेवाच्या स्वभावाचेंहि त्याने थोडेंसें अनुकरण केलेलें आहे असें म्हणतां येईल. कारण हा पर्वत अजस्र व भयप्रद तर खराच; पण त्याच्या स्वभावरचनेंत भोळेपणाचें थोडें मार्दवहि आहे. सह्याद्रि पर्वताच्या काळ्याकभिन्न शिळांकडे पाहिलें म्हणजे निर्दयतेशिवाय दुसरी कल्पनाच येत नाही. हिमालयदेखील टणक आहे. पर्वतच तो! पण त्याच्या अंगावरील माती केवळ कोपरानेच नव्हे पण खोऱ्या-कुदळीच्या युक्तीने तरी अगदीच काढतां येणार नाही असें नाही असें पाहणाराला वाटतें. तसेंच सह्याद्रीपेक्षा याच्यावर वृक्षसंपत्ति कांही कमी नाही; पण सह्याद्रीच्या अंगाला चिकटून बसणाऱ्या व अतएव त्यावरील प्रवेश दुर्गम करणाऱ्या खुरट्या झाडोऱ्याची ती दाटी नव्हे. हिमालयाच्या अंगा-

वरचे वृक्ष पन्नास–पाऊणशें फूट सहज उंच असतात. पण जमिनीपासून दहावीस हातांवर त्यांच्या खांद्या फुटल्याने या झाडींतून मनुष्याला सुखाने वावरतां येतें. सह्याद्रीवरील झाडी पाहिली म्हणजे उन्हाळयांत उघड्या अंगाने बसलेल्या एखाद्या केंसाळ मनुष्याची आठवण होते. तीच हिमालयावरील झाडी पाहतां, अवचित पाऊस आल्याने डोक्यावर छत्र्या उघडून धरलेल्या प्रेक्षकांच्या जाहीर सभेची आठवण होते. हिमालयावरचा एकेकटा वृक्ष घेतला तरी त्याची उंची व त्याचा सरळ ताठपणा पाहून त्याच्याविषयी आदरच प्रकटतो. आणि कालिदासाने देवदाराचें वर्णन 'अमुं पुरः पश्यसि देवदारुं पुत्रीकृतोऽसौ वृषभध्वजेन' असें जें केलें तें शोभण्यासारखें आहे असें वाटतें.

हिमालयांत अनेक जातींचे पहाडी लोक आहेत. त्यांचीं पूर्वीं लहान लहान संस्थानें होतीं. १८०३ सालीं दिल्ली हस्तगत झाल्यावर इंग्रजांचा प्रवेश पंजाबच्या या कोपऱ्याकडे झाला. पहाडी संस्थानिकांना लढवय्ये व निर्दय गुरखे लोकांचा त्रास होऊं लागला. तो टाळावा म्हणून त्यांनी इंग्रजांची मदत मागितली. इंग्रजांनी नेपाळच्या युद्धांत गुरख्यांना आपल्या हद्दींत पिटाळून लावलें. हें कार्य झाल्यावर इंग्रजांनी पहाडी संस्थानिकांना त्यांचा बहुतेक मुलूख परत दिला. पण लष्करी दृष्टीने कांही नाक्याच्या जागा म्हणून आपल्या ताब्यांत ठेवल्या. तात्पर्य, 'इसापनीतीं'तील 'मनुष्य आणि घोडा' या गोष्टीची येथे पुनरावृत्ति होऊन साहेब जो एकदां सिमल्याच्या पहाडावर चढला तो कांही केल्या खाली उतरलाच नाही. परत दिलेल्या जागांतदेखील उंच उंच हवाशीर पठारें पाहून तेथे दुखणाईत लोकांकरितां झोपड्या व घरें बांधण्याची परवानगी त्याने मिळविली; व अखेर हीं लष्करी ठाणीं व पठारें मिळून सिमल्याची वस्ती बनली. सिमल्याच्या सात टेंकड्यांवर मिळून आज सुमारें नव्वद हजार वस्ती आहे; व सगळ्या हिंदुस्थानचा कारभार बारांपैकी सात महिने या पहाडावरून चालतो!

हल्ली सिमल्यावर चढून येण्याला मोटरी चालविण्यासारखा रस्ता व प्रत्यक्ष आगगाडीहि झाल्यामुळे दळणवळणाची कांही अडचण वाटत नाही. पण पहिले जे इंग्रज येथे आले त्यांना अमेरिकन वसाहतवाल्यांप्रमाणे धैर्य, काटकपणा व स्वावलंबन या गुणांचा फार उपयोग करावा लागला. १८१९

सालीं सिमल्यावर साहेबाची पहिली झोंपडी बांधली गेली. तेथपासून पुढे उन्हाळ्यांत चार दिवस व्हाइसरॉय व सेनापति यांनी नुसतें हवेखातर येथे येऊन राहावें असा प्रघात पडला. १८२७ मध्ये लॉर्ड आमहर्स्ट हे आपली खास कचेरी घेऊन सर्व उन्हाळाभर येथे राहिले. अखेर १८६४ सालीं ग. ज. लॉर्ड लॉरेन्स यांनी सिमला ही कायमची राजधानी बनविली. या शंभर वर्षांत सरकारी रीत्या त्या ठिकाणावर किती कोट रुपये खर्च झाले असतील याची कोणासहि सहज कल्पना करतां येईल. या राजधानींत सरकारच्या सर्व खात्यांच्या कचेऱ्या, दप्तर, छापखाना, लष्करी छावणी, बिनतारी व साधीं तारायंत्रें, लष्करी विमानें वगैरे सर्व कारखाने एप्रिलच्या प्रारंभापासून नोव्हेंबरच्या प्रारंभापर्यंत जोरांत चालू असतात. उरल्या पांच महिन्यांत सिमला योगनिद्रा घेतो.

एवढ्या सगळ्या हिंदुस्थानची राजधानी व ती एखाद्या पर्वतशिखरासारख्या अडचणीच्या जागेंत कां ! असा प्रश्न सहजच सुचतो. पण त्याचें उत्तर पूर्वीच्या इतिहासांत व परंपरेंत आहे. कंपनी सरकारचा राज्यसंपादनाचा उद्योग प्रथमतः उत्तर हिंदुस्थानांत झाला; व कलकत्त्याहून राजधानी बदलून दिल्लीस आली तरी वरील कारणांत कांही फरक झाला नाही. उलट कलकत्त्यापेक्षा दिल्लीला सिमला फारच जवळ, यामुळे ही सकारणता बळावली. नव्या दिल्लीची रचना व इमारती झाल्यापासून मात्र सिमल्याचें महत्त्व सरकारच्या मनांतून थोडें कमी झालें आहे. सर्व कचेऱ्या सात महिने येथे असतात त्या उठून बाराहि महिने दिल्लीस राहाव्या, व मुख्य मुलकी–लष्करी अधिकारी यांनीच वाटेल तर आपले खास नोकर व हस्तक बरोबर घेऊन उन्हाळ्यांत सिमल्यास राहावें,अशी नवी योजनाहि पुढेमागे होण्याचा संभव आहे; नाही असें नाही. पण आज तरी सात हजार मैल समुद्रापलीकडचा साहेब हिंदुस्थानांत येऊन सात हजार फूट उंचीच्या पहाडावर बसून राज्य करतो अशी विपरीत वस्तुस्थिति आहे खरी ! हवाखोरीची आवड, एकतंत्री राज्यसत्ता, परक्या लोकांचा मुबलक पैसा, इतके गुणदोष एकत्र झाल्यावर पर्वतावर तर पर्वतावर पण सुखाला लागेल अशी राजधानी इंग्रजांनी कां न करावी ?

मैदानांतून उठून पर्वतावर जाऊन राहण्याची कल्पना आपल्याकडेहि

नाही असें नाही. राजधानीचें ठिकाण ही उत्तम बचावाची जागा असावी अशी गरज पूर्वीच्या काळीं फार होती. याकरितां डोंगर नसेल तेथे भुईकोट किंवा गढी बांधीत, व डोंगर मिळाल्यास अर्थात् त्यावर राजधानी बसवीत. शिवाजीमहाराजांनी आपली राजधानी करण्याकरितां रायगडची जागा पसंत केली; ती किती उंच व बिकट आहे हें ज्यांनी ती प्रत्यक्ष पाहिली असेल त्यांच्या लक्षांत येईल. पण तो काळच तसा होता. उत्तर हिंदुस्थानांत रजपुतांनीदेखील सांपडेल तेथे डोंगराचा आश्रय करूनच राजधान्या बांधल्या आहेत. आपल्या देवस्थानांची गोष्टदेखील अशीच आहे. मैदानापेक्षां डोंगर–पर्वतावरच अधिक देव बसविलेले आढळतात. देवतानिवास हा एकान्तांत असला म्हणजे मुद्दाम उठून जाणाऱ्या भाविक यात्रेकरूंखेरीज इतरांतून त्याच्या पावित्र्याला उपसर्ग पोचत नाही. देवपूजा, जपजाप्य, योगसाधन करणारांना उंच व एकान्तांतील जागा फार अनुकूल असते. शिवाय देवाने सगुण रूप घेऊन संसार मांडला व दागदागिने केले, की त्यालाहि शत्रूची भीति उत्पन्न झालीच; याहीमुळे देव पर्वतांचा आश्रय करतात. दक्षिणेस व्यंकोबा, बालाजी, व उत्तरेकडे अबू-गिरिनार-विंध्यवासिनी येथील देवस्थानें लक्षात घेतलीं म्हणजे देवांनाहि पर्वतावरील प्रसन्नतेइतकी त्यांजपासून मिळणाऱ्या सुरक्षिततेची गरज होती असें सहज सिद्ध होतें.

पण इंग्रजांनी सिमल्यास राजधानी केली तिला वरच्यापैकी कोणतेंच कारण लागू पडत नाही सुरक्षितपणा म्हणावा तर सिमल्याला तटबंदी कोठेच नाही; उलट बिकट जागांतून वर सहज जातां यावें म्हणून वाटा, सडका किती तरी केल्या आहेत. एकान्तप्रियता म्हणावी तर कलकत्ता-मुंबई येथील सरकारी बंगल्यांना जितकी गर्दी दूर तितकी येथे नाही. मुख्य सडक अशी एकच म्हणजे मॉल रोड, आणि संध्याकाळीं किंवा दुपारीं पाहावें तों रावांबरोबर रंकहि येथे खांद्याला खांदा लावून हिंडलेले दिसतात. मुंबई–कलकत्ता येथे गाड्या, मोटरी असल्यामुळे गर्दींतदेखील श्रीमंताला संपर्क लागत नाही. येथे पहावें तो सगळ्या सिमल्यावर मुलकी लाट (व्हाइसरॉय), जंगी लाट (सेनापति), पतियाळाचे महाराज, व भोपाळच्या बेगमसाहेब, या चौघांखेरीज इतर कोणालाहि मोटर किंवा घोडागाडी वापरण्याची परवानगी नाही! यामुळे मॉलवरील अरुंद रस्त्यांत सगळ्या बड्या

अधिकाऱ्यांना पायानेच चालावें लागतें. एखाद दुसरा घोड्यावरून जातो. कांही थोडे रिक्शामधून जातात, पण बहुतेक पायीं जातात; यामुळे खांद्याला खांदा सहजच भिडतो. बरें, पवित्रपणा म्हणावा तर इंग्रजांनी येथे देव–देवळाची भानगड फारशी ठेवलेली नाही. आणि सामाजिक व्यवहारांत पाहावें तर शहरापेक्षाहि येथे ख्यालीखुशाली व तदनुषंगिक गोंधळ अधिक माजतो म्हणतात.

सिमल्याचा विस्तार सात टेकड्या मिळून सहा मैल लांबीचा आहे. त्या मानाने रुंदी फारच कमी भरेल. कोठे कोठे पर्वताच्या माथ्याचा सपाट भाग शंभर फूटदेखील रुंद नाही. या सहा टेकड्यांना आधारभूत असलेला मुख्य पर्वत घोडनालाच्या आकाराचा आहे त्याच्या मध्यभागीं दाट वस्ती असून इतर वस्ती टेकड्यांवर पसरलेली आहे. मुख्य वस्ती एकाच्या माथ्यावर एक, म्हणजे एकाने आपल्या पडवींत बसून दुसऱ्याच्या धुराड्यां-तून खालीं पाहावें अशी वसल्यासारखी दिसते. काळ्या लोकांची वस्ती ही बाजारपेठ व तीखालीं लागलेली वीस मजली घरांची उतरंड यांत सांठविलेली असून, सरकारी व युरोपियन लोकांचे खासगी मालकीचे बंगले बाजूच्या टेकड्यांवर पसरलेले आहेत. तथापि बाजूस झाले तरी महाबळेश्वरा-प्रमाणे येथे बंगल्यांना विस्तीर्ण कंपाउंड किंवा आवार नसतें. याचें कारण माथ्यावर सपाटी अशी फार कमी. स्वाभाविक मैदानी जागा नसल्याने घर–बंगला बांधणाराला प्रत्येक ठिकाणीं झाडें तोडून डोंगराची कड खोदून जागा साफ करून घ्यावी लागली आहे. कोणत्याहि एका घरांतून दुसऱ्या घरांत जावयाचें असल्यास चढलें तरी पाहिजे किंवा उतरलें तरी पाहिजे. अशा स्थितींत दळणवळण किती अवघड होत असेल याची कल्पना सहजच करतां येईल. लांब पल्ल्याला चौघांच्या खांद्यावरून जावें लागतें! पण मोठे गाडीरस्ते नसले तरी लहान सडका व पाऊलवाटा यांचा जणूं कांही नागमोडी मोक्षपटच पर्वताच्या सर्व अंगभर आंखल्यासारखा दिसतो. सिमल्याची इतकी वस्ती, पण कोणीहि कोणाजवळ असा राहत नाही असें यथार्थतेने म्हणतां येईल. कोणत्याहि वस्तीला पाण्याची सोय मुख्य लागते. ती सिमल्यास असावी तितकी नाही. या पहाडांत पाण्याचा सांठा फार होत नसावा असें वाटतें. कारण डोंगरकपारींतून निघालेला जिवंत वाहता

झरा असा येथे सहसा दिसत नाही. येथील म्युनिसिपालिटीने दुरून पाण्याचे नळ आणले आहेत. पण कित्येक बंगल्यांना पाणी बरेंच लांबून आणावें लागतें.

विजेची रोषणाई मात्र सिमल्याला भरपूर आहे. दुरून रात्रीं बड्या सिमल्याकडे पाहिलें म्हणजे हिरेमोत्यांचीं ताटेंच्या ताटें भरून तीं लीलेने वर उधळून द्यावीं असा दाट विखुरलेल्या विजेच्या दिव्यांचा लखलखाट दिसतो. आणि दूर बाजूच्या टेकड्यांवर पसरलेले तुरळक दिवे पाहिले, म्हणजे आपण एखाद्या मोठ्या बंदरांत उभे असून, समोर रात्रींच्या वेळीं समुद्रांत नांगरलेल्या शेंकडों आगबोटींचा काफिला पाहत आहों असा भास होतो ! तारायंत्री तारांच्या जाळ्यांचा विस्तार पाहिला म्हणजे बिनवापराच्या जागेंत कोळ्यांनी केलेल्या विणकामाची आठवण होते. एखादे वेळीं एखादें लष्करी विमानहि पहाडावर घिरट्या घालतें; तेव्हा खालच्या दरींतील चीड, देवदार वगैरे वृक्षांच्या झाडींत नव्या फुलांवर मधाकरिता घोंगावणाऱ्या भुंग्यांच्या गुंजारवाचा प्रतिध्वनीच आपण आकाशांत ऐकत आहों की काय असें वाटतें. तथापि, अजूनहि सिमला सगळाच कांही नवाळला नाही ! त्याच्या जुनाट परंपरेचा धागा अजूनहि शिल्लक आहे. कारण पहाटेच्या वेळीं ' कार्ट रोड 'वरून लमाणी खेचरांचे तांडे वर घाट चढून येतात तेव्हा त्यांच्या गळ्यांतील घंटा, आपल्या गोड आवाजाने जुनी परिचित रागदारी गाऊन साखरझोंप घेणाऱ्या आळशी मनुष्याला जागें करून उषःकालाची वर्दी देत असतात. अजूनहि माल देऊन माल विकत घेणारे म्हणजे अडाणी तिबेटी लोक हिमालयांतून येऊन आश्चर्यचकित मुद्रेने सिमल्याच्या बाजाराकडे पाहत उभे राहतात. अजूनहि आपलें सगळें अंग नखशिखान्त झांकून घेणाऱ्या पहाडी स्त्रिया, अर्धें वक्षस्थळ उघडें टाकून फिरणाऱ्या गोऱ्या युरोपियन बायांकडे भिऱ्या दृष्टीने पण तिरस्कारयुक्त मुद्रेने पाहत जात असतात. अजूनहि एखादा जंगली गुराखी पहाडाच्या माथ्यावर बसून जुन्या पद्धतीने अलगुज वाजवून खालचें दरीखोरें मधुर आवाजाने भारून टाकतो.

सिमल्यास सुमारे नव्वद हजार वस्ती आहे म्हणून सांगितलें. पण ती उन्हाळी वस्ती होय. ऐन हिवाळ्यांत जेव्हा सरकारी कचेऱ्या येथून खाली

जातात व चोहोंकडे बर्फ पडतें तेव्हा ही वस्ती चवथ्या हिश्श्याची राहते,बाकीची खाली निघून जाते. घरधन्यापेक्षा पाहुण्यांचीच गर्दी अधिक, अशांतला तेथील कायम वस्तीचा प्रकार आहे. आणि उन्हाळी वस्तींतदेखील उद्योगी मधमाशीपेक्षा गुल्हौशी फुलपांखरेंच अधिक ! सरकारी पेट्या, कागदाचीं पुडकीं, पट्टेवाल्यांची गर्दी हें सर्व पाहून येथे चालणाऱ्या कामकाजाची कल्पना येते ती कांही अगदींच खोटी नसते. पण रस्त्यांत भेटणाऱ्यांपैकी खऱ्या कामांत गढलेल्या अशा एका माणसागणिक दोन माणसें ख्याली-खुशालीच्या ढंगांत असतात असें म्हटल्यास फारशी चूक होणार नाही. सरकारी कचेऱ्या येथून हालल्या म्हणजे मग येथील कायम रहिवासी पहाडी लोक व नेपाळ-तिबेटाकडून येणारे फेरीवाले यांच्या स्वाधीन सगळा सिमला होतो. या दोन जातींचे लोक पाहतांच वेगळे म्हणून ओळखतां येतात. पहाडी मनुष्य हा अर्धशुभ्र, नाकाडोळ्यांनी तरतरीत, व ठेवणीने किंचित् छलकाटा असा असतो; आणि तिबेटी वगैरे प्रायः नकटे, खुजे, कुरूप, घाणेरडे पण मोठे बळकट असे असतात. हातगाड्या वगैरे ओढण्याचें काम पहाडी लोक करतात. पण पल्लेदार मजलीवरचें किंवा भारी ओझें वाहण्याचें काम हे दुसऱ्या प्रकारचे लोक करतात. आमचे घाटी लोक खंबीर खरे, पण हे तिबेटी मोठीं ओझीं पाठीवर घेऊन उंचवट्यावरून खुशाल चढून गेलेले पाहिले म्हणजे आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही. या कायम रहिवाश्याच्या यादींत सिमल्यावरील माकडाचाहि समावेश केल्यास चूक होणार नाही ! कारण त्यांची वस्ती तशीच जुनाट व कायम आहे. माणसांबरोबर माकडांचा उल्लेख केल्यास मनुष्यजातीचा अपमान केलासा वाटेल, पण तसें वाटण्याचें कारण नाही. किपलिंगने आपल्या एका कवितेंत सिमल्यावरील माकडांना विशिष्ट प्रकारच्या युरोपियन लोकांपेक्षा अधिक मान दिला आहे. या कवितेचे दोन चरण असे आहेत :

"Artful Bunder, who, never in his life,
Flirted at Peliti's with another's wife."

या कवितेमध्ये 'पेलिटी'सारख्या श्रीमंती थाटाच्या हॉटेलांत फॅशनेबल व स्वैर लोकांकडून घातल्या जाणाऱ्या गोंधळावर कवीने कोरडा उडविला आहे.

सिमल्यावर सरकारने हिंदी प्रजेचे कोटयवधि रुपये पाण्यासारखे नासले व वर्षांतून सात महिने सगळ्या सरकारी कारभाराचा आखाडा सिमल्यावर ठेवला, यामुळे दर वर्षी लक्षावधि रुपयांचा व्यर्थ चुराडा होतो हें तर झालेंच; पण इंग्रज लोकांच्या दृष्टीनेंहि पाहतां त्यांना सिमल्याची कीर्ति फारशी प्रिय नाही. येथील समाजरचनेला असेंच कांही फाजील कृत्रिम स्वरूप आलेलें आहे की, तें सुजाण इंग्रजांना फारसें पसंत पडत नाही. 'रोग्यांना प्रकृति सुधारण्याची जागा' असें जोंपर्यंत सिमल्याला स्वरूप होतें तोंपर्यंत सर्वांना तें पसंत होतें. पण सगळा कारभाराच्या कारभारच उचलून पर्वतावर नेण्यांत आला, तेव्हा खुद्द इंग्रजांनीहि त्याबद्दल तक्रार केली. १८५१ सालच्या 'दिल्ली स्केचबुक' नामक विनोदी पत्रांत या विषयावर फार चुरचुरीत टीका आलेली आढळली. ती अशी– "पंजाबचा अंतस्थ मुलूख पाहण्याकरितां मुलकी लाट सिमल्याला गेला. मुलकी लाट गेल्यावर त्याच्या संरक्षणाला जंगी लाटाला जाणेंच आलें! येवढे वरिष्ठ गेल्यावर कनिष्ठांचें कर्तव्य म्हणून लेफ्टनंट गव्हर्नर गेला. कमिशनर म्हणाला, पर्वतावर जायचें म्हणजे कोण त्रास? पण कर्तव्य हें केलेंच पाहिजे, म्हणून तो गेला. इतके अधिकारी वर गेल्यावर त्यांच्या टपालाची व्यवस्था करण्यास पोस्टमास्तर जनरलला जावेंच लागलें. मग कोणी या सर्वांचा बंदोबस्त ठेवण्याला म्हणून गेले, कोणी सरकारी काम उकरून काढून गेले, कोणी बढती मागण्याला म्हणून गेले. कोणी रजेचा रिकामपणा म्हणून गेले, कोणी आजाराचें निमित्त करून गेले. कोणी पुढचा आजार वांचवावा म्हणून गेले. कोणी स्वतःच्या करमणुकीला गेले. कोणी दुसऱ्याच्या करमणुकीला गेले. कोणी सुंदर बायका लग्नाला मिळवावयाला गेले. कोणी आपल्या सुंदर बायका लोकांना दिमाखाने दाखवायला गेले. मुलें असलेल्या बायका मुलांच्या प्रकृतीकरितां गेल्या. मुलें नसलेल्या बायका रिकाम्या म्हणून गेल्या. आणि कित्येक आपल्या नवऱ्याच्या बढतीच्या किंवा बदलीच्या खटपटीकरितां म्हणून गेल्या. मिळून सगळे गेले. ज्यांना यापैकी कांहीच निमित्त मिळेना तेवढे मात्र राहिले!"

'लंडन टाइम्स'चा बातमीदार डॉ. रसेल सिमल्यास १८५८ त आला होता. तो लिहितो, 'मला आजारांत बरीच करमणूक आहे, येथे माकडें–

वानरें पुष्कळ आहेत. त्यांच्याकडे पाहून कंटाळा आला म्हणजे सहल करण्यास जाणाऱ्या इंग्रज स्त्री–पुरुषांकडे पाहतों. दोघांच्याहि चेष्टा पाहण्यासारख्या असतात; आणि करमणूक सारखीच होते. इतर कित्येकांनी येथे चालणाऱ्या बेसुमार जुगारीचें वर्णन केलेलें आढळतें. येथे मुलकी अधिकाऱ्यांना कांही तरी काम असतें; पण लष्करी अधिकारी रिकामटेकडे असून फारच गोंधळ घालतात. नाच, वनभोजनें, शर्यती यांची मारे गर्दी उडते. १८७३ सालीं अँड्र्यू विल्सन नामक ग्रंथकार लिहितो, "सिमल्याचें नांव इतकें बदनाम झालें आहे की, एखादा स्टेट सेक्रेटरी हें ठाणें येथून हालवील तर फार बरें." जागा लहान, लोक पुष्कळ जमतात, बरेचसे रिकामे असतात. आणि वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करण्याला येथे सामाजिक ख्यालीखुशालीशिवाय दुसरें फारसें कांही नसतें. यामुळे हें बदनाम होतें हीहि गोष्ट कांही खोटी नाही. लॉर्ड लिटन यांच्या वेळीं सिमल्याच्या या अपकीर्तीचा कळस झाला होता असें म्हणतात. साम्राज्याभिमानी लेखक रुडयार्ड किपलिंग याने 'Plain tales from the hills' नामक पुस्तकांत या अपकीर्तीला पोषक असेंच सिमल्याचें चित्र काढलें आहे. पण या गोष्टी जुन्याच नसून सिमल्यास इंग्रजांचा सामाजिक क्रम आहे तसाच चालू आहे. एक विनोदी रहिवासी परवां 'जाक्को' नामक टेकडीसंबंधाने बोलतांना म्हणाला, "जाक्को हा शब्द 'यक्ष' शब्दाचा अपभ्रंश आहे. जुन्या काळीं खरेखुरे यक्षगंधर्व या पर्वतावर उतरून क्रीडा करीत असतील ही समजूत खरी असो वा खोटी असो, पण आधुनिक युगांतले हे गोरे सुपरमन यक्षगंधर्वच होत; कारण त्यांच्या क्रीडा येथे पूर्वीसारख्याच हल्लीहि चालतात." या 'जाक्को' पर्वतावर मारुतीचें एक जुनाट देवालय आहे. हा मारुती श्रीरामदासांनी येथे स्थापला अशी कांही हिंदु रहिवाशांची समजूत आहे. या मारुतीला उद्देशून हा विनोदी रहिवासी म्हणाला, "हा मारुती मात्र नवसाला पावतो असा इंग्रजांनी लिहिलेल्या ग्रंथान्तरींहि आधार आहे." मी म्हणालों, "नवसाला पावतो कशावरून?" तो म्हणाला, "जाक्को पर्वताभोंवतीं अल्प परिचित अशाहि अविवाहित इंग्रज युवयुवतींनी एकदा प्रदक्षिणा पुरी घातली की प्रायः लगेच त्यांचे विवाह होतात! आमच्या 'यक्ष पर्वता'वरील

मारुती स्वतः ब्रह्मचारी आहे खरा, पण त्याला गौरकाय यक्षयक्षिणींचीं लग्नें लावण्याची फार हौस वाटते !" सारांश, सिमला हें जसें हिंदुस्थानांतल्या राजकारभाराचें केंद्र आहे तसेंच तें हिंदुस्थानांतल्या इंग्रज समाजासाठी लग्नाच्या सौद्यांची मुख्य बाजारपेठ आहे असें म्हणणेंहि वावगें होणार नाही !

---

## विष्णु सखाराम खांडेकर ( जन्म १८९८ )

चालू पिढींतील थोर कादंबरीकार, लघुकथालेखक, निबंधकार, टीकाकार, व चित्रपटकथा-लेखक अशा विविध भूमिकांनी खांडेकर सर्वप्रसिद्ध आहेत. किंबहुना या उपरोक्त क्षेत्रांत कळत नकळत आपण 'फडके-खांडेकर' या जोडीचा उल्लेख करीत असतों. प्रा. फडके यांनी जरी मराठी गद्याला प्रासादिक व मधुर रूप आणून दिलें असलें तरी मराठी गद्याला अलंकार-प्रचुर व जीवननिष्ठ करण्याचें श्रेय खांडेकरांचेंच !

जीवनाशी फारकत करून स्वप्नरंजनांत रममाण होणाऱ्या आणि कला-वादांतच दंग झालेल्या साहित्यकलेला खांडेकरांनी जीवनोन्मुख बनविलें. कलेच्या भोवतीं उभारलेल्या सांप्रदायिक व सांकेतिक भिंती पाडून 'कला व शुद्ध जीवना'चा संयोग घडवून देण्याचा मंत्र प्रथम दिला खांडेकरांनीच ! आत्मनिष्ठ लघुनिबंधाला आत्मकेंद्रित व आत्मचरित्रपर न ठेवतां उदात्तमय करण्यांत खांडेकरांनी चांगलेंच यश संपादन केलें. त्यांच्या लघुनिबंधांत ते मित्राच्या भूमिकेने रसाळपणाने गप्पा मारीत असतांनाच, त्यांच्या गप्पांच्या ऐन भरांत वाचकांना त्यांच्या अनुभवसंपदेची व त्यांतून बाहेर पडणाऱ्या जीवनविषयक तत्त्वांची नकळत साक्ष पटेल; संकुचित राष्ट्रवाद किंवा धर्मकल्पना यांना धक्के देणाऱ्या त्यांच्या वृत्तीचें कौतुक वाटेल; आणि क्षुल्लक विषयांतूनहि जीवनवाद व मानवधर्म यांचे धागे उलगडून दाख-

विणाऱ्या त्यांच्या रचनाकौशल्याचा आनंद होईल. ऐन पंचविशींत अलंकाराच्या आतषबाजीने झळकणारी त्यांची भाषासुंदरी आता पोक्त बनून विचारगंभीर बनलेली आढळेल.—पण या गांभीर्याने फसूं नका की दबकून जाऊं नका. कारण पोक्त गांभीर्यांतूनहि एखादा कोटिक्रम व विनोद तुमच्या प्रत्ययास येईल. एका जीवननिष्ठ स्नेह्याच्या काव्यशास्त्रविनोदाच्या लकेरींनी, वासंतिक वायुलहरीच्या सुखद स्पर्शाने पुलकित व्हाल, त्यांच्या संकेतावरील उपहासपूर्ण विवेचनाने तुम्ही विचारी व्हाल, आणि एक लाखाचें बक्षीस न मिळतांहि मिळाल्यासारखे आनंदी व्हाल.

पंचमहाभूतांच्यां संसारांत आकाश व पृथ्वी या दंपतीला तेज, जल व वायु अशीं तीन बाळें झालीं. पण या तिन्ही भावंडांचे स्वभाव किती भिन्न! तेजाला बापाचाच फार लळा; आकाशाच्या हातून पृथ्वीच्या मांडीवर या हसऱ्या बालकाची स्थापना होते तेव्हा क्षणभर आईचा चेहरा आनंदाने फुलून जातो अगदी. पण थोडा वेळ दोघांचा सहवास होऊं दे. आईच्या रूपांतील व वेशभूषेंतील वैगुण्याकडेच नकळत बाळ बोटें दाखवूं लागतें. मातृपद आलें म्हणून स्त्रीहृदय कांहीं बधिर होत नाही. तेजाच्या या व्रात्य-पणामुळे पृथ्वीच्या अंगाची लाही होऊं लागते नुसती. अशा वेळीं जलदेवी आणि वायुकुमार यांच्या लाडक्या लीलांचा केवढा विरंगुळा वाटतो तिला!

जलदेवीला आकाशापेक्षा पृथ्वीचा अधिक लळा आहे यांत शंका नाही. पण तिचें पाऊल एका जागीं स्थिर रहायचेंच नाही! अष्टौप्रहर एकसारखी धावपळ सुरू! तिच्या अवखळ लीला पाहून पृथ्वीच्या अंगावर आनंदाचे रोमांच उभे राहतात. तिची गोड गुणगुण आणि नाचरे हावभाव यांनी तर पृथ्वीमाता वेडी होऊन जाते मनांत! माझ्या बाळीला कुठे ठेवूं असें होऊन जातें तिला. प्रिय वस्तूला हृदयांत जपून ठेवण्याच्या गोष्टी मनुष्य आलंकारिक दृष्टीने बोलूं शकतो, पण पृथ्वी ते उद्‌गार आचरणांत आणून दाखविते. मात्र पोरीवर इतकें प्रेम असूनहि पृथ्वी तिला वारंवार उचलून आकाशाच्या स्वाधीन करीत असते. घरोघरहि हाच अनुभव येतो, नाही का? मूल कितीहि लाडकें झालें म्हणून गृहिणीला त्याच्याशीं सारा वेळ थोडेंच खेळत बसतां येतें! 'ऐकलं का? जरा घ्यायचं होतं बाळाला' असे उद्‌गार 'तिकडे' ऐकूं जातील अशा बेताने प्रत्येक घरीं निघत असतात! पृथ्वी झाली तरी दुसरें काय करते? चंद्राची नाव करून, तारकांचीं फुलें तोडून, आणि सकाळ-संध्याकाळ रंगपंचमीचा खेळ खेळून जलदेवीला खेळविण्यांत आकाशाचा वेळ केव्हा निघून जातो हें सांगतांहि येत नाही! पण मध्येच तिला आईची

आठवण होते. बापाच्या खांद्यावरून ती हळूच खाली उडी टाकते आणि दुड्डुडु धावत येऊन आईच्या कुशींत शिरते.

पण वाऱ्याचें सारेंच तंत्र निराळें! स्वारी एका क्षणीं बापाच्या कंबरेला विळखा घालील तर दुसऱ्या क्षणीं आईच्या गळयांत पडेल. केव्हा चोरट्या पावलांनी येऊन आईला गुदगुल्या करील तर केव्हा आरडत ओरडत बापाला भिवविण्याकरितां धाव घेईल. कुणाच्या आवाजाची नक्कल त्याला करतां येत नाही असें नाहीच. आता 'रानारानांत गेली बाई' अशी शीळ घालील, तर लगेच सर्कशींतल्या सिंहाच्या गर्जनेची आठवण करून देईल. झाडांच्या पानांचा खुळखुळा करून वाजविण्यांत स्वारी जेवढी पटाईत तेवढीच विमानाचा पतंग करून तो उंच उडविण्यांतहि तरबेज. गलबताच्या शिडांच्या पोटांत शिरून स्वारीने गोष्टींना सुरुवात केली म्हणजे मैलच्या मैल केव्हा मागे पडतात हें कळायचेंसुद्धा नाही. स्वभाव जितका खेळकर तितकाच चतुर. नकळत डोळयांतलें काजळ काढून घेणारीं माणसें असतात ना, अगदी तस्सा. बागेंतल्या कळयांशी कानगोष्टी करतां करतां त्यांचा सुगंध हा हळूच कसा संपादन करतो हें सांगतां येईल का कुणाला? इतकें असून आपलपोटेपणा मात्र तिळभरदेखील नाही आढळायचा! सुगंध मिळविला की झाली लगेच त्याच्या उधळपट्टीला सुरुवात! अशा गुणी-बाळाला दृष्ट लागूं नये म्हणून सृष्टिदेवीने एक गालबोट मात्र लावून ठेवलें आहे त्याला. कळयांनासुद्धा दुखवायचें नाही इतका मूळचा हळवा स्वभाव. पण एकदा संताप आला की मोठमोठीं झाडेंसुद्धा मुळासकट उप-टून टाकायला कमी करीत नाही स्वारी. जलपृष्ठावरून नाजुकपणाने बोटें फिरविण्यांत केवढी कुशलता! जणु कांही संगीतज्ञ जलतरंग वाजवीत आहे असाच श्रोत्यांना भास व्हावा. पण कुठल्या तरी कारणाने राग येऊन ही बैठक उधळण्याची लहर आली म्हणजे मग मात्र बघायला नको. वाद्यांचे तुकडेसुद्धा लागायचे नाहीत हातीं!

खरें सांगायचें तर या लहरीपणामुळेच वारा अधिक आवडतो मला. तेजाचें सारें काम अगदी यंत्रासारखें—जलदेवी थोडीफार लहरी आहे खरी! पण अफाट समुद्रांतील तिच्या लहरींतसुद्धा सीमा असतेच की! वायु-लहरींचें तसें नाही. त्या आता कानगोष्टी करतील, तर आता कानशिलांत

लगावतील. वायुकुमार घटकेंत जलदेवीच्या खेळण्यांतील गुलाबदाणी आणून तिच्यांतील सुवासिक शीतल तुषार अंगावर उडवील तर दुसऱ्या घटकेला तेजाच्या हातांतील ऊन पाण्याची झारी अंगावर ओतून चांगले चटकेहि देईल. तुम्ही दार घट्ट लावून लेखनाला बसा अगर चार दिवसांत एकान्तांत गांठ न पडलेल्या पत्नीच्या गालावरील गुलाब कां सुकले आहेत याचें पांच मिनिटांत संशोधन करायला सुरुवात करा, तुमच्या बंदिस्त दरवाजाचें दार वाजूं लागतें. त्रासून दार उघडायला जावें तों काय? दार ठोठावून वाऱ्याची स्वारी केव्हाच निघून गेलेली असते. उन्हाळ्यांत कांही तरी गारगार हवेंसें होतें त्या वेळीं उष्णता घेऊन येणारा, आणि हिंवाळ्यांत उबेसाठी शरीर उत्सुक होतें त्या वेळीं गारवा आणणारा वारा विनोदी आहे यांत शंकाच नाही. पण लहरीपणाच्या गुणामुळे विनोदाइतकीच काव्याची स्फूर्तीहि त्याला होऊं शकते. वसंतऋतूंतील रम्य सायंकाळीं कोकिळेच्या संगतीला मधुर ताल धरणारा त्याच्याखेरीज दुसरा कोण आहे? मेघांच्या पालखींतून मिरवत आणि विजेच्या चवऱ्या ढाळून घेत वर्षादेवी ज्या वेळीं पृथ्वीवर उतरूं लागते त्या वेळीं तिच्या आगमनाची द्वाही वाराच फिरवीत नाही का? एखाद्या लहान बालकाने पाळण्यांतल्या आपल्या धाकट्या भावंडाला लाडकेपणाने कुरवाळावें त्याप्रमाणे शेतांतल्या हांसऱ्या कणसांना वारा प्रेमाने कुसकरूं लागला म्हणजे तें दृश्य किती हृदयंगम दिसतें! आणि जानेवारी महिन्यांत झाडांच्या पिकलेल्या पानांवर जेव्हा त्याची संक्रान्त वळते तेव्हा तर ल्यूथर अगर आगरकरांसारखा तेजस्वी समाजसुधारक अवतरल्याचाच भास होतो. 'Ode to the west wind' नैर्ऋत्येकडला वारा, वातचक्र इत्यादि कवितांत विविध वायुलहरींचें जें गुणगान केलें आहे तें केवळ काल्पनिक आहे असें कोण म्हणेल?

वाऱ्याचा लहरीपणा त्याच्या प्रतिभेमुळे शोभून जातो. तो श्रीमंताचा लहरीपणा नाही, तर कवीचा लहरीपणा आहे. असा स्फूर्तिदायक लहरीपणा हा मानवी जीवनांतला महत्त्वाचा भाग आहे असें मला वाटतें. वर्षानुवर्षें संध्याकाळीं पांच ते सात ज्यांचें फिरणें चुकलें नाही असे रावसाहेब, रावबहादुर पुष्कळांना ठाऊक असतील. थंडीच्या दिवसांत सात वाजतां अंधार पडतो म्हणून ते सदीप गड्यासह फिरायला जातील. मीहि संध्याकाळीं

फिरायला जातों. पण वर्षाऋतूच्या शेवटीं संध्यादेवी आपल्या चित्रकलेचें प्रदर्शन उघडते तेव्हा, आणि उन्हाळ्यांत शुक्ल पक्षांतलें चांदणें मूकसंगीताने वातावरण मुग्ध करून सोडतें तेव्हा मनगटावरल्या घड्याळाकडे पाहायचें-सुद्धा भान राहत नाही मला! घड्याळाला भावना असत्या तर अशा काव्यमय प्रसंगीं त्याचे काटेसुद्धां चालायचे थांबले असते असें वाटूं लागतें. जागरण प्रकृतीला चांगलें नाही हें आरोग्यशास्त्राचें प्राथमिक पुस्तक वाचून (किंबहुना न वाचतांहि) कळण्याजोगें आहे. पण कोजागिरी पौर्णिमा, हिरा-बाईचें गाणें, जिवलग मित्रांची गप्पाष्टकांची बैठक, अगर एखाद्या नवीन लघुकथेचें संविधानक यांचा मोह दूर झुगारून बरोबर दहा वाजतां घोरायला लागण्याने आपण जगाची प्रगति करूं शकतों असें कुणी म्हणेल तर त्याच्या-वर काडीचाहि विश्वास बसणार नाही माझा! ठराविक वेळीं ठराविक रस्त्याने फिरावयास जाणारीं माणसें पाहिलीं म्हणजे सक्तमजुरीच्या कैद्यांची आठवण होते मला! मनुष्य हें ब्रह्मदेवाने नियमितपणाबद्दल जन्माची गॅरंटी दिलेलें घड्याळ आहे की जगाच्या तुरुंगांतील जन्मठेपीची शिक्षा झालेला कैदी आहे? त्याला थोडें तरी स्वातंत्र्य नको का? हें स्वातंत्र्य स्फूर्तिजन्य लहरीपणानेच अधिक व्यक्त होतें असें मला वाटतें. एकादशीदिवशीं पुष्कळ भाविक मंडळी उपास करीत असतील. पण लहर लागेल त्या दिवशीं उपास करण्यांत काय गंमत आहे ती माझ्यासारख्यालाच ठाऊक. सध्या उघड्या माथ्याने फिरण्याची चाल तरुणांत सर्रास रुढ होत आहे. पण डोक्याला टोपी घालून घरांतून बाहेर पडणें आणि मग टोपी हातांत घेऊन आपल्या शिरावरला भार वाटेल तेव्हा हलका करणें हेंच मला तरी अधिक आवडतें. परवा आमच्या घरीं एक पाहुणे मला भेटण्याकरितां आले. पूर्वी कधीच पाहिलें नव्हतें त्यांनी मला. उभ्या दिवसांत मी बायकोशीं एक शब्दहि बोललों नाही असें पाहून परत गेल्यावर त्यांनी माझ्या एका मित्राला मोठया कळवळ्याने लिहिलें, "भाऊरावांचें चित्त कांही ठिकाणा-वर दिसत नाही! जेवावयाच्या वेळींसुद्धा गृहस्थ बोलला नाही बायकोशीं. बडोद्याला सहा महिने राहून घटस्फोट करण्याचा विचार त्यांच्या मनांत आला नसला म्हणजे मिळाविली." गरीब बिचारा चोवीस तासांचा पाहुणा! तो येण्यापूर्वी तीन दिवस मी बोलून बोलून बायकोचे कान किटाविले होते हें

त्याच्या गांवीं कुठून असणार? रेलवेच्या टाइम-टेबलांतल्या गाड्यांप्रमाणे अगर शाळेच्या वेळापत्रकांतल्या तासांप्रमाणे प्रेमाच्या गोष्टीहि वेळच्या वेळींच पार पाडल्या पाहिजेत अशीहि त्याची समजूत असेल कदाचित्! तरी बरें; आम्हां पति-पत्नींतील लटके खटके त्याच्या दृष्टीला पडले नाहीत. नाही तर त्याने माझ्या सासऱ्यांना जरूरीची तारच ठोकली असती एकदम. बुंदीच्या लाडवांची जिभेला मिठी बसूं नये म्हणून मठ्ठा पंक्तींत वाढायला आणला तर असले गृहस्थ लाडू संपल्याची ओरड करावयाचे! असल्या गृहस्थांना उपदेश करण्यापेक्षा थोडा वारा प्यायला सांगितलेलें बरें नाही का? नावीन्याशिवाय जीवनाला गोडी नाही; आणि जुनें नाहीसें न करतां त्याला नवीन स्वरूप देण्याची किमया वायुलहरीइतकी दुसऱ्या कुणालाच साधायची नाही. 'The old order changeth yielding place to new' ही उक्ति क्षणोक्षणीं कुठे खरी होत असेल तर ती वातावरणांतच!

यामुळे वाऱ्याची निंदा करणाऱ्या म्हणी अगर संप्रदाय कानावर पडले की मला हसूं आल्यावांचून राहत नाही. काय म्हणे वारा येईल तशी पाठ फिरवावी! एखाद्या मनुष्याने हा उपदेश अक्षरशः अंमलांत आणण्याचा निश्चय केला तर लोकांना तो झिंगला आहे असे वाटल्यावांचून राहणार नाही. 'वराती'ला हपापलेल्या तरुणांना ती वाऱ्यावरली होऊं नये एवढीच काय ती इच्छा असते. वायुलहरी प्रणयी दंपतींच्या मीलनाकरिता किती धडपडत असतात याची कल्पनाच येत नाही त्यांना! पण वाऱ्याने विरोध केला असता तर मेघदूताला अलका गांठून यक्षाचा काव्यमय निरोप त्याच्या वल्लभेला पोचवितां तरी आला असता का? 'नवें वारें' हा शब्दप्रयोग तर शिवीसारखाच वापरतात पुष्कळ लोक! बिचाऱ्यांच्या हेंहि लक्षांत येत नाही की जगांत जुनें वारेंच नसतें. प्रत्येक क्षणाला वातावरणांत नवें वारें उत्पन्न होत असतें. आणि त्याचें हें नावीन्य म्हणजे रमणीयतेचा मूर्तिमंत अवतारच! 'क्षणेक्षणे यन्नवतामुपैति तदेव रूपं रमणीयतायाः' हें वचन वायुलहरींच्याइतकें दुसऱ्या कुणाच्याच बाबतींत सार्थ ठरणें शक्य नाही.

---

# संकेत : : १४

अगदी चवताळून उठलों मी अंथरुणावरून! डोळ्याला डोळा लागला नाही तों कुठल्याशा भुंग्याने माझ्या खोलींत प्रवेश करून आपली घरघर सुरू केली होती! भुंग्याच्या आवाजाला 'गुंजारव' म्हणून पहिल्यांदा संबोधणारा कवि बराचसा बहिरा असला पाहिजे अशी माझी खात्री होऊन गेली. माझ्या मच्छरदाणीवर येऊन जेव्हा त्याने आपलें गायन सुरू केलें तेव्हा मला तर विमानच खाली उतरूं लागल्याचा भास झाला.

माझे डोळे अगदी पेंगळून गेले होते—आणि हा गांवठी ग्रामोफोन बंद होण्याचें तर कांहीच लक्षण दिसेना! ताड्कन् उठलों, केरसुणी पैदा केली, आणि भृंगराजांचा पाठलाग करून त्यांना यमसदनाला पाठवून दिलें! आता शान्त झोप येईल या आशेने अंथरुणावर मीं अंग टाकिलें. पण निद्रा ही प्रीति आणि कीर्ति यांची सख्खी बहीण आहे. अगदी मुलखाची लहरी! मीं पाठशिवणीचा खेळ खेळूं लागतांच तिने लपंडावाचा आश्रय केला.

या कुशीवरून त्या कुशीवर होतांना एकदम त्या मघाच्या भुंग्याची मला आठवण झाली. वाटलें, त्या बिचाऱ्याला उगीच मारलें मी! त्यापेक्षा मीच कानांत कापसाचे बोळे घालून निजलों असतों तर निदान अहिंसाव्रताचें पालन केल्याचें श्रेय तरी मला मिळालें असतें. मीं भुंग्याला मारलें ही एकच गोष्ट काव्याला ओहोटी लागली आहे हें सिद्ध करायला उद्या पुरी होईल. एवढा शूर दुष्यंत राजा! पण शकुंतलेला त्रास देणाऱ्या भुंग्याला मारावयाला कांही त्याचा हात धजला नाही! उलट दुष्यंताचें शिफारसपत्र घेऊन तो भुंगा कुठेहि गेला असता तरी त्याला सहज नोकरी मिळाली असती. कारण प्रसंगीं इंद्राच्याहि साहाय्याला जाणारा पराक्रमी दुष्यंत त्याला अशी शरणचिठ्ठी लिहून देतो—

**'वीरा भ्रमरा, जन्मुनि सार्थक केलें तूं या जगीं।**
**बसलों विचारांत आम्हि उगी॥'**

कदाचित् माझ्या खोलींत आलेला भुंगा दुष्यंताच्या कृपेने कण्वाच्या आश्रमांत जिवंत राहिलेला भुंग्याचाच औरस अगर दत्तक वंशज नसेल कशावरून? दुष्यंताचीच गोष्ट कशाला हवी? सारें संस्कृत काव्यवाङ्मयच पाहावें. भुंग्यांच्या विपुल उल्लेखावरून त्याला उद्यानाची उपमा देण्याचा मोह कुणालाहि होईल. बरें, शपथेला एका श्लोकांत तरी भुंगा त्रासदायक असतो असें एखाद्या कवीने म्हणायचें होतें! छे! झाडून साऱ्या संस्कृत कवींचें या भुंग्यावर अगदी अंधप्रेमच असावें!

**रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातम्**
**भास्वान् उदेष्यति हसिष्यति चक्रवाकम्**
**कोशंगते मनसि चिन्तयति द्विरेफे**
**हा हन्त हन्त नलिनीं गजमुज्जहार!॥**

हा श्लोकच पाहा ना! कमळ संध्याकाळीं मिटतें हें काय कमलिनींत अडकलेल्या या श्लोकांतल्या भुंग्याला ठाऊक नव्हतें? दिवस मावळला तरी हा मूर्ख राहिला कशाला तिथे? 'मोहाचा परिणाम असाच सर्वनाशांत व्हायचा' असें कांही तरी सनातन तात्पर्य या भुंग्याच्या उदाहरणावरून निघत असतांना, या श्लोककाराने त्याला अगदी हुतात्मा करून टाकलें आहे! तुरुंगांतून बाहेर सुटणाऱ्या चोराचें देशभक्त म्हणून स्वागत व्हावें अशांतलाच हा प्रकार नाही का?

विक्रमोर्वशीयांत ऊर्वशीच्या विरहाने वेडा झालेला राजा भुंग्याला तिची माहिती विचारतो तीसुद्धा किती अदबीने! हंसाला तो म्हणतो, 'हंस प्रयच्छ मे कान्ता.' पण भुंगा दिसतांच स्वारी नरमते. 'मधुकर मदिराक्ष्याः शंस तस्याः प्रवृत्तिम्।' आणि म्हणे, 'तूं तिला पाहिली असतीस तर या कमळावर तूं आसक्तच झाला नसतास.' तिसरा एक कवि भुंग्याला म्हणतो—

**अपसर मधुकर दूरं परिमलबहलेऽपि केतकीगन्धे।**
**इह नहि मधुलवलाभोऽस्ति—।**

पाहा, आधी सुगंधी केवडयाची निंदा, आणि ती एका काळ्या कर्णकटु आवाज करणाऱ्या विचित्र प्राण्याकरितां! फौजदारी वकीलसुद्धा अशी

गोष्ट करायला तयार व्हायचा नाही! आणि या कवींनी—भावनेचा टेंभा मिरवणाऱ्या या प्रतिभावंतांनी—भिकारड्या भुंग्यावर पदोपदीं स्तुतिसुमनें वाहावींत! बिचाऱ्यांच्या ध्यानींमनींहि आलें नसेल की या सुमनांतला मधु संपतांच हे भुंगे पुन्हा त्यांच्याकडे ढुंकूनहि पाहणार नाहीत!

संस्कृत कवींच्या या भृंगभक्तीचें मला तरी एकच कारण दिसतें—संकेतप्रियता, अगदी अंध अनुकरण! कुणा तरी एका कवीला कुठल्या तरी एका वेळेला भुंग्याचा गुंजारव आवडला, आणि त्याच्या कमलावरील आसक्तीचें कौतुक वाटलें! झालें, भुंगा काळा असतो की गोरा असतो, त्याचें गायन ठुमरीसारखें लागतें की तराण्यासारखें भासतें, सुंदर चतुर प्राणी म्हणून प्राणिसृष्टींत तरी त्याला कांही विशेष किंमत आहे की काय, याची चौकशी कोण करतो? साऱ्या कवींनी भुंग्यांचीं स्तुतिस्तोत्रें गायला सुरुवात केली. जों जों भुंग्यांचा काव्यात अधिक उल्लेख होऊं लागला तों तों वृत्त, कल्पना, भावना याप्रमाणे तोहि काव्याचा एक आवश्यक घटक होऊन बसला. कवींचें बहुमत भृंगपक्षाकडे वळलें मग बहुमत हा अनेकदा मूर्खांचा बाजार होऊं शकतो, याची दखल कोण घेणार?

भुंग्यांविषयीच्या पक्षपातामुळे कवींनी ज्या अनेक प्राण्यांचा अन्याय केला आहे त्यांतील पांचच माझे साक्षीदार म्हणून मी पुढे करतों. दिव्याभोंवतीं रात्रीं प्रदक्षिणा घालणारीं चिमणीं फुलपांखरें कुणीं पाहिलीं नाहीत? दिवसा बिचारीं पोटाच्या पाठीमागे लागून गवताच्या फुलांच्या भोंवतींसुद्धा पिंगा घालीत असतील! पण दीपोज्योतीबरोबर त्यांची आत्मज्योतहि प्रज्वलित होते. त्यांना पाहिलें की रजनी ही ध्येयाची माता आहे हें तत्काळ पटूं लागतें. त्यांच्या त्या दिव्याभोंवतालच्या प्रदक्षिणा–शिळेवर उभी राहिलेली सतीच काय ती त्यांच्याशीं त्यागाच्या बाबतींत स्पर्धा करूं शकेल. आणि त्यांच्या त्या चिमण्या पंखांचे चित्रविचित्र मोहक रंग. मागे बडोद्याला आम्ही जवाहिरखाना पाहण्याकरितां गेलों होतों, आणि परवा मुंबईच्या एका दुकानदाराने तर विविध रंगांच्या आणि किनारींच्या जरीच्या पातळांच्या चक्रव्यूहांतच मला एकदा कोंडलें होतें. पण या दोन्ही वेळीं माझ्या नेत्रांनी अनुभवलेलें रंगसौंदर्य माझ्या दिव्याभोंवती बागडणाऱ्या फुलपांखरांकडे पाहिलें की मला अगदी फिकें वाटूं लागतें.

मीं मुद्दामच सुंदर प्राण्याचें उदाहरण घेतलें असें तुम्हांस वाटत असेल. मासा कांही पतंगाइतका मोहक असत नाही. पण विरहाचें वर्णन करतांना 'जळाविण जैसी मासोळी' असें म्हटलें की कवींचा माशांशीं संबंध संपला! तरुणांच्या मनांतील प्रेमभावनांच्या नाजुक हालचालीप्रमाणे पाण्यांत चाललेली त्यांची खळबळ सोडून द्या! पण जाळ्यांतून बाहेर काढल्यावरहि तडफडतांना, अगदी प्राण सोडतांनाहि, त्यांच्यांतले खापीसारखे मासे विद्युद्दीपाप्रमाणे—अगदी हिऱ्यासारखे चमकतात, हें कितीशा कवींना ठाऊक असेल? त्यांची ती चमक, देशाकरिता फांसावर चढणाऱ्या वीरांच्या नेत्रांतील उज्ज्वल दीप्तीइतकीच आकर्षक असते.

सौंदर्याचा वरदहस्त तर राहूं द्याच, पण साधा स्पर्शहि ज्यांना झालेला नाही अशा प्राण्यांचा परामर्शसुद्धा कांही कमी काव्यमय होणार नाही! हा पाहा कोळी! 'मॉडर्न रिव्ह्यू'मधील बंगाली चित्रावरूनच त्याने आपलें शरीर बनविलें आहे असा एखाद्याला भास व्हायचा! तें कांही का असेना? याचा स्पर्श मला नको असला तरी माझ्या खोलीच्या कोपऱ्यांत त्याने आपला जो नवा बंगला बांधला आहे तो जमीनदोस्त करण्याला मी कांही आमच्या मोलकरणीला परवानगी देणार नाही! माझ्या मच्छरदाणीला मानवी भावना असत्या तर या कोपऱ्यांतील कलाकौशल्य पाहून लाजून ती केव्हाच उशींत तोंड खुपसून बसली असती! त्या दिवशीं टेकडीवरच्या रस्त्यावर कोळ्याचें केवढें घर पाहिलें मीं! घर कसलें? राजवाडाच होता तो. सूर्यकिरणांनी चमकणारे त्या राजवाड्याचे चिमणे स्तंभ किती आकर्षक दिसत होते! सूत कातण्याच्या शर्यतींत जर कोळ्याला भाग घेतां आला असता तर जास्तींत जास्ती नंबराचें सूत काढून त्याने पहिला नंबर खास पटकावला असता! पण या कोळ्याला कवितेंत कुठे स्थान आहे? तर 'एका कोळियाने एकदा आपुलें' या मराठी यत्तेच्या माजी दुसऱ्या पुस्तकांत!

सुरवंट आणि वाळवी ही मंडळी उपद्रवी असतात. पण दुष्ट मनुष्यांत गुण नसतात असें थोडेंच आहे? दारू पिऊन बायकोला बडविणारा मनुष्य काय सुरस कादंबरी लिहूं शकत नाही? व्यभिचारी मनुष्य देशभक्त असल्याचा दाखलाहि इतिहासाच्या दप्तरीं आहेच! सुरवंट अंगावर पडला म्हणजे कुत्सित टीकाकारापेक्षाहि अधिक त्रास देतो खरा! पण हें चिमुकलें

अस्वल वेलीच्या अग्राला लोंबकळून झोके घेतें तेव्हा त्याच्याकडे पाहण्याचा मोह कुणाला होणार नाही? गवताच्या चिमण्या पातीच्या टोंकाला जाऊन जणूं कांही तिचाच एक भाग म्हणून ही स्वारी स्वस्थ बसली म्हणजे तर समाधिस्थ योग्याचीच मला आठवण होते! वाळवीचेंहि तसेंच आहे. थोड्या दिवसांत खुंटीवर ठेवलेल्या धोतराची मच्छरदाणी आणि मच्छरदाणीच्या चिंध्या करण्यांत ती चतुर असते खरी! पण त्याबरोबरच तिचा गनिमी कावा किती कौतुकास्पद असतो! एके दिवशीं रात्रीं स्वच्छ केर काढून, शेंदरी घालून त्यावर मीं आपली गादी पसरली. दुसरे दिवशीं सकाळीं उठून अंथरूण गुंडाळतों तों शेंदरीला चांगलें छिद्र पडलेलें! 'छिद्रेष्वनर्था बहुलीभवन्ति!' भराभर त्या छिद्रांतून वाळवीची सेना वर येत होती. शाहिस्तेखानावर छापा घालून शिवाजीने त्याचीं बोटें कशीं कापलीं असतील याची मला त्या वेळीं पूर्ण कल्पना आली!

केवळ संकेताला बळी पडल्यामुळे अशा प्राण्यांच्या सौंदर्याचा अगर चातुर्याचा आपल्या काव्याला उपयोग करण्याऐवजी भारतीय युद्धापासून दांडी-सत्याग्रहापर्यंतचे सारे कवि भुंग्याभोंवती पिंगा घालीत बसले आहेत. स्वर्गपाताळांतहि संचार करण्याचा जिचा अधिकार ती कल्पकताच जिथे अशा बंधनांत पडते, तिथे पांगळ्या व्यवहाराच्या कपाळीं अंधारकोठडीच यायची! स्वतःच्या मुलांचीं नावें ठेवायचीं असोत अगर लोकांना नांवें ठेवायचीं असोत, पूर्वसंकेतापलीकडे पाऊल टाकायला कुणीच तयार होत नाही. पक्वान्न करायचें असो अथवा प्रेम करायचें असो, तें पूर्वापार पद्धतीने करायचें हा तर आमचा सामाजिक बाणा! 'साध्याही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे' या केशवसुतांच्या ओळींत जीवन उच्चतर करण्याचा महामंत्रच सांगितला आहे खरा! पण साधे विषय असले तरी आंधळ्यांनी ते पाहायचे कसे? पूर्वज, पुराणें, परिस्थिति, हीं सारीं जणूं कांही जीवनाला कोंडून ठेवण्याकरितां एक अभेद्य तट रचीत असतात, आणि मग त्या तुरुंगांत वावरणाऱ्या जीवनाला वाटतें—हा तुरुंग म्हणजेच सारें जग!

संकेत हे राजमार्गाप्रमाणे प्रशस्त असतात. त्यामुळे धोपट मार्गाने जाणारांना आणि सोबतीची अपेक्षा करणाऱ्यांना ते आवडावेत हें स्वाभा-

विकच आहे. राजमार्गाच्या बाजूला असलेलीं तींच तींच घरें आणि तींच तींच दुकानें पाहून कंटाळा आला, तरी नव्या पाऊलवाटेने जाण्याचा धीरच होत नाही बहुतेक माणसांना! त्यांना वाटतें, आपण कुठे तरी चुकूं! बिचाऱ्यांना हें कळत नाही की, जो चुकतो तोच शिकतो! पण पृथ्वीप्रदक्षिणेंत कितीहि पुण्य आहे अशी खात्री असली तरी राजमार्ग तयार झाल्यावांचून हे लोक त्या बाबतींत एक पाऊलसुद्धा पुढे टाकणार नाहीत!

खरें जीवन पिंजऱ्यांत नसतें, पिंजऱ्याबाहेर तें नाचत असतें, हें पांखराप्रमाणे माणसालाहि कळायला हवें, वळायला हवें. आणि म्हणूनच त्या भुंग्याला झोडपल्याबद्दल आता मला इतकें वाईट वाटत नाही. सकेतनिष्ठता झुगारून देण्याचा माझ्या मनाने जो हल्ली निश्चय केला आहे, त्याचें तें व्यक्त स्वरूप नसेल कशावरून? कोयता-हातोडा हीं जर शेतकरी-कामकऱ्यांचीं स्फूर्तिदायक प्रतीकें, तर आजपर्यंत कवींनी अवास्तव स्तोम माजविलेल्या भुंग्याला झोडपणें हेंहि माझ्या मनांतील काव्यकल्पनांच्या क्रान्तीचें प्रतीक कां होणार नाही! बाकी प्लॅंचेटवरून बोलतां आल्यास तो दिवंगत भुंगा मला म्हणेल, ‘संकेत केले आणि ते अंधपणाने पाळले कवींनी. पण मेलों मात्र मी! एकाचा खेळ होतो आणि दुसऱ्याचा जीव जातो!’

लवकरच छानसें स्मारक करण्याचें आश्वासन देऊन या भुंग्याची कशीबशी समजूत घालीन म्हणा मी!

पाहिलेंत? हें असें होतें! नाही नाही म्हटलें तरी संकेताचा केवढा पगडा मनुष्याच्या मनावर असतो! भुंग्याचें स्मारक करण्याचें मीं कबूल केलें खरें! पण कवीप्रमाणे स्मारकेंहि करून होत नाहीत, हें काय मला कळत नाही?

---

[ हत्तीचे दाखवायचे दांत आणि खायचे दांत निरनिराळे असतात ना? मनुष्यालाहि अशींच दोन मनें असतात. जगापुढे ज्या मनाचें तो प्रदर्शन करीत असतो त्याला सर्व प्रकारच्या सभ्यतेचा, संस्कृतीचा आणि सामाजिक संकेताचा मुलामा दिलेला असतो; पण त्याचें खरेंखुरें मन निराळेंच असतें. आकस्मिक अशा रागलोभाच्या प्रसंगीं तें उसळून वर येतें आणि माणसाच्या स्वभावाचें खरेंखुरें स्वरूप दृष्टीला पडतें. या लघुनिबंधांत असाच एक अनुभव लेखकाने चित्रित केला आहे. ]

मंडईतून भाजी आणणें ही सध्याच्या काळांतील एक मोठी अवघड कला आहे असें माझें पूर्ण अनुभवान्तीं ठाम मत झालें आहे. कुशल नाटककाराला ज्याप्रमाणे गर्दीचें तंत्र अवगत असावें लागतें, त्याप्रमाणे दोन पैशांचें अळू किंवा दोन आण्यांच्या भेंड्या खरेदी करणारालाहि त्यांचें पुरेपूर ज्ञान हल्ली संपादन करावें लागतें. दररोज सकाळीं या गर्दींत सापडल्यावर सामान्य मनुष्य एका घटकेंत तत्त्वज्ञ होतो. संसार म्हणजे धक्के खाणें आणि धक्के देणें, हें सत्य व्यासाच्या महाभारतापासून गिबन्‌च्या रोमच्या इतिहासापर्यंत कुठल्याहि महाग्रंथांत मंडईइतक्या सुटसुटीतपणाने प्रतिबिंबित झालेलें नाही ! परमार्थाआधी प्रपंच करा, असा उपदेश रामदासस्वामी कां करतात हें कोडेंसुद्धा भाजीभोवतालच्या भाऊगर्दींत आपल्या चप्पल असलेल्या पायावर दुसऱ्या मनुष्याचा बूट असलेला पाय पडतो तेव्हाच उलगडतें ! बायकोने भाजी आणायला पाठविलेला नवरा परस्पर संन्यास घेऊन काशीला निघून गेला अशी एखादी गोष्ट हृदयस्पर्शी कुटुंबकथा लिहिणाऱ्या कुणा लेखकाने उद्या लिहिली, तर निदान मला तरी ती खोटी वाटणार नाही !

भाजी विकत घेण्याचें हें दिव्य अलीकडे आणखी एका गोष्टीमुळे मला अग्निदिव्याहूनहि भयंकर वाटूं लागलें आहे. मोठ्या कष्टाने आपण भाजीची पाटी गांठली, तरी माळणीपाशीं मोड नसल्यामुळे पुन्हा एक नवीनच

पंचाईत दत्त म्हणून पुढे उभी राहते! तांब्याच्या पैशाला महाग झालेल्या मनुष्याला या जगांत कोणी विचारीत नाही हा सनातन अनुभव भाजीमंडईतसुद्धा सध्या आपल्याला येतो!

ही आपत्ति टाळण्याकरितां मंडईकडे जाणाऱ्या बोळाच्या तोंडाशींच खिशांतलें पाकिट काढून आंत किती मोड आहे हें मी दररोज मोजून पाहतों. पिशवींतली भाजी परत करण्याचा प्रसंग येण्यापेक्षा आधींच आपल्या पाकिटाची पत अजमावून पाहिलेली बरी असें मला वाटतें.

आज सकाळीं मंडईत जातांना नेहमीप्रमाणे मीं पाकीट उघडून पाहिलें. आंत चांगली तब्बल रुपयाची मोड आहे हें पाहून अमेरिका युद्धांत पडल्यानंतर इंग्लंडला जेवढा आनंद झाला नसेल तेवढा मला झाला. मी भोंवतालच्या लोकांकडे मोठ्या ऐटीने पाहूं लागलों. त्यांच्यापैकी कोणाच्याहि खिशांत एक रुपयाची मोड असणें शक्य नाही अशी माझी खात्री होती!

कोंबड्याला आपल्या तुऱ्याचा किंवा मोराला आपल्या पिसाऱ्याचा केवढा अभिमान वाटतो! हे प्राणी जसें आपल्या सौंदर्याचें प्रदर्शन करतात त्याप्रमाणे आपणहि पाकिटांतून ती रुपयाची मोड काढून सर्वांना आपलें वैभव दाखवीत सुटावें अशी विचित्र इच्छा माझ्या मनांत उत्पन्न झाली. पण रोगावरलें औषध जसें निसर्गाने त्याच्याजवळच निर्माण करून ठेवलेलें असतें, त्याप्रमाणे अहंकारावरील उताराहि जगांत बहुधा त्याच्या शेजारींच आढळतो. आताहि तसेंच झालें. चालतां चालतां उजव्या बाजूच्या दुकानाकडे मीं सहज पाहिलें. त्या दुकानापुढे छोटासा काळा फळा कांही तरी लिहून उभा करून ठेवला होता. आमच्या कोल्हापुरांतल्या कपिलतीर्थात त्रिवेणीसंगम होत असल्यामुळे—म्हणजे सकाळीं भाजीमंडई, संध्याकाळीं व्याख्यानाचें व्यासपीठ, व रात्रीं म्हशी पिळण्याची जागा, असें त्याचें त्रिविध स्वरूप असल्यामुळे—कुणाच्या तरी संध्याकाळच्या व्याख्यानाची ती जाहिरात असावी अशी कल्पना माझ्या मनांत येऊन गेली. मी त्या फळ्यावरील मजकूर न वाचतांच पुढे जाणार होतों, पण माणसाच्या मनापेक्षा त्याचे डोळे अधिक रसिक असतात. किंचित् मागे वळून त्या फळ्यावरलीं पहिलीं

अक्षरें मीं वाचलीं. तीं वाचतांच माझें पाऊल जागच्या जागीं खिळलें. त्या फळ्यावर मोठ्या अक्षरांत लिहिलें होतें—

'एक लाखाचें बक्षीस!'

हें बक्षीस माझ्या पाकिटांतल्या रुपयाच्या मोडीला हिणवीत आहे असा मला भास झाला. लगेच माझ्या मनांत आलें,—एखाद्या कादंबरीला हें बक्षीस कोणीं लावलें असेल तर काय बहार होईल! एकदांच मन लावून एक सुंदर कादंबरी लिहिली की आपली जन्माची ददात दूर होईल! लगेच मला वाटलें, स्वर्गांत कुबेराला असलें बक्षीस ठेवण्याची लहर आली तरी तोसुद्धा एक लाखाची भाषा तोंडांतून काढणार नाही. मग या पृथ्वीतलावर, त्यांतून हिंदुस्थानांत, आणि त्यांतहि महाराष्ट्रांत,—सहारांत अमृत किंवा काळ्या बाजारांत प्रामाणिकपणा शोधायला जाणाऱ्या शहाण्याचे सख्खे भाऊ आहोंत आपण!

'एक लाखाचें बक्षीस!'

तीं अक्षरें जणू कांही मला हसून बोलावीत होतीं. तें बक्षीस कशाकरितां आहे हें पाहण्यासाठी मी पुढे झालों. 'एक लाखाचें बक्षीस!' या अक्षरांखाली 'गोल्डन फॉन' असे शब्द होते. 'गोल्डन फॉन'चा अर्थ 'सोनेरी हरिण' असा होतो, इथपर्यंत माझ्या ज्ञानाने मला मदत केली. पण हा सोनेरी हरिण कुठे आहे? इसापनीतींत सोन्याचीं अंडीं घालणारी एक हंसी आपण लहानपणीं पाहिली होती. तिचाच हा कोणी दूरचा नातलग-बितलग आहे की काय?

सोडतींत किंवा शर्यतींत मिळणारें हें बक्षीस आहे हें एकदम माझ्या लक्षांत आलें. साप दिसावा तसा दचकून मी दूर झालों आणि मुकाट्याने पुढे चालूं लागलों. मनुष्याने स्वतः हवें तर नाठाळ घोड्यावर बसावें, पण आपल्या नशिबाला अगदी उमद्या घोड्यावरसुद्धा कधीहि बसूं देऊं नये, असें मला नेहमीच वाटत आलें आहे. त्यामुळे त्या एक लाखाच्या बक्षिसाचा विचार सोडून देऊन मी मिरच्याकोथिंबिरीच्या दराची चौकशी करूं लागलों.

पण माणसाचें मन किती विचित्र आहे! 'आणखी थोड्या मिरच्या घालून वांटे सारखे कर' असें म्हणून मी दोन पैशांच्या मिरच्या एकीकडे खरेदी करीत होतों. पण दुसरीकडे माझें मन म्हणत होतें—हें लाख रुपयांचें बक्षीस जर आपल्याला मिळालें तर दररोज मंडईला येण्याची नि दोन दोन पैशांच्या मिरच्या घेण्याची आपली ही दैनंदिन दगदग तरी वाचेल! आपण एकदम शंभर रुपयांच्या मिरच्या घेऊन टाकूं! पण छे! लक्षाधीश माणसें कांही कधी स्वतः मंडई करीत नाहीत! त्यांची भाजी त्यांच्या नोकराचाकरांनीच आणिली पाहिजे. आता नोकर चांगली भाजी आणीत नाहीत अथवा पैसे खातात असें वाटलें तर आपण स्वतः भाजीला यायला कांही हरकत नाही. मात्र तें कांही असें पायीं रखडत नाही यायचें! अगदी विमानांतून उतरायचें इथे!

अरेच्या! या मंडईपाशीं विमान उतरविण्याची कांहीच सोय नाही की! उद्या लाख रुपये मिळाल्यावर आपलें या कोल्हापुरांत राहून भागायचें नाही हेंच खरें! मग कुठें बरें आपलें बिऱ्हाड करावें? मुंबई–लंडन–न्यूयॉर्क—

मिरच्या घ्यायला पुढे सरसावलेल्या एका म्हातारेबुवांनी चांगली कोपरखळी मारली तेव्हा कुठे माझ्या अंगांत संचारलेला हा शेख महंमद अदृश्य झाला!

मात्र मंडई करून मी घरीं परत यायला निघालों तेव्हा बोळांतल्या डाव्या बाजूच्या त्या काळ्या फळ्याकडे माझे डोळे पुन्हा वळल्यावाचून राहिले नाहीत. तीं मोठीं अक्षरें मी पुन्हा अगदी अधाशीपणाने वाचलीं—

**'एक लाखाचें बक्षीस!'**

माझें मन राहून राहून त्या बक्षिसाचा विचार करूं लागलें. घोड्यावर पैसे लावणारे लोक गाढव असतात असें मी आजपर्यंत उघड उघड म्हणत आलों होतों. पण आता माझ्या मनांत एक विचार हळूच डोकावूं लागला; आपणहि एकदां गमतीदाखल–केवळ चूष म्हणून—या गोल्डन फॉनवर पैसे लावून पाहायला काय हरकत आहे? आपण पैसे लावले होते हें आपल्याला बक्षीस मिळालें तरच लोकांना कळण्याचा संभव! आणि मग तेंच काय आणखी शंभर गुप्त गोष्टी लोकांना कळल्या म्हणून त्याची फिकीर कोण

लेकाचा करतो ! या जगांत श्रीमंतांना शंभर गुन्हे नेहमी माफ असतात ! केवळ तत्त्वासाठी उभ्या जन्मांत सोडतीचें एक रुपयाचें तिकीटसुद्धा आपण कधी विकत घेतलें नाही. पण या तत्त्वनिष्ठेचा तसें पाहिलें तर आपणाला काय उपयोग झाला आहे? गतवर्षी बेळगांवच्या एका हॉटेलवाल्याला आणि नरवा साळगांवच्या कुठल्या तरी न्हाव्याला लॅाटरींत आठ आठ हजारांचीं बक्षिसें आलीं. त्या न्हाव्यापेक्षा काय आपण अधिक कमनशिबाचे असूं ? चित्रपटांतल्या नटांनी—विशेषतः नटींनी—सोडती किंवा शर्यती यांचा आश्रय करूं नये असें म्हणणें एक वेळ बरोबर होईल. कारण त्यांचें भाग्य त्यांच्या सुंदर चेहऱ्यावरच लिहिलेलें असतें; आणि घोड्यांइतकीं मालक म्हणवून घेणारीं माणसें फसवीं नसतात हा अनुभवहि त्यांना अहोरात्र येत असतो ! पण हीं हाताच्या बोटांवर मोजतां येण्याजोगीं भाग्यवान् माणसें सोडून दिलीं, तर माझ्यासारखे जे असंख्य दरिद्री जीव या जगांत आहेत त्यांना लॅाटरीचा किंवा शर्यतीचा आश्रय करण्याची इच्छा एखादे वेळीं झाली तर त्यांत नवल तें कसलें ! फार झालें तर आपण पैसे लावल्याची गोष्ट अगदी गुप्त ठेवूं. ज्या जगांत प्रेमसुद्धा चोरून करावें लागतें, आणि राष्ट्रांचीं भवितव्यें ठरविणारे तह अगदी अंधारांत होतात, तिथे सामान्य मनुष्याने अष्टौप्रहर सत्याचें स्तोम माजविण्यांत काय अर्थ आहे ?

उद्या भाजीला जातांना ' गोल्डन फॉन 'वर पांच रुपये लावून आपल्या नशिबाची परीक्षा पाहायचें मीं ठरविलें, तेव्हा कुठे माझें मन स्वस्थ झालें. पण हा स्वस्थपणा कांही फार वेळ टिकला नाही. दुपारीं जेवून मी वामकुक्षीकरतां आडवा झालों. माझा डोळा लागतो न लागतो तोंच मला एक स्वप्न पडलें. त्या स्वप्नांत वर्तमानपत्रें विकणारीं पोरें मोटमोठ्याने माझें नांव घेऊन ओरडत होतीं—' एक लाखाचं बक्षीस !' ' एक लाखाचं बक्षीस !' त्या आरडाओरड्याने दचकून मी जागा झालों. आपल्याला लाख रुपये मिळायला अजून अवकाश आहे हें कळत असूनहि या रकमेचा विनियोग कसा करायचा याचा मी बारकाईने विचार करूं लागलों.

गांवाहून आलेल्या वडिलांनी खाऊचा पुडा सोडतांच घरांतलीं चिल्लीं-पिल्लीं जशीं त्यांच्याभोवती ' मला, मला ' म्हणत गोळा होतात, त्याप्रमाणे माझ्या अतृप्त इच्छा आणि वासना त्या लाख रुपयांभोवती बेछूटपणाने

नाचूं लागल्या. नाही म्हटलें तरी गेलीं तीस वर्षें—अगदी कॉलेजांत गेल्यापासून—ब्लेझरचा एक सुरेख कोट शिवायचें माझ्या मनांत आहे. कॉलेजांत असतांना खानावळवाल्याचीं बिलें चुकतीं करण्यापेक्षा त्याचें तोंड कसें चुकवावें या विवंचनेंत माझे दिवस गेल्यामुळे त्या वेळीं इतरांचे ब्लेझर कोट पाहून 'कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी' हा भवभूतीचा चरण गुणगुणण्यापलीकडे मला दुसरें कांही करतां आलें नाही. पुढे शिरोड्याला शिक्षक झाल्यावर साधा कोट शिवायचीच मला मारामार पडूं लागली. अर्थात् माझ्या मनोराज्यांतल्या ब्लेझर कोटाला 'They also serve who only stand and wait' या मिल्टनच्या उक्तीचा आश्रय करणें प्राप्तच होतें! मी चित्रपटकथा लिहूं लागल्यापासून त्या कोटाने आपलें घोडें विशेष जोराने दामटायला सुरुवात केली. पण कुठल्याहि कंपनीच्या नव्या चित्राच्या कपड्यांतून परस्पर ब्लेझरचा कोट काढणें हें कथालेखकापेक्षा व्यवस्थापकालाच शक्य असल्यामुळे माझी ही हौस गेल्या आठ वर्षांत तशी राहून गेली. आता मात्र मीं मनांत पक्कें ठरवून टाकलें—हे लाख रुपये मिळतांच ब्लेझरचे तीन चार निरनिराळ्या रंगाचे झकास कोट शिवून टाकायचे. माझें मलाच हसूं आलें. अवघे तीन चार? छे! भिक्षुकाला मोठें दानसुद्धा मागतां येत नाहीं हेंच खरें. आपण एकदम सात ब्लेझरचे कोट शिवायचे! सात रंगांचे सात कोट! आठवड्यांतील एकेक दिवसाला एकेक कोट! प्रत्येक दिवसाला निराळा रंग!

या लाख रुपयांतून आणखी काय काय बरें करायचें? बस्स ठरलें! यापुढे पहिल्या वर्गाच्या डब्यांतून प्रवास करायचा! वाल्मीकीच्या आश्रमांतील ऋषिकुमारांना ज्याला घोडा म्हणतात तो प्राणी कसा असतो हें जसें ठाऊक नव्हतें, त्याप्रमाणे मलाहि आतापर्यंत पहिल्या वर्गाच्या डब्याच्या अंतरंगाची मुळीच कल्पना आलेली नाही. खाड खाड बूट वाजवीत किंवा आपला नटवा पोषाख सावरीत निर्बुद्ध चेहऱ्याचे पुरुष आणि स्त्रिया पहिल्या वर्गाच्या डब्यांत प्रवेश करतांना पाहिल्या की, क्षणभर का होईना, मला त्यांच्या भाग्याचा हेवा वाटतो! मी स्वतःशीं म्हणालों, आतां हें समाधान मनांत राहूं द्यायचें आपल्याला काय कारण आहे? आपण पहिल्या वर्गानें कितीहि प्रवास केला तरी हे लाख रुपये लवकर थोडेच खलास होणार आहेत!

मी मनांत म्हणूं लागलों, आता प्रवास करायचा तो कांही मुंबई ते कोल्हापूर आणि कोल्हापूर ते शिरोडें असा लुटुपुटीचा नाही ! लहानपणीं आपल्या मालकीच्या नसलेल्या मासिकांतून मोठमोठ्या प्रेक्षणीय स्थळांचीं चित्रें आपण कापून ठेविलीं होतीं ! तो चोरीचा चित्रसंग्रह सध्या आपल्या-पाशीं नसला तरी केवळ स्मरणशक्तीच्या बळावर आपल्याला काय काय पाहावयाचें आहे तें एका घटकेंत निश्चित करतां येईल.

त्या वेळीं कृष्णेंत डुंबतांना एक कल्पना नेहमी माझ्या मनांत येई. आपण असेंच पोहत पोहत खाली गेलों तर मच्छलीपट्टणपर्यंत जाऊं. तिथे कृष्णाबाई समुद्राला मिळते. तें संगमाचें दृश्य किती मनोहर दिसत असेल ! आता हा संगम पहिल्यांदा पाहायचा !

तो पाहून झाला की मग मदुरेचें देवालय ! लपंडाव खेळायला हें फार चांगलें देऊळ आहे असें त्याच्या चित्रावरून मला लहानपणीं वाटे. तें खरें आहे का खोटें आहे हें आता अनुभवान्तीं कळेलच ! तें देवालय पाहून झाल्यावर मग गिरसप्पाच्या धबधब्याकडे जायचें ! इंग्रजी शाळेंत आपण पहिल्यांदा त्याचें चित्र पाहिलें, तेव्हा रविवर्म्याचें गंगावतरणाचें चित्र एक-दम आपल्या डोळ्यापुढे उभें राहिलें होतें. शंकराच्या विशाल आणि कृष्ण जटाभाराप्रमाणे दिसणारा तो डोंगर, त्या जटाभारातून चमकत चमकत बाहेर पडणाऱ्या गंगातरंगाप्रमाणे या डोंगरावरून खाली उडया घेणारे शरावतीचे रूपेरी प्रवाह—हें भव्य सौन्दर्य डोळे भरून पाहायची आपली इच्छा आता लवकरच सफल होणार म्हणून माझें मन कसें उल्हासित होऊन गेलें !

ह्या उल्हासाच्या भरांत मी स्वतःशीच म्हणालों—आम्ही हिंदी लोक अजून कूपमंडूक आहोंत यांत शंका नाही. चांगले एक लाख रुपये उद्या आपल्या खिशांत येऊन पडणार, आणि आपण मारे प्रवासाचे बेत करतोंय् ते सारे मदुरेचे आणि गिरसप्पाचे ! तें कांही नाही ! हे लाख रुपये हातांत पडले की पहिल्यांदा परदेशाच्या प्रवासाची तयारी करायची !

मेरी कॉरेलीच्या 'थेल्मा' कादंबरींत नॉर्वेसारख्या उत्तर ध्रुवाकडच्या देशांतल्या मध्यरात्रींच्या सूर्योदयाचें किती अद्भुतरम्य वर्णन आपण दोन तपांपूर्वी वाचलें होतें. तो सूर्योदय आता आपण डोळ्यांनी पाहूं शकूं ! पनामा कालवा तयार होऊन अटलांटिक व पॅसिफिक या दोन महासागरांची

पहिली भेट झाल्याची हकीकत आपण तीस वर्षांपूर्वी वर्तमानपत्रांत वाचली होती. आता आपल्याला या महासागरांच्या मीलनाचें भव्य दृश्य डोळ्यांनी पाहतां येईल. इजिप्तमधील पिरॅमिड, महाकवीला शोभेल असाच मृत्यु शेलेला यावा म्हणून समुद्राने अचानक वादळ उत्पन्न करून ज्या ठिकाणीं त्याला आपल्या अनंत मंदिरांत नेलें ती जागा, शेक्स्पियरची जपून ठेवलेली खुर्ची, मॅझिनीची समाधि, कांचेच्या पेटींतील लेनिनच्या मृण्मय मूर्तीचें दर्शन--छे! पृथ्वीपर्यटनाला निघायच्या आधीच आपण साऱ्या प्रेक्षणीय गोष्टींची यादी करायला हवी! नाही तर गडबडींत किती तरी गोष्टी पाहावयाच्या राहून जातील; नि हिंदुस्थानांत परत आल्यावर आपण हें पाहिलें नाही नि आपण तें पाहिलें नाही म्हणून मनाला जन्मभर चुटपुट मात्र लागेल!

हा प्रवास संपला की एक सुंदर लायब्ररी करायच्या नादाला आपण लागणार! हवीं तीं पुस्तकें वेळेवर न मिळाल्यामुळे सध्या आपली किती कुचंबणा होते! कित्येक श्रीमंतांचे ग्रंथसंग्रह फार छान असतात. पण त्यांच्या मालकांची ग्रंथांविषयी कल्पना तुमच्याआमच्यापेक्षा फार निराळी असते. पुस्तकें हीं वाचण्यासाठी नसून वैभवाच्या प्रदर्शनासाठी असतात अशा समजुतीनेच हे लोक वागतात. ज्यांचें नखसुद्धा लोकांच्या दृष्टीला कधी पडायचें नाही अशा हजारों सुंदर स्त्रिया जनानखान्यात बाळगणाऱ्या एखाद्या म्हाताऱ्या सुलतानाचे हे पट्टशिष्य—जाऊं दे, लाख रुपये मिळाल्यावर आपली लायब्ररी पाहायला बोलावून त्यांच्या डोळ्यांत चांगलेंच अंजन घालूं आपण!

पृथ्वीपर्यटन, उत्तम ग्रंथसंग्रह, जिथून समुद्र अष्टौप्रहर दिसूं शकेल असा शिरोड्याजवळच्या टेकडीवर बांधायचा टुमदार बंगला--एक ना दोन, किती तरी अतृप्त इच्छा भराभर माझ्या डोळ्यापुढे साकार होऊं लागल्या.

लगेच मला वाटलें—स्वप्नांतली श्रीमंतीसुद्धा मनुष्याला अधिक आत्मनिष्ठ करते यांत शंका नाही. आतापर्यंत आपण आपल्या स्वतःच्याच सुखाचा विचार करीत होतों. आपल्या जोडीने ज्यांनी अनेक उन्हाळे-पावसाळे पाहिले, संसाराच्या प्रवासांत पायांना चटके बसत असूनाहि ज्यांनी हंसत जणू कांही आपण फुलांच्या पायघड्यांवरून चालत आहों असें आपल्याला

भासविलें, त्या आपल्या कुटुंबांतील माणसांच्या अतृप्त इच्छा आपल्या इच्छाइतक्याच महत्त्वाच्या नाहीत काय ? आपल्या हातून एकदां काशी-यात्रा घडावी असें आपल्या बहिणीच्या मनांत कधीच आलें नसेल ? बरो-बरीच्या बायकांची हिऱ्याची कुडीं पाहून तसलीं कुडीं आपल्याहि कानांत असावींत अशी इच्छा आपल्या पत्नीला कधीच झाली नसेल का ? मला त्रास होऊं नये म्हणून या दोघींनी या आपापल्या इच्छा माझ्यापाशीं कधीहि बोलून दाखविल्या नसतील ! पण—

रात्रीं जेवण झाल्यावर एकीकडे पेंगळत आणि दुसरीकडे खेळत मुलें माझ्याभोंवती किलबिल करूं लागलीं, तेव्हा त्यांच्याहि इच्छा विचारून घेऊन आपल्याला मिळणाऱ्या एक लाखाची व्यवस्था पुरी करून टाकावी असें माझ्या मनांत आलें. मीं चारी मुलांना प्रश्न केला, ' आपणांला आता एक लाख रुपये मिळणार आहेत; त्या रुपयांतून तुम्हांला काय काय हवं तें—"

मला वाक्य पुरें करूं देण्याची सवडसुद्धा न देतां अवी ओरडला, 'मला लाख रुपयांचं आइस्क्रीम हवं ! '

एक लाखाचं आइस्क्रीम ! मी थंडच झालों ! एखाद्या महासागरांत हिमालय घालूनच हें आइस्क्रीम तयार करायची व्यवस्था करावी लागेल असें मला वाटलें.

मीं मंदाकडे पाहिलें. ती गंभीरपणाने उद्गारली, ' मी गुलाबाचीं फुलं घेईन एक लाख रुपयांचीं ! ' घरांत एका दिवसापुरतें का होईना, काश्मीर निर्माण करण्याचा तिचा बेत दिसला !

' तूं काय करणार ? ' मीं लताला विचारलें ! ' मी बाहुल्या घेणार ! ' तिने आपल्या स्वप्नाळु डोळ्यांनी माझ्याकडे पाहात उत्तर दिलें.

एक लाख रुपयांच्या बाहुल्या ! घराचें दुकान बनवायचा कल्पलता-बाईंचा हा विचार ऐकून मला हसूंच कोसळलें.

इतक्यांत सुलभा माझ्या गळ्याला मिठी मारून म्हणाली, ' मी शांगू भाऊ ? '

एक लाख रुपयांची जिला कल्पनासुद्धा करतां येणार नाही ती ही साडेतीन वर्षांची पोरटी बहुधा लाख रुपयांच्या पेढ्यांची मागणी करणार

असें मला वाटलें. मी लक्ष देऊन ती काय म्हणते तें ऐकूं लागलों. ती हळूच म्हणाली, ' आपण भाकली घेऊं या ! '

' भाकरी ? '

' हं ? नि रोज रोज पंधलीनाथाला घालूं या ! '

पंढरीनाथ ! मी घड्याळाकडे पाहिलें. साडेनऊ व्हायला आले होते. नेहमीप्रमाणे रस्त्यावरून करुण आक्रोश ऐकूं येऊं लागला—' पंढरीनाथा, इट्ठला, मायबापा; कुणी तरी या गलीमंदी अर्ध्याकोर भाकरीची दया करा ऽ ! '

सुलभा माझ्या मांडीवरून उठून आंत जाऊन पंढरीनाथाला घालण्याकरतां आईकडे भाकरी मागूं लागली.

क्षणार्धांत एक चतकोर घेऊन ती धावतच बाहेर आली. अंधारांतच ती जिना उतरूं लागली. पायरीबियरी चुकून ती जिन्यावरून पडेल म्हणून मी तिच्या पाठीमागून गेलों.

सुलभाने गडबडीने दार उघडलें आणि ' पंधलीनाथा ' म्हणून हांक मारली. नऊ दहा वर्षांचें एक पोर पुढे आलें. गच्चींतल्या दिव्याचा प्रकाश आता त्याच्यावर पूर्णपणे पडला होता. त्याच्या अंगावरल्या त्या मळकट चिंध्या—त्या चिंध्यांतून दिसणाऱ्या त्याच्या बरगड्या—त्याचे ते भकास डोळे —त्याच्या हातांतल्या रुंद तोंडाच्या मडक्यांत गोळा झालेलें तें शिळेंउष्टें अन्न—

मीं शरमेने माझी मान खाली घातली. माझ्या अविनाशाएवढ्याच असलेल्या या मुलाला चार उष्ट्या घांसांकरितां अपरात्रीं अंधारांत कंठशोष करीत फिरावें लागत असतांना, याच्यासारखीं एक लाखच काय, दहा लाख मुलें माझ्या देशांत या क्षणीं केविलवाण्या तोंडाने पोटाची खळगी भरण्याकरतां भीक मागत असतांना जुगार खेळून केवळ चैनीकरतां एक लाख रुपये मिळविण्याची कल्पना माझ्या मनाला शिवावी याची लाज वाटली मला !

त्या क्षणीं फाऊस्ट नाटकाची मला तीव्रतेने आठवण झाली. शरीरसुखाकरितां आपला आत्मा सैतानाला विकणाऱ्या महापंडित गटेने त्यांत चित्रित केला आहे. मला वाटलें—विसावें शतक हें यंत्रयुग नाही, तें आत्मे विकत घेणाऱ्या सैतानाचें युग आहे. ज्याच्यापायीं मनुष्य आपली माणुसकी विसरतो, अशा मोहांनी भरलेलें युग आहे हें. या युगांत सैतान विनाकष्ट

मिळणाऱ्या पैशाच्या रूपाने अवतार घेतो. कष्टावाचून विलास उपभोगायला सवकलेला प्रत्येक मनुष्य आपण हजारों माणसांना जनावरांप्रमाणे आयुष्य कंठायला भाग पाडीत आहों ही जाणीव या सैतानाच्या उन्मादक सहवासांत विसरून जातो. एक लाख रुपयांत काय काय करावयाचें यासंबंधीचे माझे सारे संकल्प—अबीचें आइस्क्रीम, मंदार्ची फुलें, नि लताच्या बाहुल्या —यांच्यांत आणि माझ्या अतृप्त इच्छांत असें काय मोठें अंतर आहे !

अगदी निढळाच्या घामाने जरी आपल्याला एक लाख रुपये उद्या मिळाले, तरी पंढरीनाथासारखीं मुलें समाजांत असेपर्यंत त्या पैशाचा उपभोग घेण्याचा अपल्याला अधिकार नाही.

दार लावून सुलभा वर येऊं लागली. तिच्याकडे पाहतां पाहतां लहान मुलेंच मोठ्या माणसांना मार्गदर्शक होतात ( The child is the father of man) ही वर्ड्स्वर्थची आजपर्यंतची निव्वळ काव्यमय वाटणारी उक्ति अत्यंत वास्तव आहे अशी माझी खात्री झाली. इंद्रधनुष्याच्या दर्शनाचा आनंद अतिशय लहान मूलच जसा उत्कटतेने घेऊं शकतें, त्याप्रमाणे आपण सारे भाऊ भाऊ आहोंत या मानवधर्माच्या मूलभूत भावनेचाहि गोड आविष्कार त्याच्या हृदयांत लीलेने होतो.

वर येतांच सुलभाने मला विचारलें, ‘ भाऊ, एक लाखाची भाकली देनाल ना मला ? ’

मी म्हणालों, ‘ ते लाख रुपये माझ्यापाशी नाहीत ! तुझ्यापाशी आहेत !’

ती आश्चर्याने माझ्याकडे पाहूं लागली.

मी तिला जवळ ओढून तिच्या गालाचा एक गोड गोड पापा घेत म्हणालों, हें माझं एक लाखाचं बक्षीस ! ’

---

# संदर्भ–टीपा

## मराठी कवितेचे प्रतिपक्षी :

पान २२. **ब्रह्मसमाज :** गेल्या शतकांत बंगालमध्यें हा पंथ राजा राममोहन रॉय यांनी स्थापन केला.

पान २२. **प्रार्थनासमाज :** हा पंथ गेल्या शतकांत न्या. रानडे, तेलंग, चंदावरकर, भांडारकर यांच्या प्रयत्नाने प्रथम मुंबई व पुणें येथे सुरू झाला. या पंथाने ख्रिस्ती धर्माचें अनुकरण केलें. प्रार्थनामंदिरांत देवाची मूर्ति नाही. दर रविवारीं प्रार्थनासमाजिस्ट एकत्र जमून निराकार व निर्गुण अशा एकाच कारुणिक देवाची उपासना करतात.

पान २३. **इलियड :** ग्रीक महाकवि होमर याने हें महाकाव्य लिहिलें. याचें कथानक व आपलें रामायणाचें कथानक यांत साम्य आहे.

पान २३. **इनियड :** व्हर्जिलचें महाकाव्य दोन हजार वर्षांपूर्वी लिहिलें गेलें.

पान २३. **'शुद्ध भाषान्तर' करणारा कवि :** चिपळूणकरांच्या वेळीं वामन, मोरोपंत इत्यादि पंडितांना 'कवि' न म्हणतां 'भाषान्तरे' म्हणण्याचा वाद चालू होता स्वतः चिपळूणकरांना मात्र मोरोपंतांबद्दल विलक्षण प्रेम वाटे. 'मोरोपंतांची कविता' या प्रदीर्घ निबंधांत मोरोपंतांवरील आक्षेपांना उत्तरें देऊन शास्त्रीबुवांनी पंतकाव्याचे गुण प्रतिपादिले आहेत.

पान २४. **चॉसर :** चौदाव्या शतकांतील आद्य इंग्रजी कवि चॉसर, याने 'कँटर्बेरी टेल्स' हा गोष्टींचा ग्रंथ लिहिला.

पान २५. **'खरा धर्म'** : मिशनरी लोक ख्रिस्ती धर्म हाच खरा, इतर धर्म खोटे असें म्हणत. त्यांच्या या विधानाचा शास्त्रीबुवांनी उपहास केला आहे.

पान २६. **पारतंत्र्याचे परिणाम** : आमच्या देशाची स्थिति या निबंधमालेंतील प्रदीर्घ निबंधाचा हा एक भाग येथे निवडला आहे. हा भाग निबंधमालेच्या ७८ व्या अंकांतील आहे.

पान २६. **फारचि बरी निरयगति** : हा आर्यार्ध मोरोपंतांच्या आर्याभारतांतील विराटपर्वांत आहे [ विराटपर्व, अध्याय १, आर्या ५६. ]. अज्ञातवासांत द्रौपदी सैरंध्री म्हणून वावरत असतांना तिला तिच्या मनाविरुद्ध कीचकाकडे पाठविण्यांत येतें; त्या प्रसंगाची ही आर्या आहे. नरक फार बरा, पण गुलामगिरी शतपटीने त्रासदायक असते हा भावार्थ.

पान २७. **सद्धर्माचे पवित्र प्रेषित** : ख्रिस्ती मिशनरी लोकांचा शास्त्रीबुवांनी केलेला उपहासपूर्ण उल्लेख.

पान २७. **रोमन लोकांनी ब्रिटन देश०** : ही घटना इसवी सन ४३ मध्ये घडली. त्यानंतर ३५० वर्षें रोमन लोकांनी इंग्लंडवर राज्य करून ते अचानक चालते झाले, व इंग्लंड अगतिक झालें. [ १९४७ मध्ये ब्रिटिशांनी हिंदुस्थान सोडला त्याचा परिणाम तुलनेने अभ्यसनीय वाटेल.]

पान २७. **हरि रामोशी** : महाराष्ट्रांतील आद्य क्रान्तिकारक वासुदेव बळवंत फडके यांच्या टोळींतील हा एक रामोशी होता. परंतु फडके यांचा उच्च हेतु आकलन न झाल्यामुळे हरि रामोशी याची पुंडाई फक्त स्वार्थमूलक ठरली.

पान २९. **बाळमित्र** : सदाशिव काशिनाथ छत्रे यांनी Children's Friend या पुस्तकाचें केलेलें मराठींतील भाषान्तर.

पान ३४. **चौदा सूत्रें** : शंकराने आपला डमरु चौदा वेळ वाजविला, व व्याकरणाचीं चौदा सूत्रें शंकराच्या कृपेने पाणिनीस अवगत झालीं अशी एक कथा आहे

पान ३५. **ब्रह्मावर्ताचा शागीर्द** : ब्रह्मावर्ताला नानासाहेब पेशवे यांच्याकडे पूर्वी शागीर्द असलेला तात्या टोपे १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धांत सेनापति म्हणून गाजला. १८५९ मध्ये त्याला फांशीची शिक्षा इंग्रजांनी दिली.

पान ३७. **अर्धचंद्र करूस** : मुसलमान व ख्रिस्ती धर्मांचीं बोधचिन्हें.

पान ३७. **मातक्यान** : पुन्हा फिरून [ कोंकणी बोलींतील शब्द ].

पान ४०. **'वागुच्चारोत्सवं...बालका इव'** : तोंडाची बडबड करण्यांत सार्थकता समजणारे पण वेदोक्त कृति करण्यांत असमर्थ ठरणारे कलियुगांतील वेदान्ती लोक फाल्गुनांतील मुलांप्रमाणे आहेत.

पान ४१. **देशोन्नति** : हा निबंध 'केसरी'त १८८१ मध्ये प्रसिद्ध झाला.

पान ४१. **'टोपीवाल्याने केला कावा, आगिनगाडी घेते धावा'** : इंग्रजांनी आगगाडी, तारायंत्र इ. आणलेल्या शोधांमुळे सामान्य लोक दिपून गेले व उपरोक्त गाणीं गुणगुणलीं गेलीं. पहिली आगगाडी सन १८५४ मध्ये सुरू झाली.

पान ४३. **डिमॉस्थेनिस व सिसरो** : ग्रीक व रोमन वक्ते.

पान ४४. **ज्यासि मिळेना भाकर अर्धी** : प्रभाकर शाहिराने दुसऱ्या बाजीरावाच्या अखेरीस जें पुणें-वर्णन केलें त्या पोवाड्यांत हा भाग आहे.

पान ४४. **परशुराम क्षेत्रांतल्या** : कोंकणांत पूर्वी परशुरामाने सह्याद्रीस चिकटून असलेला समुद्र मागे सारून कोंकणप्रान्त निर्माण केला अशी आख्यायिका आहे.

पान ४५. **चापाजी टिळेकर** : नारायणराव पेशव्यांचा हा स्वामिनिष्ठ हुजऱ्या. याने गारद्यांची तरवार नारायणराव पेशव्यांवर पडत असतांना आपला देह मध्ये घातला व त्यांतच तो मारला गेला [१७७५].

पान ४६. **सार्वजनिक सभा** : पुण्यांतील लोकमत तयार करणारी व सरकारकडे तें कळवणारी प्रभावी संस्था न्या. रानडे यांनी स्थापन केली.

पान ४६. **विश्रामबाग** : हल्लीची पुणें म्युनिसिपालिटीची जागा. येथे १८४२ मध्ये मुंबईचे गव्हर्नर व तत्कालीन सुशिक्षित यांच्या प्रयत्नाने लायब्ररी सुरू झाली.

पान ४७. **हॅम्डन्** : सतराव्या शतकांतील पार्लमेंटांतील देशभक्त पुढारी. याने चार्लस राजाला विरोध करून अन्यायाने बसविलेला कर ( Ship-Money ) देण्याचें नाकारलें. स्वतः छळ भोगला पण लोकशाही राजकारणाचा पाया घातला.

पान ४७. **वॉशिंग्टन-जॉर्ज** : अठराव्या शतकांतील अमेरिकेचा पुढारी. ह्याने इंग्लंडशीं विरोध करून अमेरिका स्वतंत्र केली. अमेरिकेचा पहिला अध्यक्ष.

पान ४८. **बरव्या राजश्रीशीं झुंज** : कोल्हापूरच्या राजाला वाईट वागणूक मिळते, व ती मिळण्यांत इंग्रज सरकार व कोल्हापूरचे दिवाण रावसाहेब माधवराव बर्वे यांची कारवाई आहे असें वृत्त 'केसरीं'त छापलें गेलें. कोल्हापूरच्या बातमीदाराने ऐन वेळीं माघार घेतली. दिवाण बर्वे यांनी आगरकर व टिळक यांच्यावर अब्रुनुकसानीची फिर्याद केली. [ या खटल्यांत आगरकर व टिळक यांना १०१ दिवस डोंगरीच्या तुरुंगांत कैद झाली. ] या फिर्यादीस उद्देशून हें वाक्य आहे.

पान ५३. **तरुण सुशिक्षितांस विज्ञापना** : [ 'सुधारकां'तील आरंभींचा लेख ].

पान ५३. **त्या देशांतील युनिव्हर्सिटयांतले-पूर्वसंप्रदायप्रिय असतात** : हें विधान गेल्या शतकांतील ऑक्स्फर्ड, केंब्रिज येथील गुरुशिष्यांना उद्देशून आहे. [ मात्र हें जागतिक सत्य नव्हे. तुर्कस्थान, रशिया, हिंदुस्थान इत्यादि देशांतील क्रान्ति घडवून आणण्यांत विद्यार्थ्यांचा भाग होताच. ]

पान ५४. **ग्लॅड्स्टन** : गेल्या शतकांतील उदारमतवादी (लिबरल) पक्षाचा इंग्लंडमधील पुढारी; व इंलंडचा अनेक वेळीं मुख्य प्रधान.

पान ५४. **हार्टिंग्टन्** : कॉन्झर्वेटिव्ह ( सनातनी ) पक्षाचा प्रमुख व ग्लॅड्स्टन्चा प्रतिस्पर्धी.

पान ५६. **प्रत्येक देशांत तीन ठळक वर्ग** : आगरकरांच्या सूक्ष्म विचारसरणीचा हा भाग उत्कृष्ट नमुना आहे. साम्यवादाचीं

मूलभूत तत्त्वें आगरकरांनी पचवून केलेलें हें विवेचन कौतुकास्पद वाटतें.

पान ५५. **जेव्हा असमतेची परमावधि होते** : आगरकरांच्या नजरेसमोर या वेळीं फ्रेंच राज्यक्रान्तीचें चित्र असावें; व त्या चित्रावरून ते हिंदुस्थानांतील असमतेकडे वळतात.

पान ५९. **वृद्ध हे समाजनौकेचें भरताड–तरुण शिडें** : आगरकरांची समाजजीवनविषयक दृष्टि किती शुद्ध होती हें या सुभाषितावरून स्पष्ट होईल.

पान ६३. **बालविवाहाची चाल बंद झाली पाहिजे** : आगरकरांच्या या विचारास मूर्त रूप त्यांच्या मृत्यूनंतर ४० वर्षांनीं सारडा कायद्यांत आलें व मुलीची लग्नमर्यादा चौदा वर्षें ठरवली गेली.

पान ६४. **सुधारणा आणि कलह** [ सोलापूरकर अपरिचितांस उत्तर ].

पान ६९. **संमतिवयाचा कायदा तर पसार होऊन गेला** : नवऱ्याकडे जातांना स्त्रीचें वय काय असावें याबद्दल लो. टिळक व आगरकर यांच्या पक्षांत बराच काळ वाद चालू होता. ऋतुप्राप्तीनंतर स्त्रीने पतीकडे जावें असें आगरकरांचें मत होतें व तसा कायदा करण्याविषयी ‘ सुधारकां ’चा सरकारला आग्रह होता; उलट, सरकारने धार्मिक बाबतींत हात घालूं नये म्हणून टिळकांचा विरोध होता. अखेरीस हिंदुस्थान सरकारच्या कौन्सिलांत ना. स्कोबल् यांनी स्त्रीचें वय बारा असावें असा कायदा पास करून घेतला [ १८९२ ].

पान ७०. **मनुष्यतेचें ऐहिक सुखवर्धन** : अध्यात्माचा पगडा बसून व्यावहारिक जीवनाविषयी उदासीन बनलेल्या व रूढ परंपरेने जीवनोपभोगाबद्दल तिटकारा बाळगणाऱ्या समाजाला आगरकरांनी हा नवा विचार शिकवला. आगरकरांच्या सुधारणावादाची व बुद्धिप्रामाण्याची बैठक मनुष्याचें ऐहिक जीवन उंचावण्यासाठी होती.

पान ७१. **सर्मनाचा शेवट करून आमेन म्हणतो** : ख्रिस्ती धर्मगुरु प्रवचन [ sermon ] केल्यावर आशीर्वचन [आमेन] देतात.

त्याप्रमाणे सुधारणावादावर इतकें प्रवचन करून आगरकर कल्याण चिंतितात. सुधारणेची इच्छा व विनोदबुद्धि यांचा मिलाफ आगरकरांत होता.

पान ७५. **महाराष्ट्रीयांस अनावृत पत्र** : [ आगरकरांच्या व्यक्तिमत्वाचें रमणीय दर्शन या आत्मनिष्ठपर निबंधांत होतें ].

पान ७९. **ज्याने आज सात आठ वर्षें केसरी पत्राचें** : १८८० ते १८८८ पर्यंत आगरकरच 'केसरी'चे संपादक होते; व या काळांत 'केसरी'तले पुष्कळसे लेख आगरकरांनी लिहिले आहेत परंतु पुढे त्यांच्या सुधारणावादी मतांचा आग्रह विशिष्ट प्रमाणाबाहेर टिळकादींना पसंत पडेना या मतभेदांतून आगरकरांनी 'केसरी'शीं सबंध सोडून 'सुधारक' वर्तमानपत्र सुरू केलें [ १८८८ ].

पान ७९. **दुर्दैवी संस्थानिकास सुदशा यावी** : कोल्हापूर प्रकरण व त्यानिमित्त झालेली १०१ दिवसांची कैद

पान ७८. पुढील कविवाक्याचें स्मरण : **भवभूति** : हा संस्कृत नाटककार त्याच्या हयातींत उपेक्षिला गेला. पण ती उपेक्षा धीराने पचवून त्याने पुढील आशावाद व्यक्त केला.

पान ८१. **सापडलेलें संपुष्ट** : [ निसर्गसौंदर्यांत साक्षात्कार बघणाऱ्या शिवरामपंतांच्या या निबंधांतील शब्दचित्राचें कुशल लेखन सरस वाटेल ].

पान ८६. **आकाशसरोवरांतील कल्हार-पुष्प** : कल्हार-पुष्प हें काल्पनिक आहे. पण त्याचें रम्य वर्णन भारत–भागवतांत आहे.

पान ८८. **ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे** : [ रूपकात्मक निबंध लिहून स्वातंत्र्यज्योत प्रज्वलित ठेवण्याची उपहासपूर्ण शैली येथे आहे. ध्रुवाची पुराणांतील गोष्ट आधाराला घेऊन स्वाभिमानशून्य लोकांच्या मनास परांजपे आवाहन करीत आहेत. ध्रुव, ध्रुवाला लाथ मारणारी सावत्र आई सुरुचि, दुःख सहन करणारी ध्रुवमाता सुनीति, यांच्या द्वारे भारतवासी

लोक, लाथ मारणारी इंग्रजी सत्ता व दुबळी पण सत्त्वशील भारतमाता यांचींच चित्रें परांजपे काढीत असावेत. ]

पान ९०. **अठरा पुराणें** : ब्राह्म, पद्म, विष्णु, शिव, भागवत, भविष्य, नारद, मार्कंडेय, अग्नि, ब्रह्मवैवर्त, लिंग, वराह, स्कंद, वामन, कूर्म, मत्स्य, गरुड, ब्रह्माण्ड.

पान ९५. **भृगु** : विष्णूच्या सहनशीलतेची परीक्षा घेण्यासाठी भृगूंनी विष्णूच्या छातीवर लाथ मारली. त्या लाथेचें चिन्ह हें वत्सलांछन.

पान ९५. **पादार्पणानुग्रहपूतपृष्ठं । अवेहि मां किंकरम्** : कालिदासोक्ति. 'आपण मारलेली लाथ खाऊन ज्याची पाठ पवित्र झालेली आहे असा मी आपला नोकर आहें.' पंतांनी केलेला हा मार्मिक उपयोग हृद्य आहे.

पान ९५. **रिस्पॉन्सिव्हिस्ट पक्ष** : होयबा पक्ष. सरकारधार्जिण्या मवाळ पक्षाच्या लोकांचा हा उल्लेख आहे.

पान ९८. **भासाची भवितव्यता** : [ शिवरामपंतांचे 'काळां'तील लेख सरकारने १९१० मध्ये जप्त केले तेव्हा भासाचीं नाटकें पूर्वी एका जुलमी राजाने जाळलीं ही घटना त्यांच्या डोळयासमोर राहिली व आत्मनिष्ठेने रसरसलेलें हें निबंधरूपी ध्वनिकाव्य जन्मास आलें. भावगर्भता, कल्पनाविलास, शब्दचित्रें; रसाळ भाषाशैली, आणि वस्तुनिष्ठेखालील अमर्याद आत्मनिष्ठा या गुणसंपदेने हा निबंध केवळ पंतवाङ्मयास नव्हे तर सर्व मराठी वाङ्मयास शिरोधार्य ठरेल. ]

पान ९९. **सीतेला रावणाने चोरून नेली** : 'श्रीरामजयंति' या उपरोधिक निबंधांत भारताची लक्ष्मीरूपी सीता समुद्रापलीकडच्या (इंग्रज) रावणाने चोरून नेली हा विचार मांडला असून त्या रावणाचा नाश करणाऱ्या रामाचें महत्त्व वर्णिलें आहे. या ठिकाणीं जप्त झालेल्या त्या निबंधांतील विचार पुन्हा डोकावतो आहे.

पान १००. **अर्चिरादि मार्ग** : मृत्यूनंतर मोक्षाकडे नेणारा हा मार्ग भगवद्गीतेंत वर्णिला आहे.

पान १००. **धूमज्योतिः सलिल मरुतां** : कालिदासाच्या मेघदूतांतील मेघवर्णन

पान १०३. **त्यापेक्षा एखादा भगवद्भक्त** : कार्डिनल वूल्सेने राजाच्या कृतघ्न वागणुकीने वैतागून जे उद्‌गार काढले त्याचा हा अनुवाद असावा.

पान १०७. **देवांचे वेद समुद्रांत बुडविले** : कालेय दैत्यांनी वेद समुद्रांत बुडविले तेव्हा विष्णूने मत्स्याचा अवतार घेऊन ते बाहेर काढले या कथेचा उल्लेख.

पान १०८. **गुणाढ्याची पैशाची** : आजच्या पेशावरकडील भाषेंतील बृहत्कथेचा लेखक गुणाढ्य.

पान १०८. **दाक्षायणीप्रमाणे** : पार्वती ही दक्षाची मुलगी. दक्षाने मोठा यज्ञ केला पण शंकरास न बोलावितां फक्त पार्वतीस बोलाविलें. पार्वतीस हा अपमान वाटला व तिने यज्ञकुंडांत उडी घेतली अशी कथा आहे.

पान ११५. **वाङ्मय म्हणजे काय?** : [ १९२१ मधील बडोदें येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनांतील श्री. केळकरांचें अध्यक्षीय भाषण ]

पान ११६. **यच्चयावत् जें वाचेनें वदलें गेलें तें** : इतिहासाचार्य राजवाडे यांनी ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत ही व्याख्या केली आहे. पण ही व्याख्या अतिव्याप्त आहे.

पान ११७. **हे गाळीव लेख ... वाङ्मय** : केळकरांची ही कसोटी आहे, व्याख्या नव्हे.

पान ११७. **लाजेची गुलाबी पसरेल** : उपमा–दृष्टान्तांनी विषय रमणीय व सुबोध करण्याची केळकरांची हातोटी आहे. यामुळेच वाटतें की ' उपमा नरसिंहस्य– ' ( मराठीपुरतें ).

पान १ ७. **वाङ्मय हें शब्द व अर्थ मिळून होतें** : रमणीयार्थप्रतिपादक शब्दः ! मम्मटाच्या काव्यप्रकाशांत ही चर्चा आहेच.

पान ११८. **जॉन मोर्ले** : १९ व्या शतकांतील उदारमतवादी मुत्सद्दी व ' On Compromise ' या ग्रंथाचा लेखक.

पान १२०. **' वाङ्मयालाहि सत्याची चाड आहे '** : ' Truth is Beauty and Beauty is Truth ' हें कीट्सचें वचन व संस्कृतांतील ' सत्यं शिवं सुदरं ' हें वचन : केळकरांनी या पाश्चात्य व पौर्वात्य विचारांशीं एकरूपता राखली आहे.

पान १२१. **' मेकॉले...हा सिद्धान्त खरा नाही '** : केळकर व वा. म. जोशी या दोघांनी मेकॉलेचें मत खोडून काढलें आहे. [ वामन मल्हारांचें ' विचारविलास ' हें पुस्तक वाचा. ]

पान १२५. **' खरी सविकल्प समाधि उत्पन्न करूं शकतें तें वाङ्मय '** : केळकरांनी मराठी साहित्याच्या थोरवींत ही नवी कल्पना आणली यांत शंका नाही. पण समाधीच्या विकल्पाबद्दल व प्रमाणाबद्दल वा. म. जोशी व इतर टीकाकारांनी आक्षेप उत्पन्न केले आहेत.

पान १२७. **मराठ्यांचे ऐतिहासिक पोवाडे** : [ ऑक्वर्थ व शाळिग्राम यांच्या या पुस्तकावर परीक्षणार्थ लिहिलेला लेख : ' केसरी ', १९१२. ]

पान १२९. **' तेव्हांपासून महाराष्ट्राच्या राजकीय...अभ्रें व वादळें '** : १८९० नंतरच्या वीस वर्षांत कॉंग्रेसची वाढ, सार्वजनिक सभेची चळवळ, दुष्काळ व प्लेग या आपत्ति, रँडचा खून, व क्रान्तिकारक चळवळीचा प्रसार, जहाल–मवाळ भांडणें, लो. टिळकांचा तुरुंगवास, इत्यादि घडामोडी झाल्या.

पान १३१. **उमाजी नाईक** : गेल्या शतकांतील पुणें–सातारा–भोर विभागांतील दरोडेखोर. हा गरिबांचा मदतनीस पण सरकार व

श्रीमंत यांचा काळ होता. कॅ. मॅकिंटॉशने त्यास पकडलें व १८३२ मध्ये कंपनी सरकारने त्याला पुण्यास फांशीं दिलें.

पान १३१. **चेव्ही चेस** : स्कॉटलंड व इंग्लंडच्या सरहद्दीवर १३८८ मध्ये पेरीसिस व डग्लस या दोन घराण्यांतील युद्ध ऑस्टर्बर्गला झालें. या प्रसंगावरील चेव्ही चेसचा पोवाडा प्रसिद्ध आहे.

पान १३३. **राइलीचा एजंट** : हिंदुस्थानांतून कापूस, गळितांचीं धान्यें इ. माल खरेदी करणारी जपानी व्यापारी कंपनी व तिचे दलाल.

पान १३६. **सिमल्याचें वर्णन** : [ १९२४ मध्ये हा लेख लिहिला गेला. व तोंपर्यंत हिमालयावर कोणी गेलें नव्हतें. पण त्यानंतर जर्मन व अमेरिकन गिर्यारोहकांचे प्रयत्न झाले. वैमानिकांनीहि हिमालयावर भरारी मारली; कॅ पाटणकरांचें ' हिमालयाशीं झुंज ' हें पुस्तक पाहा. ]

पान १३९. : **कलकत्याहून राजधानी दिल्लीस** : १९१२ त हा बदल झाला.

पान १४५. : **रुडयार्ड किपलिंग** हा इंग्रज कवि विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील साम्राज्यवादी म्हणून प्रसिद्ध आहे.

पान १४९. **वायुलहरी** : [ कल्पनाविलासाला प्राधान्य असलेला आरंभीचा निबंध.

पान १५०. **रानारानांत गेली बाई शीळ** : ना. घ. देशपांडे यांचें एक लोकप्रिय भावगीत.

पान १५१. **मार्टिन ल्यूथर** : जर्मनींतील धर्मसुधारक हुतात्मा.

पान १५१. Ode to the West Wind : शेली कवीची कल्पनाप्रचुर पण आत्मनिष्ठ कविता.

पान १५१. **नैर्ऋत्येकडील वारा, वातचक्र** : केशवसुतांच्या निसर्गवर्णनपर दोन कविता. पण यांतहि आत्मनिष्ठ वळण आहे.

पान १५३ The old order changeth yelding place to new' प्रख्यात आंग्लकवि टेनिसन्चें Morte Do Arther या करुणरम्य काव्यांतील सुभाषित.

पान १५३. **क्षणे क्षणे यन्नवतामुपैति तदैव रूपं रमणीयताया :** कालिदासकृत शाकुंतल : 'रमणीयता ही प्रतिक्षणीं नवें नवें मोहक रूप धारण करीत असते.'

पान १५४. **'वीरा भ्रमरा जन्मुनि सार्थक'** : कालिदासाच्या शाकुंतलांतील एका श्लोकाचें भाषान्तर.

पान १५५. **'रात्रिर्गमिष्यति भविष्यति...हन्त नलिनीं गज उज्जहार'** : दुर्दैवी माणसाचा जीवननाश प्रतीत करणारा संस्कृत श्लोक. कमलांत रात्रीं अडकणाऱ्या भ्रमराने सकाळीं मुक्तता होईल म्हणून वाट बघावी तोंच तें कमल हत्तीकडून नष्ट केलें जावें–हा भावार्थ.

पान १५५. **विक्रमोर्वशीयांत** : कालिदासाने या नाटकांत पुरूरवा राजाला ऊर्वशी रानांत अचानक सोडून अदृश्य होते, तेव्हा तो राजा वेड्यासारखा हंस, भ्रमर यांच्याजवळ ऊर्वशीची चौकशी करतो असें दाखविलें आहे.

पान १५७. **मॉडर्न रिव्ह्यूमधील बंगाली चित्रें** : रामानंद चतर्जी-संपादित 'मॉडर्न रिव्ह्यू' या प्रसिद्ध मासिकांत बंगाली चित्रें येतात. तींत स्त्रीपुरुषाचे हातपाय किरकोळ वाटण्याइतके निमुळते व शरीर रोड दाखवतात. त्या प्रकारावर ही टीका आहे.

पान १६०. **एक लाखाचें बक्षीस !** : [ मनाच्या दोन प्रवृत्तींचें विवेचन करणारा आत्मनिष्ठ पण विचारगर्भ खुसखुशीत भाषेंतील लघुनिबंध.]

पान १६५. **ज्याला घोडा म्हणतात तो प्राणी** : उत्तररामचरिताचें भाषान्तर कै. परशुरामतात्या गोडबोले यांनी केलें. वाल्मी-

कीच्या आश्रमांतील ऋषिकुमारांनी घोडा बघितलाच नव्हता. रामाच्या अश्वमेध-यज्ञांतील घोडा आश्रमाशीं येतांच कुतूहल जागें झालें. हा विनोदगर्भ भाग.

पान १६६. **राजा रविवर्मा** : केरळप्रान्तीय थोर चित्रकार.

पान १६९. **गटेचें फाउस्ट** : जर्मन कवि व नाटककार गटेचें फाउस्ट नाटक 'अक्षर' आहे. त्यांत लोभाने होणारा मनुष्याचा मानसिक अधःपात वर्णन केला आहे.

---

मूल्य अडीच रुपये

## आ गा मी

| | | | |
|---|---|---|---|
| आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास | | : | प्रा. अ. ना. देशपांडे |
| सौंदर्यशोध व आनंदबोध | : | : | प्रा. रा. श्री. जोग |
| विनोदाचें व्याकरण : | : | : | आचार्य प्र. के. अत्रे |


व्हीनस बुक स्टॉल

अप्पा बळवंत चौक : पुणें २